गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ।

# महाराष्ट्र-कुटुंब-माला

## पुष्प १७ वें

# संसारांत—

## ( कष्टी कडील )



लेखक

नारायण विनायक कुलकर्णी

---

जुलै १९३० इ.

---

किंमत एक रुपाया

संपादकः—नारायण विनायक कुळकर्णी
प्रकाशकः—विठ्ठल रामचंद्र खाडिलकर, ३९१ नारायण, पुणें २.
मुद्रकः—ग. का. गोखले, श्रीगणेश प्रिंटिंग वर्क्स,
४९५।१६ शनिवार, पुणें २.

---

संसारांत सदैव सुखाची इच्छा धरावी आणि त्याऐवजीं दुःख पदरीं पडून कष्टीच बनावें असा क्रम तर चाललेलाच असतो. पण अधिक कष्टीपण केव्हां येतें? हातातोंडाशीं आलेल्या मुलांनीं, घराकरितां, देशाकरितां, धर्माकरितां, जायबंदी झाले, तुरुंगवास पत्करला किंवा आत्माहुति दिली तर मनाला दुःख होईल, नाहीं असें नाहीं; पण त्या दुःखाची जात केव्हांही निराळी असेल. परंतु तसें तरी भाग्याचें दुःख कितीकांच्या नशिबाला येत असेल? वडिलांनीं मुलांविषयीं भावना एक धरावी आणि मुलांनीं भलत्याच वाटेला जाऊन कायमचे अधु व्हावें, तुरुंगांत जावें, किंवा आत्माहुति देऊन वडिलांना दुःखी करावें! आणि हा परिपाक कां व्हावा, याची मीमांसा देखील कोणाला धडपणीं करतां येऊं नये; हें अधिक दुःखदायक नव्हे का? संसारांत कष्टी वडील झाल्याचे कांहीं प्रसंगच यांत दाखवितां आले आहेत. ते कां झाले? व काय केलें असतां तें टळलें असतें, व कोण कसे वागले असते तर तें टाळतां आलें असतें हें, 'डायरी' भरणाऱ्या 'ताई'ला सांगतां आलें नाहीं; तरी पण तिच्यावर त्याबद्दल कोणी रोष करूं नये. तिनें सांगितलें नसलें म्हणून काय झालें? तिनें आपल्यासमोर धरलेलें चित्र सावधान चित्तानें पहा, आणि संसारांत कोठें कुणाचें चुकलें, आणि मग पहा तें कसें सुधारतां आलें असतें हें तुमचें तुम्हालाच नाहीं कां ठरवितां येणार?

---

# मालेचें पांचवें वर्ष

प्रस्तुतच्या "संसारांत" [ कष्टी वडील ] या पुस्तकानें मालेच्या पांचव्या वर्षास ईशकृपेनें आरंभ होत आहे, याबद्दल एक प्रकारचें मनाला सात्विक समाधान होत आहे.

अशा वेळीं गेल्या चार वर्षांतील 'माले'च्या कार्यासंबंधानें थोडेंसें लिहावें असें वाटणें साहजिक आहे. मालेची चार वर्षांची वाङ्मयिक कामगिरी चांगल्या प्रकारची असल्याचें आज सर्वतोमुखीं ऐकायला येत असून माला लहानांपासून थोरांपर्यंत, गरीबांपासून श्रीमंतांपर्यंत सारखीच 'आवडती' असल्याचें आढळून येत आहे. मालेचीं कांहीं पुस्तकें शिक्षण-संस्थांमधून 'जलद वाचना' करितां नेमिलीं गेलीं आहेत हें सर्वश्रुत आहेच. एवंच काय, व्यक्ति आणि संस्था यांनीं 'माले'च्या कार्याची अंतःकरणपूर्वक निदान शाब्दिक तरी बूज राखल्याचें नजरेला येऊन मालेला तसें समाधान दिलें आहे.

परंतु जोंपर्यंत आश्रयदात्यांचा तुटपुंजेपणा संपत नाहीं, आणि मालेविषयींच्या कोरड्या-शाब्दिक सहानुभूतीपलीकडे श्रीमंत वर्गाची मजल जात नाहीं, तोंपर्यंत गरीब 'मालेनें' कितीही उत्साहाच्या व उल्हासाच्या उड्या मारण्याचें मनांत आणलें तरी त्याचा उपयोग काय? तिला प्रत्यक्ष कृतीच्या उड्या कशा मारतां येणार? आणि ती अधिकाधिक 'कार्यक्षम' झालेली तरी जनतेला कशी दिसणार?

अवघ्या चार वर्षांतील कार्यावरून 'महाराष्ट्र-कुटुंब-माला' सत्कार्य करणारी आहे इतकें एकमुखानें सर्वत्र ऐकावयाला मिळत आहे. तें सत्कार्य 'माले'च्या हातून सतत होत राहावें अशी मालेची तर आत्यंतिक इच्छा आहेच व त्याप्रमाणें ती एकसारखी धडपडत आहेच. पण त्या तिच्या दुबळ्या धडपडीला धष्टपुष्ट करण्याकरितां धनिकांनीं हातभार लावायला नको काय?

' माले 'च्या आश्रयदात्यांचा तुटपुंजेपणा संपेपर्यंत धनिकांचा सक्रिय पाठिंबा असल्याशिवाय मालेचें कसें भागणार ? व तिच्या हातून सतत कार्य तरी कसें होणार ?

नियतकालिकें मालेविषयीं आपलें योग्य कर्तव्य बजावीत असल्याबद्दल, शिक्षणसंस्था मालेचीं पुस्तकें आपल्या संस्थांतून नेमीत असल्याबद्दल आणि महाराष्ट्रांतील गरीब वाचकवर्ग यथाशक्ति आश्रय देत असल्याबद्दल ' माला ' त्यांची त्यांची केव्हांही ऋणी आहेच ! पण त्यांतून अजूनपर्यंत ' श्रीमंतवर्ग ' एका बाजूला तटस्थपणें राहिला आहे; त्यांचेंच लक्ष या खेपेला ' माले 'कडे विनंति करून वळवावयाचें आहे. श्रीमंत वर्गाची शब्दापेक्षां कृतीची सहानुभूति मिळविणें आतां अगत्याचें होऊन बसलें आहे.

श्रीमंत वर्गानें कांहीं कांहीं बाबी गरीबांच्या संसारसुखाकरितां पदरचें थोडेंफार वेंचून करावयाच्या असतात; आपल्या श्रीमंतीचा योग्य उपयोग करावयाचा असतो. त्याच श्रीमंत वर्गानें आतां ' महाराष्ट्र-कुटुंब–माले 'च्या कार्याकडे, आणि तिच्या योगक्षेमाकडे पाहाण्याची वेळ आली असून, त्याप्रमाणें त्यानें लक्ष पुरवावें अशी 'माले'ची इच्छा व विनंती आहे.

याकरितांच ' मालेचें ' हें पुष्प घेऊन श्री. नारायणराव कुलकर्णी कांहीं कांहीं उदारधी श्रीमंतांच्या दर्शनाला व पूजेला निघणार आहेत. श्री. कुलकर्णी मालेचा चार वर्षांचा वाङ्मयिक इतिहास आणि त्याच बरोबर तिच्या आकांक्षा, अडचणी, आणि जीविताच्या स्वास्थ्यासंबंधानें गरजा पुढें मांडणार आहेत. तरी बृहन्महाराष्ट्रांतील धनिकांनीं ' माले ' प्रीत्यर्थ जें काय यावच्छक्य उदार हातांनीं करतां येईल तें अवश्य आणि आतांच करावें, व 'माले'च्या सत्कार्यास नेट लावावा, अशी नम्र विनंती आहे. असो.

मागीलपेक्षां या ' पुष्पा'च्या वेळीं कांहीं अधिक सुधारणा दाखवितां येतील असें मनापासून वाटत होतें. पण सांप्रतची देशाची बिकट परिस्थिति अगोदरच्याच ' माले 'च्या नाजूक जीविताला अधिकच नाजूकपणा आणावयाला कारणीभूत झाली असल्यानें तसें कांहींच करतां आलें नाहीं. याबद्दल दिलगिरी वाटत आहे. आणि मालेच्या प्रत्यक्ष साहाय्याला महाराष्ट्रां-

तील धनिक वर्ग थोडासा उत्साहानें सक्रियसहायाकरितां धावेल तेव्हांच तें कार्य निश्चयानें होण्यासारखें असल्यामुळें तोंपर्यंत आश्रयदात्यांना वृथा वचनें देत बसण्यापेक्षां मौनच स्वीकारणें बरें वाटतें. अशाही स्थितींत आज 'माले' चें अंतरंग सजविण्यासाठीं धडपडणें आम्हांला जितक्या प्रमाणांत शक्य आहे, तितकें आम्हीं धडपडत असतों; हें आश्रयदात्यांना दिसत आहेच.

त्याचें प्रत्यतर प्रस्तुत पुष्प हेंच आपल्याला देईल, ही आमची खात्री आहे. या पुस्तकाला बाहेर चित्र दिलें आहे. तें आमचे एक मित्र रा. पी. आर्. जोशी यांनीं हौसेनें व प्रेमानें दिलें आहे याबद्दल आम्हीं त्यांचे आभारी आहोंत. या पुढील मालेचें पुष्प श्री. शिवराम यांनीं "लढाईपूर्वी" गुंफण्याचें अभिवचन दिलें आहे तेंही आश्रयदात्यांच्या हातीं वेळींच देतां येण्यासारखी परिस्थिति मालेला महाराष्ट्रांतील श्रीमंत, उदारधी, समंजस आणि सहृदयवर्ग निर्माण करून देईल असा भरंवसा आहे; व तो भरंवसा फलद्रूप होवो अशी श्रीगुरुचरणीं आमची नित्य नम्र प्रार्थना आहे!

यापेक्षां जास्त काय लिहिण्यासारखें आहे? असलेला आश्रयदाता वर्ग टिकून राहो व नवे आश्रयदाते मिळोत हीच विनंती.

महाराष्ट्र-कुटुंब-माला कार्यालय;<br>
३९१ नारायण पेठ, पुणें नं. २<br>
मंगळवार ता. २२ जुलै १९३०

सर्वांचा नम्र<br>
**विठ्ठल रामचंद्र खाडिलकर,**<br>
प्रकाशकः—महाराष्ट्र-कुटुंब-माला



॥ श्रीराम ॥

# कष्टी वडील



## माझी डायरी

सर्व देवांचें, आईचें, बाबांचें स्मरण करून मीं माझी डायरी लिहावयाचें मनांत आणलें; त्या वेळीं काय लिहावें ! हा प्रश्न माझ्यापुढे आल्याशिवाय राहिला नाहीं. आणि खरेंच, मी लिहावयाचें तरी काय ! आमच्या-माझ्या जीवनक्रमांत नित्याची डायरी भरण्यासारखें तें काय असणार ? पण विचार करितां असें वाटूं लागलें कीं, लिहिण्यासारखें नसायला तरी काय झालें ! माझें नसलें तरी माझ्या बाबांचें-आणखी कुणाकुणांचें तरी चारित्र्य लिहिण्यासारखें नाहीं काय ? जन्माला आल्यापासून किंवा तसें म्हणण्यापेक्षां मला कळूं लागल्यापासून आज मी डायरी भरायला लागलें आहें. या क्षणापर्यंत, माझ्या आणि माझ्या आप्त सुहृदांच्या आयुष्यांत थोड्या कां बऱ्यावाईट हकीकती घडल्या? त्या सर्व जरी नाहीं तरी त्यांपैकीं कांहीं ठळक ठळक गोष्टी मनाच्या विरंगुळ्याकरितां आठवून टिपून ठेवायचें म्हटलें तरी त्या गोष्टी काय थोड्याथोडक्या होतील ? तशाच त्या मनोरंजक आणि त्याबरोबर बोधप्रदही झाल्याशिवाय राहणार नाहींत. मी कादंबरीकार, नाटककार किंवा कवि यापैकीं कुणी तरी असायला पाहिजे होतें. म्हणजे माझ्या आणि माझ्या आप्तेष्टांचे गतेतिहास असें कांहीं सुंदर सजविले असते कीं ! पण असें नुसतें म्हणून उपयोग काय ? मी कवि नाहीं, लेखक नाहीं, कादंबरीकार नाहीं कीं नाटककारही पण नाहीं. मी माझी जी डायरी लिहिणार आहे, ती विशेषतः माझ्या स्वतःच्या करमणुकीकरितां, समाधानाकरितां. माझी ही खाजगी डायरी पाहणार तरी कोण ? आणि ती वेडीवांकडीच लिहिली आहे, वास्तविक ही हकीकत एखाद्या कादंबरीला शोभण्यासारखी आहे असें म्हणण्याची पाळी तरी कोणावर येणार आहे ?

डायरी भरायला कुठून आरंभ करावा, प्रमुखपणानें त्यांत कोणत्या कोणत्या गोष्टी लेखणींतून कागदांवर मांडाव्यात याबद्दल जेव्हां मी विचार करूं लागलें तेव्हां आम्हां सर्वांपेक्षां आमच्या बाबांच्या ज्ञात-अज्ञात अशा आयुष्य-क्रमाचा चित्रपट डोळ्यापुढें भडक स्वरूपांत नाचूं लागला! आणि खरेंच, माझ्या बाबांचें आयुष्य किती विचित्र तें! त्यांच्या आयुष्यांत किती नानाविध भलेबुरे प्रसंग आले. त्यांच्या आयुष्याचा आरंभ कसा झाला, त्यांच्या वैभवाचा, पराक्रमाचा, लोकप्रियतेचा सूर्य कोणत्या वेळेपासून चढूं लागला. ईश्वरानें माझ्या बाबांना "कर्ता" करवून कालानें कांहीं काल त्यांची शाबासकी देऊन कशी पाठ थोपटली; पंचक्रोशींत बाबांचा दरारा कसा बसवून दिला. एक कां दोन असे किती तरी प्रसंग संस्मरणीय आहेत! बाबांचे आयुष्यांतील प्रसंग लिहून ठेवणें हीदेखील मी बाबांची एक प्रकारची सेवाच करीत आहें, असें मला वाटतें! या सेवेनें बाबांना सौख्य किती होईल हें मला कळत नाहीं. पण मला मात्र बरेंच समाधान मिळेल ही खात्री वाटते!

× × × ×

अलीकडे बाबा किती तरी विचारमग्न असतात! त्यांची मुद्रा गंभीर, शांत, विचारी अशी दिसते खरी; पण त्यावर निराशेची, दुःखाची, विरक्ततेची, अशा प्रकारची जी छटा एकसारखी पसरलेली दिसते, ती मात्र पहायला मला सहनच होत नाहीं! बाबांना पूर्वीप्रमाणें हंसरे पाहाण्याचें, विनोदी बोलत असतांना ऐकण्याचें, आम्हां मुलांशीं लडिवाळ-पणानें पूर्वी वागत असत, तसें आतां वागतांना पाहाण्याचें, माझ्या नाशिबीं आतां कुठून असणार? बाबांना तितके सुखी पाहाण्याइतकें माझं भाग्य बलवत्तर नाहीं!

× × × ×

बाबा बाहेर दाखवीत नाहींत; त्यांची दिनचर्या अजूनही पूर्वीप्रमाणेंच अगदीं मंडलीकाप्रमाणें तंतोतंत घड्याळयाच्या कांट्याबरोबर चाललेली असते. त्यांची मित्रमंडळी त्यांच्याकडे अजूनही बसायबोलायला येतात; तेही नियमित फिरायला जातात; म्हणजे त्यांच्या बाह्य गोष्टी जशाच्या तशाच चालल्या आहेत; त्यांत वरवर पाहाणाराला कांहींही फरक दिसत

नाहीं; पण मी आतांशा त्यांच्याजवळ आष्टौप्रहर असतें ना! त्यांच्या जीवनांत कांहीं आनंदरामच राहिला नाहीं! मी त्यांची मुलगी. भय्या त्यांचा मुलगा. त्यांची केवढी महत्त्वाकांक्षा होती कीं माझा भय्या माझं नांव राखील, वाढवील, उतारवयांत तो आपल्या सेवेला उपयोगी पडेल. देशकार्याला, धर्मकार्याला, आपल्याप्रमाणेंच यथाशक्ति हातभर लावील आणि आपल्या कुलाचा उद्धार करील! भय्यासंबंधानं त्यांची जी महत्त्वाकांक्षा, धडाडी, उत्साह; तो अर्थात् मजसंबंधीं कसा असणार? बोलून चालून मी मुलगी. दुसऱ्याचा संसार साजरा करण्याकरितां जन्माला आलेली. त्या माझा उपयोग बाबांना काय? त्यांचें माझ्यापेक्षां भय्यावरच अधिक लक्ष असले; सारा जीव त्यांनीं त्याच्यावरच ठेवला, तर त्यांत बाबांचें गैर काय? मी आज बाबांच्या सेवेकरितां त्यांच्या घरीं—तिकडच्यासह राहिलें आहे, तरी पण त्या माझ्या सेवेंत तसा काय जीव आहे? भय्याच्या हातून जी त्यांची सेवा झाली असती—भय्याचे पराक्रम पाहातांना बाबांना जो आनंद प्राप्त झाला असता, जसे त्यांचे बाहु स्फुरण पावले असते, त्या सर्वांची कायमची इतिश्री झाल्यावर माझे बाबा पूर्वीसारखे कसे आनंदी दिसतील? कसे उत्साही राहातील?

× × × ×

भय्यानें बाबांना भाग्य असतांना भाग्यहीन बनवलें आहे; त्यांच्यासुद्धां आम्हां सर्वांना कायमचें रडत बसविलें आहे. आतां आठवण करायची नीं डोळ्यांतून अखंड अश्रुवर्षाव करायचा, एवढेंच आमच्या बाबांच्या हातीं आहे! मला वाटेल त्या वेळीं मी मनसोक्त रडतें! पण बाबांचें तसें नाहीं. त्यांच्या डोळ्यांतून किती तरी अश्रुबिंदु गळत असतील. पण ते आमच्यादेखत नाहीं! आमच्यासमोर ते भय्याच्या आठवणी काढीत नाहींत; त्याच्या नांवाचा उच्चार करीत नाहींत; किंवा कांहीं नाहीं. समुद्र जसा वरून शांत असतो तसे ते दिसतात! पण भय्यासारखा हुषार, समंजस, शिकून तयार झालेला, आज्ञाधारक आणि अगदीं हातातोंडाशीं आलेला त्यांचा एकुलता एक मुलगा एकाएकीं परत न येण्याच्या ठिकाणीं त्यांना सोडून गेला असतां, त्यांच्या अंतःकरणांत कोणत्या दुःखाचा वडवाग्नि भडकला असेल, याची कल्पना करणें कठीण कां आहे? रात्रीं

सर्वांच्या झोपा लागल्यावर अंथरुणावर बसून बाबा घटकान् घटका अश्रु विसर्जन करतांना मीं पाहिलें आहे. पण मी पुढें जाणार, कशी ? त्यांचे अश्रु थांबविणार कशी ! त्यांचे अश्रु आवरण्याचा--टिपण्याचा प्रयत्न पुढें होऊन मी करूं लागलें, तर त्या अश्रूला ओहोटी लागण्याऐवजीं त्याला भरतीच यायची, अशी भीति वाटते आणि मी जागच्या जागींच थबकतें. असें आतांपर्यंत कितींदा तरी झालें आहे !

× × × ×

भय्याची जागा मला भरून काढतां येणार नसली, तरी मुलगी या नात्यानें बाबांची सेवा जितकी आणि जशी मला करतां येईल तितकी आणि तशी मला करायला नको का ?

× × × ×

आजकाल अंथरुणाशीं खिळून राहिलेल्या आईची आणि दुःखमग्न हताश बाबांची सेवा--शुश्रुषा मला करायला करायला मिळते, हें माझ्या-पुरतेंच पाह्यचें झालें तर भाग्याचें खरें; पण तेंही अपुरें भाग्याचें म्हणून दुःखाला कारणीभूत झाल्याखेरीज राहत नाहींच ! आईच्या डोळयांत पाणी खळत नाहीं. बाबांचे दीर्घ सुस्कारें संपत नाहींत. कसे संपणार ? प्रत्येक अश्रुबिंदूसरशीं--प्रत्येक श्वासासरशीं जणूं काय आई आणि बाबा भय्याला उद्देशून म्हणत असतात, " भय्या, काय केलेंस हें ? " मीहा प्रतिक्षणीं माझ्या आवडत्या भावाला विचारीत असते कीं, " भय्या, काय केलेंस हें ? "

× × × ×

पण करायचें काय ? पितृपदस्थाचें समाधान करण्याचें सामर्थ्य, त्यांना सुखी करण्याची, आनंद देण्याची पात्रता--इच्छा--तयारी, आणि त्याकरितां जीवाच्या हालअपेष्टा सहन करण्याची मनाची उत्सुकता आमच्यांत नाहीं, ही लाजीरवाणी गोष्ट असली तरी ती दुर्दैवानें आज खरी आहे; त्याला करायचें काय ?

× × × ×

अन् जशी दृष्टि तशी सृष्टि ! जसें बाबांचें, तसेंच बाबांच्या स्नेह्यांचें--बापूसाहेबांचें, नी पांडोबा वाटेकऱ्याचं ! बाबा भय्यासाठीं, बापूसाहेब

बाबूसाठीं आणि पांडोबा आपल्या बाळयासाठीं सारखेच आज निश्वास टाकीत आहेत ! पितृपदस्थांची आज अशी अगतिक अवस्था होऊन राहिली आहे ! आपलें दुःख लपविण्याकरितां, आमचें दुःख हलकें करण्याकरितां बाबा माझ्याशीं बोलण्याचा प्रयत्न करतात. हवें नको म्हणतात. पूसतपास करतात; बळेंच ओठावर हसूं आणण्याचा प्रयत्न करतात ! पण किती वर वर ! एखादे वेळीं अगदीं कळवळून जाऊन, माझ्या पाठीवरून हात फिरवीत, गहिंवरल्या आवाजांत बाबा मला म्हणतात, "ताई, इतकें कशाला माझ्यासाठीं कष्ट घेतेस ?" पण लगेच ते थांबतात. त्यांचें त्यांनाच काय वाटतें कोण जाणें. मला वाईट वाटेल, मी रडत बसेन, कांहीं तरी बोलून जाईन म्हणून ते चटकन् आणखी म्हणतात, "ताई, तूं माझी मुलगी आहेस. तूं माझी अशी तब्येत संभाळतेस, थुंकिला हात पसरतेस--मला दुःखाची यत्किंचितही जाणीव होऊं नये म्हणून अटोकाट प्रयत्न करतेस, त्या तुझ्या प्रयत्नाला यश येऊं दे, म्हणून मला जगावसें वाटतें; तुला आशिर्वाद द्यावा म्हणून जिवंत रहावसं वाटतं ! तूं काय अन् भय्या काय मला सारखींच नाहीं कां ? तुझ्या सुखाकरितां तरी मी जिवंत राहिलें पाहिजे आनंदी असलें पाहिजे नाहीं कां ?

× × × ×

हें बोलतात बाबा पण माझ्या काळजांत चर्रर होतें. डोळ्यांत पाणी येतें ! बाबांच्या अंतःकरणांतली आग शमविण्याचें सामर्थ्य मज दुबळींत नाहीं, त्याला मी काय करूं ? मी अशी लिहीत असतें; डायरीरूपानें बाबांचें चरित्र लिहावें म्हणून प्रयत्न करतें--पण अशा वेळीं बाबांची हांक ऐकली कीं, हातांतली लेखणी तशीच गळून पडते अन् बाबांच्याकडे माझे पाय धांवत नेतात मला ! मी माझ्या बाबांचें हें वाङ्मय स्मारक करीत आहें, हें बाबांना रुचेल कीं नाहीं, हें मला निश्चित करतां येत नाहीं, म्हणून त्यांच्यापासून मी हें लपवून ठेवित असतें. या मानसिक सेवेपेक्षां मला त्यांची प्रत्यक्ष सेवाच अधिक महत्त्वाची वाटते; म्हणून त्यांनीं हाक मारतांच त्यांच्यापुढं जाऊन उभं राह्यचं यापेक्षां दुसरी कसली कल्पनाच माझ्या मनांत शिल्लक राहात नाहीं ! आतांदेखील अगदीं तसेंच झालें आहे. या क्षणीं बाबांच्यासंबंधानें एकदम कितीतरी

मनांत आलें आहे. मला कळूं लागल्यापासून मला माहीत असलेल्या बाबांनीं वेळीं प्रसंगीं स्वतःसंबंधीं सांगितलेल्या कितीतरी मजेदार गोष्टी टाकाच्या टोंकावर नाचूं लागल्या आहेत; पण इतक्यांत बाबा बाहेरून यायची वेळ झाली आहे हें एक, आईच्या औषधपाण्याची वेळ झाली हें एक; तेव्हां तें अगोदर साधायला पाहिजे म्हणून टांकाला रोखून धरणं या वेळीं तरी भाग आहे. रात्रीं सर्वांची निजानिज झाल्यावर बसेन साव-काश झोंप येईपर्यंत लिहीत म्हणजे झालें !

अगबाई, आलेच वाटतं बाबा बाहेरून—अन् आईची पण हांक ऐका-यला आली. मग उठलेंच पाहिजे मला आतां !

---

# प्रकरण १ लें

## आईचं बाळ !

मला कुणी जागं केलं कीं, मी रोजच्यासारखी आपसुखच जागी झालें हें मला माहीत नाहीं; पण जेव्हां मी जागी झालें, डोळे किलकिले करून हलकेंच इकडे तिकडे पाहाण्याचा प्रयत्न केला; तेव्हां दिवे लागलेले मला दिसले. अंथरुणांत मी एकटीच होतें. माझ्याजवळ कुणींच नव्हतं. जाग आली कीं पुढें सरकून जाऊन आईच्या कुशींत जाउन घुसायचं, तिला अगदीं चिकटून राहायचं ही माझी दररोजची पद्धत! तशी आज देखील मी करायला गेलें. पण आज आई जवळ कुठें होती? मी जराशी उठून—डोळे ताणून पाहिलें—हातांनीं जवळपास अंथरुणांत चाप-सलंदेखील. पण अं हं ! तिथं कुणीच नव्हतं! माझी निराशा झाली. मी जागीं व्हायच्या आंत आई मला फसवून चुकवून पळून गेली, असं क्षणभर वाटूं लागलं नी रडावं अशी इच्छा होऊं लागली. पण एकदम रडूंही येईना. वाटलं कीं, पुन्हां डोळे मिटून पडावं म्हणजे आई पुन्हां येईल नी मला आपल्या पांघरुणांत घेईल ! मनांत आलें कीं मी लगेच डोळे मिटले. अंगावरचं पांघरूण मुद्दाम अस्ताव्यस्त केलं. कल्पना ही

कीं, आईनं येऊन " माझी बाळ ती–कशी उघडीच पडली आहे ती– अशानं थंडी नाहीं व्हायची!' असं म्हणत, माझ्या अंगावरून हात फिरवीत पांघरूण घालावं।

पण किती वेळ पुन्हां डोळे मिटले तरी आई कांहीं परत येईना. पुन्हां डोळे उघडले; तरी दिवे आहेतच! मला कांहींच कळेना. रात्र झाली आहे का संपली आहे? दिवेलागण झाली आहे, कां पहाटेचें झुंजूमंजू झालं आहे!

पण अशा खुळ्या भ्रमांत मला फार वेळ उभं राहावं लागलं नाहीं. अंगावरचं पांघरूण दूर झिडकारल्यामुळें किलकिल्या खिडकींतून पहाटेची गार वाऱ्याची झुळूक आंगाला येऊन झोंबली. तितक्यांत मावशीबाई लग-बग पाय उचलीत माजघरांतून पलीकडच्या खोलींत जातांना दिसल्या. माझ्या अंथरुणावर येतांच मुद्दाम त्या जरा वेळ थबकल्या आणि " ताई, ताई, उठलांत का?—उठा बरं!—जाग्या व्हा!—तुम्हांला एक गंमत दाखवायची आहे!—उठा, मघांपासून किती तुम्हांला हांका मारल्यान् मी!—" असें म्हणाल्या. मावशीबाई या वेळीं खूप गडबडींत दिसल्या. त्यांच्या आवाजांतही फरक वाटला. आवाज घोगरा होता; पण त्यांत मला भीति वाटेल अशी तऱ्हा नव्हती. त्यांच्या हातांतही कांहीं तरी होतं. त्या अत्यंत गडबडींत होत्या. त्यांच्या हांक मारण्याला " अंऽ हंऽ " असं कांहीं तरी मी उत्तर द्यायच्या आंत त्या तेथून निघून गेल्याही. त्यांना वाटलं असेल ' मुलगी इतक्या हांका मारून जागी कशी होत नाहीं कोण जाणें!" मला कळलं कीं मघांशीं मी जी जागी झालें, ती आपसुख नसून मावशी-बाईच्या हांकांमुळेंच!" आई आली नाहीं ती नाहींच. आई कुठं गेली म्हणून उठून बसून मावशीबाईनाच विचारणार होतें, इतक्यांत मावशीबाई तिथून निघूनच गेल्या. आतां मात्र मला कससं वाटून मला रडूं येऊं लागलं. इतक्यांत मावशीबाईच पलीकडे कुणाशीं तरी कुजबुजताहेत; आणखी कुणी तरी बायका आपापसांत बोलताहेत; " हें आणा; तें आणा. हं तें बरं झालं. हवंच होतं तें! इथं जवळपास कुणी मोठ्यानं बोलूं नका!" अशीं कांहीं बोलणीं ऐकायला येत होती!

आहे काय हें? माझा त्या वेळीं एवढासा चिमुकला जीव. धड मला

कांहीं कळतदेखील नव्हतं. पण त्या वेळची ती विचित्र विलक्षण गडबड पाहून मलादेखील प्रश्न पडला. आहे काय हें ? गडबड कसली ? आई कुठं आहे ? मावशीबाई इतक्या गडबडींत का ? बाहेरच्या कोण बायका आल्या आहेत ? केव्हा आल्या आहेत ? अजून जिकडे तिकडे दिवे कशाकरितां आहेत ? असे किती तरी प्रश्न माझ्या मनापुढें आले.

मग मीच अंथरुणांत आपली पालथी मांडी घालून उठून बसलें. झोंपेंत लोळून डोकीवरचे केस अस्ताव्यस्त झाले होते, ते मींच माझ्या चिमुकल्या हातानीं नीट मागें लोटले. रात्रींची एकेक आठवण करूं लागलें. रात्रीं माझ्याजवळ आई होती कीं नाहीं, असा विचार आला, ' हो, होती, ' अशी आठवण झाली. मग माझ्याजवळून उठून ती केव्हां गेली ? कां गेली ? या प्रश्नांनीं मला भंडावायला आरंभ केला. त्या प्रश्नांचीं उत्तरें मला सुचेनात. कुणाला विचारीन म्हटलं तर तिथं कुणी नव्हतंच तर विचारायचं कुणाला ? मला अगदीं सगळयांचा राग आला. उजाडल्यावर बाबांना हें सारं सांगेन आणि सगळयांची खोड काढीन, असं देखील कांहीं तरी मनांत आल्याखेरीज राहिलं नाहीं. शेवटीं आपलं रडावं नी आपल्याकडे ज्यांचं लक्ष नाहीं, त्यांचं लक्ष वेधवावं असं वाटूं लागलं. रडणं काय? आम्हां लहान मुलामुलींच्या अगदीं हातचं असतं ! जरा कुठें खुट्ट झालं कीं ' आईऽऽ ' करीत भोकाड पसरायला आम्हांला किती वेळ लागतो ?— मी सूर काढून आतां रडायला लागणार इतक्यांत—त्या गोष्टीला आतां किती वर्षे होऊन गेलीं आहेत; त्या वेळीं मी फार तर पांच किंवा सहा वर्षांची असेन. पण त्या वेळची मला पक्की आठवण असून, आतां त्या आठवणीची आठवण करीत असतांना आणि ती कागदावर उतरीत असतांना आतांच जणुं काय ती माझ्यासमोर घडत आहे; त्या वेळेइतकीच मी या वेळीं लहान आहे; असें मला वाटतें— इतक्यांत पलीकडच्या बंद असलेल्या खोलींतून—

" ट्यांहा ! ट्यांहा ! ट्यांहा !" असें कांहीं तरी मला एकदम ऐकायला आलें. मी चमकन् चमकलें. हरिणीसारखे कान टवकारले. झट्दिशीं अंथरुणांतून उठलें नी त्या बंद केलेल्या खोलीकडे धांवतच निघालें. थोडक्यांत चुकलं नाहीं तर परकरांत पाय अडकून मी पडायचीच !

मघाशीं मावशीबाई त्याच खोलीकडे गेलेल्या पाहिलं होतं. आतां त्याच खोलींतूनः—

" ट्यांह्य ! ट्यांह्य ! ट्यांह्य !"

पुन्हां तोच आवाजांत कांहीं तरी नवीन आहे. कांहीं तरी गंमत आहे. मघाशीं मावशीबाई जी गंमत म्हणाल्या ती तीच गंमत असली पाहिजे, असं कां कोण जाणं पण माझ्या मनांत त्या वेळीं आल्याखेरीज राहिलं नाहीं. मी दारांत धांवत गेलें. तिथें जवळपास कुणीं नव्हतें. बाहेर चक्क उजाडलं होतं. बाहेर अंगणांत आमचा पांडोबा वाटेकरी एकदोन गडी घेऊन तयार केलेली बाज आंत आणण्याच्या खटपटींत होता. माझ्याकडे त्यांपैकीं कुणींच पाहिलं नाहीं. मी दाराशीं येऊन फटींतून काय आहे ? हें पाहाण्याच्या उद्योगाला लागलें. मला दाराच्या फटींतून काय दिसलं ?

एका भिंतीला टेकून आई कशी तरी सावरून बसली आहे. तिनें डोळे मिटले आहेत. जवळच एका अनोळखी बाईनें आपले दोन्ही पाय पसरले असून त्यावर चिमुकलं एवढसंसं गोरंगोरंपान एक बाळ घेतलें आहे ! मी पाहिलं त्या वेळीं देखील त्या बाळानं ट्यांह्य ! ट्यांह्य ! केलंच ! मावशीबाई तिथेंच कांहीं तरी कामांत गुंतल्या होत्या. त्यांचं नी त्या अनोळखी बाईचं कांहीं तरी बोलणं चाललंच होतं ! मला तो सारा चमत्कारच वाटला ! माझे डोळे चक्क झाले ! मला आंत जायचं देखील भान राहिलें नाहीं. मी तशीच मुग्ध होऊन जागच्याजागीं खिळलें.

मावशीबाई कशालाशा बाहेर यायला लागल्या. त्यांनीं खोलीचं दार उघडलं, तों दारांत मी ! त्या मजकडे पाहून हंसल्या. मला तशांतही म्हणाल्या, " उठलांत ताई ! चला मी तुम्हांला गंमत दाखवतें !" असं म्हणून त्यांनीं मला कडेवर घेतलं नी आंत नेलं ! त्या परक्या बाईच्या पायावरचं अत्यंत सुन्दर, गोरं, बारीक बारीक डोळे असलेलं, एवढ्याशा तुळतुळीत डोक्याचं नी हातपाय एके ठिकाणीं आणून मनापासून रडण्याचा प्रयत्न करणरं बाळ मावशीबाईनीं मला दाखविलं नी म्हटलं, " पाहिलंत ताई, हें कसं बाळ आहे ! हें बाळ आमच्या ताईचा भाऊराया ! आवडतो ना तुम्हांला ? आमच्या ताई दिवाळींत आपल्या भाऊरायाला ओवाळा-

यच्या, त्याच्याकडून ओंवाळणी घ्यायच्या ! त्याला बायको आली म्हणजे " वहिनी वहिनी करून त्याच्या पाठीशीं लागायच्या ! अं ! "

मावशीबाई किती तरी बोलल्या नी आणखी किती तरी बोलल्या असत्या. पण त्यांचं बोलणं कळत होतं कुणाला नी ऐकायला कुणाला आलं ! माझ्या आईला बाळ झालं, एवढं ऐकलं मात्र ! अन् जें कांहीं मला झालं तें झालं ! मला किती किती आनंद झाला ! मी त्या बाळाकडे एकसारखी पाहूं लागलें. टाळ्या पिटूं लागलें. मावशीबाईंच्या कडेवरून उतरलें नी अगोदर बाळाजवळ धावत जाऊं लागलें. त्याला एकदम हात लावावा. त्याचा मुका घ्यावा असं वाटूं लागलं. आईकडे पहात " होय आई, आपलं बाळ हें ? " असं वेड्यासारखें मी आईला विचारलं देखील. माझ्या विचारण्यानें, मावशीबाई, ती परकीबाई तर हंसल्याच. पण तशा स्थितींत आईला देखील किंचित् हसूं आल्याशिवाय राहिलं नाहीं ! त्या परक्या बाईनीं मला जवळ येऊं दिलें नाहीं, मग बाळाला हात लावणं दूरच ! मावशी-बाईनीं कांहीं तरी युक्ति करून मला खोलीच्या बाहेर नेलं ! मला काय ? मी घरांतून आंगणांत आणि आंगणातून घरांत एकसारखी आनंदानं टाळ्या पिटत व " आईला बाळ झालं ! मला भाऊ झाला ! " असं म्हणत नाचूं बागडूं लागलें !

आई माझ्याजवळून पहाटे उठून गेल्याबद्दलचा मला आलेला राग केव्हांच नाहींसा झाला होता ! आतां मी मावशीबाईंच्या मागें एक-सारखी होतें. त्या खोलींत गेल्या कीं मी जाई; त्या बाहेर आल्या कीं मी बाहेर यावें. मागें फिरतां फिरतां मावशीबाईंना मी हजार प्रश्न करीत होतें. त्याही केव्हां नीट सांगत. केव्हां उगीचच मला चिडवीत ! आईनं बाळ कुठून आणलं ? केव्हां आणलं ? तें बाळ माझ्यावर माया करील का ? मी त्याच्यावर माया करीन कां ? आई आतां रात्रीं निजतांना बाळाला जवळ घेणार का मला ? मी आपली आईच्या पाठीशींच गुपचुप जाऊन निजेन म्हणजे झालें. असें मी त्यावेळी मावशीबाईशीं कितीतरी बोलत होतें. मावशीबाईनीं चांगलें सांगितलें तर बरें वाटे; कांहीं तरी चिडविण्यासारखें त्या बोलल्या तर मला भारी राग येई. मी धावून त्यांना अगदीं चावा-यला धावे ! त्या दिवशीं कितीतरी उशीर झाला तरी मला जेवायचं सुचलं

नाहीं. मावशीबाईनीं जेऊं घातलं पण मला जेवणच जाईना ! कां तसं झालं होतं कोणास ठाऊक !

दहा वाजावयाच्या सुमारास बाबा कुठूनसे बाहेरून आले. त्यांना आंगणांत पाहातांच तीरासारखी धांवत त्यांच्याकडे गेलें नी बिलगलें. बाबांनीं मला लगेच वर उचलून घेतलें आणि माझा त्यांनीं मुका घेत विचारलं " काय ताईसाहेब ? कसली गडबड आहे ?" कपाळावर दंगा करणारे केस बाबांनींच आपल्या हातांनीं मागें सारले. मी माझे दोन्ही हात बाबांच्या दोन्ही गालांवर ठेवीत, तोंडाचा चंबू करीत लडीवाळपणानें म्हटलें.

" बाबा ! बाबा ! तुम्हांला गम्मत जम्मत माहीत आहे ?"

" काय ताई ?"

" आईला बाळ झालं कीं !"

" असं कां ? अरे लुच्चा !"

" अं–मी नाहीं जा !"

" बरं सांग हं !—"

" माझा भाऊ आहे तो म्हणे ! होय ना हो बाबा ?"

" हो !"

" बाबा, आईला बाळ कुठं सांपडलं माहीत आहे तुम्हांला ?"

" नाहीं रे बाबा !—"

" मला माहीत आहे पण !—"

" खरें ?—"

" मावशीबाई म्हणाल्या कीं पलीकडल्या कणगींत सांपडलं !"

" अरे वाः ! "

" हें काय हो बाबा ! माझे असे मुके किती घेतां ! तुमच्या मिशा टोंचतात ना मला ? "

" चावट कुठली ! "

" बाबा बाळ पाहायला येतां आईचं ? "

" हो !

" चला तर ! मी दाखवतें तुम्हांला ! अं ! "

" मग जराशानं अं ! "

"बाबा—"

"काय ताई?"

"बाळ मला काय म्हणेल हो?"

"ताई!"

"अन् मी काय त्याला म्हणायची?"

"त्याचं नांव ठेवल्यावर मग काय तें म्हण!"

"अं! अं! अं! मी नाहीं जा!"

"मी सांगूं?--सांगूं?--मावशीबाई म्हणाल्या कीं—"

"काय म्हणाल्या?—"

"तुझा तो भाऊ आहे, त्याला तूं भय्या म्हणत जा! मी त्याला भय्या म्हणणार अं!"

"बरं तर!"

झालं. त्या दिवसापासून तो बाळ आम्हां सर्वांचा एकदां जो भय्या झाला तो भय्याच! त्यानंतर बाळाचें बारसें झालें. त्याचें पाळण्यांतलें नांव एक ठेवलें. कागदोपत्रीं एक लागलें तरी तो आम्हां सर्वांचा भय्याच! कारण तें नांव मी हौसेनें ठेवलें! माझी हौस कोण मोडणार?

भराभर दिवसापाठीमागून दिवस जाऊं लागले. पांचवी पुजली. बाळाला पाळण्यांत घातलं. बारसें झालें. सकाळीं सायंकाळीं दारांत मधुर वाजंत्री वाजत होती. सकाळ सायंकाळ ब्राह्मण येऊन शांतिपाठ म्हणून बाळ-बाळंतीणीला अंगारा लावून जात होता. आईच्या खोलींत दररोज शेजार-पाजारणी येऊन त्यांची कांहीं तरी गोड कुजबूज चालू असे. बाबांच्याकडे त्यांचे स्नेहीसोबती येत. त्यांची विचारपूस होई. थट्टामस्करी चाले. सर्वांच्या बोलण्याचालण्याचा विषय एकच असे नी तो म्हणजे भय्याबद्दल!

कुणी म्हणे भय्या पुढें बाबांच्यासारखा हुबेहुब होईल. कुणाचें मत भय्या मातृमुखी होईल. कुणाचं मत कांहीं पडे. कुणाचं कांहीं पडे आपापल्या मतसमर्थ-नार्थ हमरीतुमरीवर येण्याची कोणाची पाळी येई! बायका तर आपण म्हणतों तेंच खरें हें सांगण्यासाठीं अगदीं वर्दळीवर येत! त्यांतून कुणी समंजस म्हणे भय्या आपल्या बापासारखा दिसला, तरी स्वभावानं अगदीं आपल्या आईच्या वळणावर जाणार! कुणाला हें न खपून त्याचें म्हणणें अगदींच पहि-

त्याच्या उलट पडे ! कांहीं झालं तरी मुलगा आपल्या शेवटीं बापाच्याच वळणा-णावर जायचा ! हें ठरलेलें आहे. मुलगा मातृमुखी असला तर भाग्य-शाली असतो खरा; पण स्वभाव निघायचा बापासारखाच ! अन् मुली दरोबस्त आईच्या चालीनें चालायच्या !

असं ऐकलं म्हणजे मला बरं वाटे ! मी आईच्यासारखी होणार, हें ऐकून मनाला अत्यंत आनंद होई ! आमची आई किती चांगली आहे ! किती किती आमच्यावर ती माया करते; लोक तिला किती चांगली म्हणतात. मला लोक तसच चांगलं म्हणतील. पण मी दिसतें कुणा-सारखी ? आईसारखी कां बाबांसारखी ? हें कुणीच बोलत नसे. मी तर तें ऐकायला उतावळी झालेली असें. जो तो किंवा जी ती आपली भय्या-बद्दलच बोले ! तसा विषय निघाला कीं मला वाटे आतां या बोलण्यांत माझंही नांव निघेल. मी कुणासारखी दिसतें, कुणासारखी होणार; हेंही निघेल. मग मला बरं वाटेल. म्हणून मी सर्वांच्यामध्यें बसून सगळ्यांच्या तोंडाकडे आळीपाळीनें पहात राहीं. पण सारी माझी निराशाच करीत ! मग मला त्यांचा अतिशय राग येई ! माझं नांव कुणीच कां काढीत नाहीं ? आई-सुद्धां कांहीं म्हणत नसे ? बाबांच्या तोंडातून तर कधीं चकार निघायचा नाहीं. मी न भीतां त्यांच्याजवळ जाई; त्यांच्या अंगावर रेले, खांद्यावर खेळे; त्यांच्या मिशा कुरवाळी, मांडीवर लोळे; अशा वेळीं बाबांना मलाच विचारण्याचा मोह होई कीं, "मी कुणासारखी आहें ? बाळासारखी मी चांगली आहें का ?" पण कां कोण जाणें; धीरच होत नसे. मग वाटे आईला विचारावं. पण आई तरी सांगेल कीं नाहीं कुणास ठाऊक ! त्या-पेक्षां असं मनांत येई कीं, जेव्हां आई सहज प्रेमानं जेव्हां पाळण्यांतून काढतांना भय्याला आई माझ्या मांडीवर देते, मी बाळाला "ओळोळो" करून त्याला माया करते, त्या वेळीं भय्यालाच आपलं विचारावं कीं "भय्या, मी चांगली, आहें का तूं रे ? तुझ्यासारखी मी दिसतें ना रे ?"

पण आईनं बाळाला मांडीवर दिलें म्हणजे हें सुचत असे कुणाला ? तें सारं विसरून जाई; बाळ दूरच्या दिव्याकडे पहातो कसा ? एकदम हंसतो कसा ? एकाएकी रडतो कसा ? हेंच मी पहात राहीं. त्यांतच गुंगून जाई ! 'आई, भय्या हंसतो कसा बघ अन् लागलीच तोंड वाईट पण

कसा करतोय बघ! असं ग कां?' असें कांहीं तरी मी आईला विचारी. त्यावर आईही "सटवाई बाळाला अशी गुदगुल्या करून हंसवीत असते नी मागल्या जन्माच्या गोष्टी सांगवून रडवीत असते!"

आईनं असं सांगितलें म्हणजे मला कांहीं कळलें नाहीं तरी माझं समाधान होई! "हांय का? बरं तर!" असें म्हणून मी बाळाचे मुके घेई!

माझ्या आईला बाळ झालं म्हणून मला जर इतका आनंद झाला होता; मी जर अशी एकसारखी नाचत बागडत होतें, तर आईला किती आनंद झाला असेल; बाबांचें अंतःकरणांत कोणत्या अनिर्वचनीय आनंदाच्या-समाधानाच्या सुखाच्या ऊर्मी उसळत असतील! मी अजाणपणानं बागडत होतें; हंसत होतें, खिदळत होतें! आईचं नी बाबांचं अंतःकरण तसंच हंसत होतें, बागडत होतें!

आईला बाळ होण्यापूर्वी मी आईला कधींच सोडीत नसे. अष्टौप्रहर बिलगलेली असे. तिला एकसारखं तोडीत असे. सारखी पीत असे. ती त्रासे. एकादे वेळीं संतापानें हातदेखील उगारी. बळेच जोरानें आपल्यापासून दूर सारी! पण मी गोरीमोरी झालें; डोळयांत गंगा यमुना आल्या, मी तोंड वाईट केलें—अन् दर वेळीं हें हटकून असं व्हायचंच-म्हणजे जितक्या जोरानं आईनें मला दूर लोटलं असेल, त्याच्या किती तरी पट जोरानं आईच मला जवळ ओढून घेई; पदराखालीं घेई नी पाजूं देई!" "काय करावं या कार्टीला! अश्शी लोचट बनली आहे! पुढं कसं करील कोण जाणें!" असें कांहीं तरी पुटपुटे! पण माझ्या मनासारखं झाल्यावर आईच्या त्या बोलण्याकडे मी लक्षच कशाला देतें? मी आपला सपाटा सुरू करी! मावशीबाईच्या किंवा बाबांच्या देखत माझ्या वर्तनाचा असा प्रकार झाला म्हणजे "अहो, ताईला जरा आतांपासूनच तुटक ठेवायची संवय करा! नाहीं तर, तुम्हांलाच पुढें त्रास सोसावा लागेल." असें बाबा म्हणत. मावशीबाई पण त्याला भर देत! आई त्यावर कांहींच बोलत नसे! काय बोलणार? सांगणं सोपं आहे, पण वागणं फार कठिण आहे, हा माझ्या विचित्र वागणुकीनं आईला जसा अनुभव होता, तसा दुसऱ्याला कसा असणार?

पण खरं सांगूं का? आईला भय्या झाला त्या दिवशीं सकाळींच माझी

काय गडबड उडाली असेल तेवढीच ! पण त्या दिवसापासूनच अगदीं कुणी तरी कानांत सांगितल्या सारखंच झालं ! मी मावशीबाईंच्या कुशीत धुसलें. आईला त्रास दिला नाहीं कीं बाळाला पण !

बाळंतीणीच्या खोलींत गेलें म्हणजे खमंग असा कसला तरी सुखकर बास येई, तेव्हां, किंवा आईच्या ताटांतला तो आसट तूपभात पाहिला म्हणजे आईच्या खोलींतून हलूं नये असें वाटे व शक्य तितकें हलतही नसे. दिवसभर खोलींतच राही ! पण मावशीबाईंनीं हांक मारली कीं निमूट त्यांच्यामागें जाई !

'बाळाला त्रास होईल हं !' असंच कुणी तरी मला सांगे असें वाटे. आणि नकळत त्यांना त्रास द्यायचा नाहीं; असें मनाशीं मी ठरवी व आईला सोडून मावशीबाईशीं संगनमत करी !

हें पाहून "काय पोरीची उपजत बुद्धि ही !" असें म्हणत जो तो माझें नवलयुक्त कौतुक करी ! तें ऐकून मला किती तरी बरं वाटे !

आईच्या बाळाकरितां- माझ्या भय्याकरितां--मला तसें वागण्याची देवच बुद्धि देत नसेल कशावरून ?

---

# प्रकरण दुसरें

## बाबा

बाबांनीं भय्याचं बारसं आपल्या ऐपतीप्रमाणें टोलेजंग केलं. किती तरी पुरुषमंडळी आमच्या घरीं जमली होती. तशाच बायका ! दिवसभर मारे एकच धामधूम उडून राहिली होती ! जो येई तो बाबांचं हंसत हंसत अभिनंदन करी ! 'शंकरराव, तुम्हांला मुलगा झाला, आपल्याला आनंद झाला ! मुलाशिवाय मजा नाहीं. घराला शोभा नाहीं. जीवाला समाधान नाहीं, जन्माचें सार्थक नाहीं ! देवानं तुमच्यावर कृपा केली, आनंद झाला !' हें किंवा अशाच सारखें प्रत्येकजण बोले ! बाबांच्या हपीसांतली बरीच मंडळी त्या दिवशीं दुपारी आली होती. गांवांतले स्नेही, सोबती, परगांवचे दोस्तही सवड काढून आले होते. आमच्या खेड्यावरचा—पांडोबा, शेतमळ्यांचा

वांटेकरी पांडोबा—धान्य वगैरे पोंचवायला गाडी घेऊन अनायासेंच आला होता; त्याला बारसें झाल्याखेरीज बाबा सोडणार होते थोडेच. उलट त्याला त्यांनीं आग्रह केला होता कीं, मळयांत एखाद दुसरा माणूस राखणीस ठेवून बाकीच्या माणसांना, तुझ्या बायकोला घेऊन येच. पांडोबानें आपल्या बायकोला कांहीं आणिलें नाहीं; पण तो मात्र बारशाला राहिला. त्याच्या बायकोला आणण्याचा बाबांनीं जेव्हां आग्रह केला, तेव्हां पांडोबांचं तोंड मोठं पाहण्यासारखें झालं होतें. त्यावर लाज तर वावरत होतीच पण त्या लाजेच्या रंगांत एक प्रकारच्या आनंदाचं मिश्रणही दिसून येत होतं. पांडोबा बायकोबद्दल कांहींच बोलत नाहीं हें पाहून त्याच्या मनांतून तिला आणावयाचं नसेल; कांहींही कारण असो; आपणही जास्त खोल पाण्यांत जाऊं नये असं बाबांना वाटलं व त्यांनीं मग त्या बाबतींत अधिक आग्रह केला नाहीं.

मंडळींची ये—जा सारखी चालली होती. बारशाचं बरंच पान उठणार असल्यामुळं स्वयंपाकाला मुद्दाम आचारी आणावा लागला होता. माझी आजी कोठी संभाळीत होती. मावशीबाई कांहीं बाळंतीणीच्या खोलीकडे तर केव्हां आजीच्या हाताखालीं काम करीत होत्या. त्याशिवाय बाहेरच्या आल्या-गेल्यांना चहा—फराळाचें द्यायचें त्यांच्याकडेच सोंपविण्यांत आलें होतें. अशी सगळयांची एकसारखी धांदल आणि धांवपळ चालू होती. प्रत्येकाच्या तोंडावर आनंद दृग्गोचर होत होता! मी केव्हां मावशींच्या पाठीशीं हिंडत होतें, तर केव्हां आईच्या खोलींत जाऊन बाळाला पाहत उगीचच "आई, बाळ उठलं?" नाहीं तर "बाळाला झोंप लागली वाटतं आई, होय!" असें कांहीं तरी विचारीत असे. बाबा दिसले कीं बेछुट त्यांच्या मागें लागे; उगीचच त्यांच्या पायांना गच्च मिठी मारून त्यांचा मार्ग रोधीत होतें.

बाबा बाह्यतः गंभीर दिसत होते खरे, पण आंतल्याआंत त्यांना किती तरी आनंद झाला होता. त्यांच्या बरोबरची—सलगीची मंडळी वर माडीवर बसली होती. बाबांना प्रत्यक्ष घरांत कांहींच काम करावं लागत नव्हतं. त्यांच्याकरितां किती तरी माणसं एकसारखीं त्या दिवशीं झटत होतीं. बाबांना त्यांच्या मित्रमंडळींनीं बसविलें. त्यांच्या गप्पासप्पा चालू

झाल्या. एकमेकांत थट्टामस्करी सुरू झाली. कुणीं पानतंबाखू खाऊन मध्यें ठेवलेल्या पिकदाणींत पिचकाऱ्या टाकीत होते,तर कोणी एकसारख्या शिगारेट शिलगावण्याचं सत्र चालविलं होतं. कुणाची दादागिरी चिरूट फस्त करण्यांतच दिसून येत होती. अडकित्त्यांत सुपारी अडकावून ती फोडण्याचाच नुसता कुणाचा चाळा चालू होता. अशी ती बरोबरीच्या मंडळींची मैफल बसली होती. अशा मोठ्या मंडळींच्या बैठकींत लहानमुलांना घुसण्याची बहुतेक संवय असतेच ! त्याला मी अपवाद कुठून असणार ! मी त्या मंडळींत घुसून बाबांच्यापर्यंत पोंचण्याचा शिरकाव करीत होतें. मला तिथें कोण अडथळा करणार ! कुणी आपण होऊन मला बळेंच ओढून घेण्याचा प्रयत्न करी; तर कोणी माझ्या हलॅकेंच हाताला धरून " बाळ, तुला बाबांच्याकडे जायचं आहे होय ! जा अं अशी जपून. कुणाच्या अंगावर पाय देऊं नको अं ! " असें म्हणत मला पुढें जायला मार्ग करून देई ! बाबांच्या ऑफिसांतला एक माणूस तर माझ्याशीं भारीच लोचटपणा करायचा ! त्याची ती विचित्र मुद्रा, त्याचा तो गलिच्छ पोषाख, बोलूं लागला म्हणजे वस्–वस् निघणाऱ्या घाणेऱ्या वाफा, या सर्वांमुळें मला तो अगदीं किळसवाणा वाटे. पण त्याला त्याचं काय होय ! तो आमच्या घरीं आला कीं, मला आपला पटदिशीं उचलून घेई आणि " का ! ताईसाहेब, कसें काय आहे ! आमच्या घरीं येतां का ! आम्ही तुम्हाला छान छान बाहुली खेळायला देऊं--कळीची आगीनगाडी देऊं " असें कांहीं तरी म्हणत सुटायचा ! मला तें अगदीं नकोसं होई. त्याच्याजवळून मी केव्हां निसटेन असं मला होऊन जाई ! बाबांच्या देखत तर तो असा माझ्याशीं लोचटपणा फारच करी ! माझी अशा वेळीं उडालेली तारंबळ आणि माझी त्या गृहस्थाजवळ न राहण्याबद्दलची मनापासूनची नाखुषी बाबांना समजत नसत असं नाहीं पण त्यांना त्यांत गंमत वाटे. ती गंमत पहात ते हंसत तसेच राहात. मला त्या वेळीं बाबांचा असला राग येई, कीं बोलून सोय नाहीं. आपल्या मुलींचं कौतुक लोक करतात म्हणून बाबा तो प्रकार तसाच चालूं देत असत कीं, काय कोण जाणं ! पण तो गृहस्थ मात्र बाबांच्या देखत माझ्यावर जी फाजील माया दाखवी त्याला कारण त्याला बाबांच्या कचेरींत बाबांच्या

वशिल्यामुळं चांगली जागा मिळवायची होती म्हणून तो तसा वागे; असं केव्हां तरी बाबा सहज आईजवळ बोलतांना मला कळलं !

तोच माणूस आजच्या बारशाच्या जेवणाला होता; जमलेल्या मंडळींत तो होताच. त्यानं मला पाहिलं. मीं पण त्याला पाहिलें. मला वाटलं तो मला पकडणार; त्यानं मला धरायला हात देखील लांबविला, पण मी तितक्यांत चपळाई करून जी निसटलें ती थेट बाबांच्या मांडीवर जाऊन पडलें. त्याची फजिती झाली म्हणून मला किती तरी आनंद झाला! मला वाटलं तो खजील झाला असेल म्हणून मिस्किलपणानं मी त्याच्याकडे पाहिलं, पण तो उलट हंसतच होता ! तो माझ्याकडे पाहून म्हणाला "ताई-साहेब, आतां बाबांच्या मांडीवर नवं बाळ खेळायचं. आतां तुम्हांला कोण विचारतो ?"

मी गोरीमोरी झालें. कांहींतरीच तो बोलला असं मला वाटलं. मीं मांडीवर पडल्या पडल्याच–बाबांना अधिकच बिलगून त्यांच्या तोंडाकडे पाहिलं. त्यावरूनच पण मंडळींत एक नवीन बोलावयाला विषय निघाला.

"काय शंकरराव " मंडळींतीलच एकजण बाबांना उद्देशून म्हणाला " ही मुलगी झाली त्यां वेळीं तुम्हांला जितका आनंद झाला— "

"त्यापेक्षां केव्हांही हजारपटीनें शंकररावांना अधिक आनंद झाला असला पाहिजे " दुसऱ्या गृहस्थांनीं बाबांचेंच म्हणून उत्तर दिलं.

"बरोबरच आहे. पुत्रप्राप्तीच्या आनंदाची बराबरी दुसऱ्या कशानेंही होणार नाहीं !" आणखी एकजण मध्येंच उद्गारला !

"तुम्हांला शंकरराव कसं काय वाटतं ? तुम्ही कांहींच बोलत नाहीं ?" पहिल्या गृहस्थानं पुन्हा विचारलं.

"अपत्यप्राप्ति ही ईश्वरी देणगी आहे. ती देणगी मिळाली तर अनिर्वचनीय आनंद हा व्हावयाचाच ! त्यांत मुलगी काय किंवा मुलगा काय ?- आनंदांत अंतर पडायचं कांहींच कारण नाहीं ?" बाबांनीं सावकाशपणें उत्तर दिले.

"वाः ! वाः ! असं कसं होईल ?" एकजण उसळून म्हणाला, "कन्याप्राप्तीपेक्षां पुत्रप्राप्तीचा आनंद विशेष असलाच पाहिजे. रूढीच आहे ही ? पुत्राचा जन्म पित्याच्या कीर्तीचा द्योतक आहे ?"

" आणि कन्येचा जन्म मातापित्याच्या अपकीर्तीला कारण होईल कीं, काय अशीच सर्वांना भीति वाटते. " आणखी एक कुणीतरी म्हणालें.

" मला तसें वाटत नाहीं ! " बाबांनीं मत व्यक्त केलें !

" अपत्यप्राप्ति ही जर ईश्वरी देणगी असेल तर त्याबद्दल आपल्याला आनंद तरी कां व्हावा ? "

" ती ईश्वरी देणगी म्हणून ती आपल्याला मिळाली म्हणून. असंच ना हो शंकरराव ? "

या प्रश्नाला बाबा कांहीं तरी उत्तर देणार होते, इतक्यांत सुप्रसिद्ध कृष्ण-शास्त्री ज्योतिषी तिथें आले. सगळ्यांची नजर त्यांच्याकडे गेली. आतां मंडळींची संक्रांत त्यांच्याकडे वळली.

" या ज्योतिर्भूषण ! बोला, कन्येचं भाग्य श्रेष्ठ कीं पुत्राचं ? "

"हें त्यांच्या त्यांच्या जन्मकुण्डलीवर अवलंबून आहे ! काऽय ! " कृष्ण-शास्त्री कांहीं कमी खष्पी नव्हते. त्यांनीं एकाच वाक्यानें सगळ्यांचीं तोंडं बंद केलीं. त्यांच्या बोलण्यानें बाबांना बरें वाटलें; " काय शंकरराव, या ताईच्या वेळीं तुम्हांला मनासारखी नोकरी मिळाली, तर या नव्या चिरंजी-वांच्या जन्मानें तुम्हांला प्रमोशन मिळालें आहे कीं नाहीं ? बोला ! काऽय"

" अगदीं खरें आहे तुमचें बोलणें ! परवांच मला प्रमोशन मिळालें. आणि म्हणूनच मी या मंडळींना सांगत होतों कीं, मला मुलीच्या आणि मुलाच्या जन्मानें एकाच आनंदाची प्रचीती आणून दिली आहे. अपत्य प्राप्तीचा आनंद अनिवर्चनीय असतो. त्याबद्दल बोलणें अशक्य असतें. पण जें बोलतां येत असतें, जें व्यक्त करतां येत असतें, तें मनुष्य मात्र करीतच असतो. "

बाबा बोलूं लागले होते. मी अजून त्यांच्याजवळच होतें. माझे बसल्या बसल्या बालिश चाळे चालूच होते. केव्हां बाबांच्या गळ्याला मिठी घाल, केव्हां त्यांच्या तोंडाजवळ तोंड नेऊन कांहीं तरी निरर्थक शब्दांची पुटपुट कर; असें माझें चाललें होतें; मी इकडे बोलत होतें, इकडे बाबा माझे बालिश चाळे आवरीत होते. माझ्या पाठीवरून हात फिरविणें, डोईवरचे भुरभुर उडणारे केस सांवरणें, पायांतल्या तोड्यांशीं हातांचा चाळा चालू ठेवणें, मी तोंडाजवळ तोंड नेलें कीं, मी मुका देण्याकरितांच

पुढें आलें आहे असें समजूनच कीं काय बोलणें थांबवून माझा मुका घेणें; इत्यादि गोष्टी बाबांच्या चालल्याच होत्या.

माझें त्यावेळीं कळण्याचें का वय होतें? भिरमिरणाऱ्या डोळयांनीं सगळयांच्या तोंडाकडे आळीपाळीनें पाहात राहावयाचें आणि बाबांनीं मटकन् मुका घेतला म्हणजे तेवढ्यापुरतें खुद्‌कन हंसायचें; एवढेंच मला त्या वेळीं कळत होतें. तशीच मी वागत होतें. इतर मंडळींनीं माझी चेष्टा केली मला चिडविण्याचा प्रयत्न केला, पण त्यामुळें रडलेंही नाहीं आणि रुसलेंही नाहीं. कारण माझें सारें तंत्र बाबांच्या तोंडाकडे पाहाण्यावर होतें. त्यांनीं जर मला चिडविलें नाहीं तर मी कां रुसेन? कां रागावेन? माझ्या लहान भावाचा--भय्याचा तो बारशाचा दिवस खरा; पण मला त्या दिवशीं कोण आनंद!

बाबांनीं जमलेल्या मंडळींना आपल्या अंतरींचें गुज म्हणून सांगितलें. ते म्हणाले, " मूल झालें कीं प्रत्येकालाच आनंद होतो; तसा मलाही झाला आहे. त्यांत विशेष असें सकृत्‌दर्शनीं काहींच वाटत नाहीं! पित्याचें भाग्य मुलाच्या जन्मांत हें खरें असो वा नसो; पण मुलाला माणूस करणें पित्याच्या हातीं असतें—त्याच्यावर ती आवश्यक आणि सर्वश्रेष्ठ जबाबदारी असतें; हें मात्र सत्य आहे! आपलं मूल कर्तबगार निघावं. त्यानें आपला देश परतंत्र असेल तर त्याची सर्वांगीण उन्नति करण्यासाठी झटावयाला लायख व्हावं— आपल्याला तसें करतां यावं, असें पुष्कळांना वाटत असतं—निदान मला तरी वाटत आहे! श्रीराम जन्माला आले त्या वेळीं दशरथाला जो आनंद झाला असेल, श्रीकृष्णाच्या जन्मानं ज्या आनंदाची प्राप्ति वसुदेवदेवकीला झाली असेल, श्रीशिवरायांचा जन्म शहाजीराजांच्या मनःसागरांत ज्या सुखसंवेदना निर्माण करूं शकला असेल, लोकमान्य टिळक, गोपाळराव गोखले, दादाभाई, लालाजी, या नरपुंगवांना पाळण्यांत खेळवितांना त्यांच्या मातापितरांना ज्या श्रेष्ठ सुखाची सुंदर स्वप्नें रिझवीत असतील; तोच प्रकार माझ्या बाबतींत असावा असं मला वाटतं; त्या विलक्षण वाटण्याचाच मला किती आनंद वाटत आहे! माझी ताई उभय कुळांचा उद्धार करील म्हणून मानससरोवरांत सुखाच्या लहरी उसळतात; तर माझा मुलगा वृद्धपणीं मला सुखाची काठी होईल म्हणून, माझ्या आयुष्याच्या अखेरच्या

घटकेला मला मुलाची मांडी उशाला मिळेल, त्याच्या हातचं पाणी मी 'राम' म्हणतांना तोंडांत पडेल; तो कर्तबगार निघेल, तो घराचें, गांवाचें, देशाचें, राष्ट्राचें दारिद्र्य दूर करील. कल्याण करील जन्मदात्री-प्रमाणें जन्मभूमीलाही सुखी करील, या सुखद कल्पना इतक्या उसळत आहेत कीं, त्या यथार्थपणें व्यक्त करणें मला अशक्य आहे !

मूल म्हणजे भावी पिढी, आपला आधार; त्यावरच आपली मदार ! त्याचं शुभ चिंतायचं, त्याचं कल्याण पाहायचं हाच आपला आयुष्यां-तला मुख्य उद्योग. त्याचं दर्शक म्हणूनच आप्तेष्टांना, स्नेह्यासोबत्यांना घेऊन आनंदी आनंद गाजवावयाचा ! ईश्वरानंच मला दोन मुलं दिलीं आणि त्याबरोबरच त्यांच्यासंबंधानें अंत:करणांत, इच्छा, आकांक्षा, आशाही निर्माण करून ठेवल्या आहेत. हें सारं बोलून दाखवावचं लागतं असें नाहीं. बोलल्याशिवायही कळतं हें खरें; पण आनंदाचा अतिरेक होऊन स्नेह्यासोबत्यांमध्यें बोललें तरी फारसं त्यांत काय बिघडणार ?

आम्हीं असें बोललों, तर बायका संध्याकाळीं मुलाला पाळण्यांत घालुन त्याला उद्देशून रामाचा, कृष्णाचा, शिवाजीचा, लोकमान्यांचा पाळणा म्हणतात; त्यावरून त्या तरी कोणती इच्छा प्रकट करतात ? सर्वांच्या बुडाशीं हेंच असतं. ईश्वरानें मला अपत्यें देऊन मला उपकृत केलें आहे जबाबदारी आंगावर टाकली आहे; त्यामुळें आनंद तर वाटतोच. पण त्याबरोबर एक प्रकारची धास्तीही वाटतेच. आपल्यावरील जबाबदारी आपल्याला कशी काय पार पाडतां येईल, हें आजच आपल्याला कसें कळणार ? देव करो आणि—"

खालून वर कुणीं मध्येंच आलें आणि त्यानें सांगितलें कीं खालीं जेव-णाची सारी तयारी आहे; मंडळींनीं खालीं चलायचं! त्या गडबडींत बाबांचें बोलणें तसेंच अर्धें राहिलें. उशीर बराच झाला होता--मंडळी भराभर खालीं जेवायला जायला म्हणून उठलीच !

बाबा पण उठले. त्यांनीं माझा हात धरला आणि "चल ताई, तूं माझ्याजवळ बसणार ना जेवायला ?" म्हणून मला त्यांनीं खालीं नेलें.

माडीवरचे विचार माडीवर राहिले. मंडळी पानावर येऊन बसली. जेवण सुरू झालें. एक दुसऱ्याला भरपूर आग्रह करूं लागला. पीकु

मध्येंच श्लोक म्हणूं लागले व ताटांतल्या पक्वानांचा फडशा पाडूं लागले.

भय्याच्या बारशाचें जेवण जेवणारी मंडळी पक्वान्नांच्या रुचीपेक्षां दुसरा कोणता विचार करूं शकणार ?

---

# प्रकरण तिसरें

## शेजारी

लहानपणींच्या अनेक रम्य आठवणी आहेत; त्यांत आमच्या शेजाऱ्यांच्या आठवणी आहेत. शेजारी म्हटले कीं त्यांच्याशीं स्नेह असलाच पाहिजे असें जसें शास्त्र नाहीं, तसेंच वैर असावें असाही कुठें एखादा कायदा नाहीं. दुसऱ्याचं कसंही असो; पण आमच्या बाबांचं वागणं शेजाऱ्यांशीं इतकं साधंसिधं असायचं कीं त्या त्यांच्या वागण्याचा अर्थ तिऱ्हाईतांनीं देखील आमचे बाबा आणि शेजारी घरोब्याचे स्नेही आहेत अशा प्रकारचा खुशाल करावा !

बाबा दिसायला तसे जरासे पहिल्यापासून उग्रच असल्यामुळें आणि वागणूक अत्यंत कडक शिस्तीची असल्यामुळें फालतु माणूस सहसा त्यांच्याजवळ येतच नसे; इतकेंच नव्हे तर सकृद्दर्शनीं त्यांच्या संबंधाचा किंचित् गैरसमजच होई. पण कारणप्रसंगीं ज्याला आमच्या बाबांच्या स्वभावाची माहिती झाली ओळख पटली, म्हणजे मग आमचे बाबा त्याला अगदीं आपलेसे वाटत ! आपले खरे हितकर्ते आहेत असें त्यांना खात्रीपूर्वक वाटे. आणि खरें सांगायचं तर बाबा यथाशक्ति सर्वांच्या उपयोगी पण पडत असत !

आमचे अगदीं लहानपणचे एक शेजारी होते. त्या कुटुंबांत इनमिन तीन माणसं. एक ते स्वतः दुसरी त्यांची पत्नी आणि तिसरें त्या उभयतांच्या प्रेमसंगमावर उमलेलं एक अत्यंत सुन्दर फूल ! बाबांना ते फार मानीत असत. त्यांची पत्नी माझ्या आईला तर आपली सख्खी बहीण समजे. अन् त्यांचा मुलगा माझ्याशीं खेळायला यायचा, मी त्यांच्याकडे

खेळायला जायची, म्हणून मला तो मुलगाही स्वाभाविकच आवडे. त्यांचें नांव अनंतराव नी ते सरकारी शाळेंत मास्तर होते. आमचे बाबा दिसत असत कडक; तर अनंतराव मास्तर वागत असत कडक ! त्यांचा मुलगा माझ्यापेक्षां काय तो दोन तीन वर्षांनींच मोठा असेल. पण अनंतराव मास्तर संतापले म्हणजे त्याला अगदीं झोडपून काढीत. मग कुणाचे ऐकायचे नाहींत. आमचे बाबा अशा वेळीं तेथें असले म्हणजेच अनंतराव शांत राहात. बाबा त्यांना शांत राहावयाला भाग पाडीत. मग ते काय करणार ? खरं म्हटलं तर बाबांचा आणि अनंतरावांचा प्रथम जो परिचय झाला तो अशाचमुळें. एकदां काय झालं, बाबा ऑफिसांतून घरीं येत होते. तोंपर्यंत अनंतरावांचा आणि बाबांचा मुळींच परिचय नव्हता ! असणार कसा ! एकाद्या लष्करी शिस्तीसारखी बाबांची वागणूक. अन् अनंतराव मास्तर पेशाचे. इकडे तिकडे न पाहातां बाबा ऑफिसांत जसे जायचे, तसेंच यायचे. अनंतराव शाळेंत जायचे नियमित; पण परत यायची त्यांची वेळ ठरलेली नसे. त्यामुळें कधीं सहजासहजीं गांठ पडण्याचा योगच नसे. तो योग एकदां मोठ्या चमत्कारिक रीतीनें आला. त्याचमुळे दोघांचा परिचय झाला. परिचयाचें रूपांतर स्नेहांत झालें; त्या स्नेहांतही आणखी पुढें बरेच फाटे फुटले; पण तें इथेंच सांगण्याची आवश्यकता नाहीं. पुढें ओघानें तें आपोआप येईलच.

बाबा अनंतराव मास्तरांच्या घरावरून येत होते. मास्तर आपल्या मुलाला कांहीं तरी शिकविण्याचा प्रयत्न करीत असतां त्यांत त्यांचं कांहीं तरी बिनसलं, त्यांनीं त्या चिमुकल्याच्या श्रीमुखात भडकवली. झालं; ती पाटी बाजूला झाली. हातांतली पेन्सील कुठें उडाली ! समोरचं बुक अस्ताव्यस्त झालं. त्या मुलानं जोरानं किंचाळायला सुरुवात केली. आंतून त्यांची बायको धांवत आली. अनंतराव तिच्यावरही संतापले. मुलगा रडायला लागल्यावर त्यानाही तें चमत्कारिक झालें, त्याचं रडणें थांबविण्याकरितां ते धाकदपटशा घालूं लागले, हात उगारूं लागले; डोळे मोठे करूं लागले; पण या उपायांनीं तो मुलगा उगा राहणार कसा ? तो जास्तच रडूं लागला. त्याला गप्प करण्यासाठीं त्याच्या हाताला धरून अनंतराव मास्तरांनीं कांहींसे फरफर ओढीत दारापर्यंत आणलें, " थांब, गप्प बैस

नाहीं तर असा सडकेला नेऊन उभा करीन." असे ते म्हणाले. त्याच वेळीं त्या घरावरून बाबा घरीं येत होते. मुलाचें किंचाळणें ऐकून बाबा थांबले. बाबांना पाहिल्यावर अनंतरावही किंचित् ओशाळल्यासारखे होऊन नीट उभे राहिले. लहान मुलांना रडविलेलें बाबांना मुळींच आवडत नसे. मग तें मूल कुणाचं कां असेना? घरांत मी कधीं रडलें तर त्यांना कधीं खपायचं नाहीं. 'लगेच कां रडते, काय झालें?' अशी चौकशी व्हायची आईला हांका मारायच्या; 'मुलीला थांबवतां नाहीं का येत?' असें म्हणून तिची हजेरी घ्यायची. असा बाबांचा स्वभाव. त्याला अनुसरूनच बाबा त्या दारांत उभे राहिले.

"काय मिस्टर, लहान मुलाला असें रडवितां काय?" बाबांनीं मुद्दाम विचारलें.

"नाहीं—तसं कांहीं-नाहीं—पण—"असेंच कांहीं तरी अर्धवट सांगण्याचा अनंतरावांनीं प्रयत्न केला. ह्या अवधींत बाबांनीं त्या मुलाकडे निरखून पाहिलें. तो मुलगाही त्यांच्याकडे पाहूं लागला. गालावरचे पाण्याचे ओघळ गालावरच राहिले खरे; पण त्याचें अधिक रडें थांबलें. काय चमत्कार घडला कुणास ठाऊक! बाबांनीं त्याला उचलून घेतलें. तोही गुलाम अजून जरी जोरजोरानें श्वासोच्छ्वास सोडीत होता, तरी बाबांच्या जवळ मुकाट्यानें आला! "मिस्टर" बाबा मास्तरांना उद्देशून म्हणाले, "तुम्ही मुलाला बरंच दटावलेलं दिसतं हो! मारलं बिरलं तर नाहींत त्याला? छट्! मुलांना असं वागविणं बरं नाहीं. एखाद्या वेळीं अशा वागविण्याचा भलताच परिणाम व्हावयाचा!"

बाबांच्या या बोलण्यानें अनंतराव मास्तर त्यांच्याकडे पाहतच राहिले. ते खजील झाल्यासारखे पाहिल्यावर मग बाबाही कांहीं विशेष बोलले नाहींत. ते त्यांच्या मुलाला खालीं ठेवण्याच्या विचारांत होते; पण त्या मुलाची भीति अजून पुरती मावळली नव्हती म्हणून तो खालीं उतरायला नाखुष दिसला. बाबांनीं तें ओळखलें. आमचें घरही तिथून अगदींच जवळ असल्यामुळें त्याला उद्देशून बाबा सहज म्हणाले, "येतोस कां रे बाळ आमच्या घरीं? खेळायला तुला आमची छोटी ताई छान आहे बघ!"

अन् खरंच बाबा त्याला तसें म्हणून घरीं घेऊन आले. अनंतराव मास्तरांना निघतांना ते म्हणाले, " तें पहा माझे घर जवळच आहे. जरा वेळानें मुलाला घेऊन जा म्हणजे झालं. माझी घरीं मुलगी आहे. खेळेल तिच्याबरोबर मोठ्या आनंदानें. "

अशीच पहिली भेट बाबांची आणि अनंतराव मास्तरांची झाली. बाबांच्या त्या वेळच्या वागण्याचा, आपल्या मुलांवर अकारण प्रेम केल्याचा परिणाम त्यांच्या मनावर किती तरी झाला. त्यांचं येणेंजाणें आमच्या घरीं वाढलें. चांगलाच पुढें घरोबा झाला हें मागें एकदां मीं सांगितलेंच आहे.

बाबांनीं अनंतराव मास्तरांच्या मुलाला घरीं आणलें तेव्हां मी कांहीं तरी एकटीच खेळत बसलें होतें. तिथें बाबा आले आणि मला म्हणाले, "काय ताईसाहेब, एकट्याच काय खेळतां आहांत! हा पहा तुमच्यासाठीं एक नवा सवंगडी आणला आहे आम्हीं! याला घ्या तुमच्या खेळांत! भांडाभांडी करायची नाहीं अं! नीट खेळायचें!"

मी त्याच्याकडे पाहून हंसलें. बाबांच्या अंगावरून उतरतां उतरतां मजकडे पाहत तोही हंसला. निदान तो हंसला असें मला वाटलें. मला कुणी तरी खेळायला हवच होतं नाहीं तरी! बाबांनीं माझ्याकरितां त्याला घरीं आणलं. मला कित्ती कित्ती आनंद वाटला. झालं. क्षणार्धांत त्याची माझी गट्टी जमली. बालपणांत गट्टी जमवायाला असा कितीसा अवकाश लागणार? अन् विशेष कारण तरी कसलं पडणार? मुलं म्हणजे जगाचे धक्के चपेटे सोसलेलीं व म्हणून जगांत एक बाहेर एक अशा दुहेरी रीतीनें मोठी माणसें थोडींच पडलीं, म्हणून ते गट्टी जमवितांना उगाचच आढेवेढे घेतील?

आम्हां दोघांची चांगली गट्टी जमली. मी माझा मांडलेला खेळ दाखवूं लागलें. आईनें मला कोणत्या कोणत्या वस्तु दिल्या आहेत, बाबांनीं काय काय खेळणीं आणलीं आहे; वगैरे वगैरे अगदीं मोकळया मनानें त्याला दाखवूं लागलें; सांगूं लागलें. तोही आनंदानें विचारपूस करूं लागला. माझ्या सांगण्यानें मान डोलवूं लागला. त्यालासुद्धां मग त्याचें कोणते कोणते खेळ आहेत म्हणून विचारलें. " मी तुझ्या घरीं एकदां मुद्दाम तुझे खेळ

पहायला येईन अं ?" असा पोक्तपणाचा भाव आणून त्याला आश्वासन-सुद्धां देऊन टाकलें. त्या वेळी त्याला केवढी धन्यता वाटली म्हणतां !

बाबांनीं सदाशिवाला-( त्या मुलाचें नांव ) माझ्याकडे सोडला आणि आपण माडीवर गेले. जातां जातां ते आईला कांहीं सांगून गेले होते वाटतं. कारण लवकरच आई आम्हीं होतो तिथें येऊन हलकेच डोकावून गेली. जरा वेळानें आणखी आम्हां दोघांकरितां कायसेंसं खायला घेऊन आली. तिनं जेव्हां आम्हांला हांक मारली तेव्हां आम्हीं आमच्या खेळांतून शुद्धी-वर आलों. इतकें आम्हीं खेळांत गुंगून गेलों होतों. माझा तो थाट नी अवतार पाहून आईला जें कांहीं वाटलें तें पुसूं नका. "काय तायडे, आपल्या लटुपटीच्या संसारांत अगदीं रंगून गेली आहेस. कांहीं खायची प्यायची तरी तुला शुद्ध आहे का बघा ! त्यातून तुला हा आज मनाजोगता सोबती मिळालेला आहे ! चावट कुठली !" असें म्हणत आईनें धावत येऊन माझ्या गालाचे एक सारखे मटामट किती तरी मुके घेतले.

अशा रीतीनें सदाशिवाची आणि माझी पहिली ओळख-गट्टी जमली. त्या दिवसापासून मी त्याच्या घरीं नी तो माझ्याकडे नित्य जाऊं येऊं लागलों. आम्हांला एकमेकांवांचून करमेना. आमच्यामुळें आमच्या दोघांच्या आया एकमेकींकडे जाऊं येऊं लागल्या-मैत्रिणी मैत्रिणी बनल्या. सख्ख्या बहिणीबहिणी अशा एकमेकींला मानूं लागल्या.

मी नी सदाशिव एकमेकांचे जिवलग दोस्त बनल्यावर चांगले दीड दोन वर्षांनीं माझ्या आईला नवें बाळ झालें. भय्या झाला त्या दिवशीं मला सदाशिवाच्या घरीं जायलादेखील झालं नाहीं. जशी कांहीं मी त्या दिवशीं त्याला अगदींच विसरून गेलें. पण तोच जेव्हां आपल्या आई-बरोबर आमच्या घरीं आला, त्या वेळीं मला त्याची आठवण झाली. मी धांवत जाऊन त्याच्या कानांत हळूच आमच्या घरांतली गम्मत जम्मत सांगितली. मी दिवसभर त्याच्या घरीं गेलें नव्हतें म्हणून तो माझ्यावर रागावणार होता, माझी गट्टी फू करून टाकणार होता म्हणे; पण मी आमच्या घरांतली मोठी थोरली झालेली गम्मत जम्मत सांगितल्यावर त्याचा उसना राग राहाणार कसा ! तो केव्हांच त्याला न कळतांच

नाहींसा झाला. आणि मलाच तो म्हणाला, "चल, आपण तुझ्या आईचं नवं बाळ पाहूं"

मी लाडिकपणानें त्यांच्या गळयांत हात टाकला नी म्हणालें; "थांब ! थोड्या वेळानं आपण त्या खोलींत जाऊं. प्रथम मी पाहून येतें नी मग तुला घेऊन जातें अं ! " मी त्या वेळीं असं चांगलं आजीबाईचं अवसान आणलं होतं. त्या वेळीं माझ्याकडे कुणाचं लक्ष नव्हतं म्हणून बरं. नाहीं तर सगळीजणीं मला हंसल्याशिवाय राहिलीं नसतीं काहीं !

आमच्या आया आमच्या दोघांच्या आंगतीपंगती करूं लागल्या. आम्ही आमच्याकडे किंवा त्यांच्याकडे जेवायला बसत असूं. ते कित्येकदां एकमेकांच्या सांगांत बसूनसुद्धां जेवत असूं. तो मला भरवी. तर मीही त्याला भरवी !

असे माझे अत्यंत सुखाचे आणि आनंदाचे दिवस चालू होते. भय्याला खेळविण्यांत, त्याला आईनं पाळण्यांत टाकल्यावर पाळणा हलविण्यांत सदाशिव मला मनापासून मदत करीत असे. मला वाटे हें असेंच निरंतर चालायचें. या आनंदांत खंड म्हणून कधीं पडायचाच नाहीं. आमच्या आयांना आम्हीं खेळांत दंग असलों म्हणजे मोठं कौतुक वाटायचं. त्या एकमेकींत एखादे वेळीं सहज म्हणायच्या देखील कीं, "याचं नांव प्रेम ! याचं नांव मैत्री ! किती एकमेकाला जपतात पाहा ! एवढं एकाचं उणं पडलेलं दुसऱ्याला खपत नाहीं. हीच जर मैत्री टिकली. याचींच जर पुढं गांठ पडून जन्मभर एकत्र राहाण्याची यांना संधि मिळाली. तर यांचा जसा आज लटुपटीचा पण सुंदर संसार थाटला आहे. तसाच त्यांचा खराखुरा संसार त्या उभयतांना सुखाचा नाहीं का व्हायचा ? ही बायको नी तो नवरा—"

असं कांहीं तरी बोलतांना आमच्या कानांवर आलं म्हणजे त्याचा अर्थ कळत नसला तरी आम्हांला तें बरं वाटे. तें बोलणं ऐकावेसें वाटे. आम्हांला आनंद होई; पण कां कोण जाणें त्याच वेळीं आम्हां दोघांनाही लाजल्यासारखें होई नी आम्हीं हंसत हंसत तेथून धूम पळून दुसरीकडे जात असूं. त्यामुळें आमचं कौतुक करणाऱ्या आमच्या आयाना अधिकच आनंदाचें भरतें येई !

हा असा आतांचा बालपणींचा काल सुखाचा जात होता. त्यांत खंड कधींसुद्धां पडायचा नाहीं, हीच आमची भावना !

पण ती भावना लवकरच भंग पावली. मला चांगलं कळूं लागलं होतं; मी सदाशिवाबरोबर शाळेला जाऊं लागलें होतें, इतकेंच नव्हे तर भय्यालादेखील गंम्मत म्हणून शाळेंत नेऊं लागलें होतें. आमच्यांत कशावरून तरी उगीचच क्षणजीवी भांडणं व्हायचीं.पण तीं लगेच विसरून जाऊन पुन्हां एक व्हायचं असा काल आला होता.

असें चालू असतांनाच अनंतराव मास्तरांची कुठें दूरच्या ठिकाणीं बदली झाली. त्यांची जाण्याची तयारी झाली. उद्यां सगळी मंडळी सामानासुद्धां जायची तर मला आज कळलं. सदाशिवानंच येऊन सांगितलें कीं, "आम्ही उद्यां आमची बदली झाली म्हणून येथून जाणार आहोंत. पुन्हां कधीं या गांवाला परत येणार नाहीं !" मला तें खरेंच वाटेना. सदाशिव माझी थट्टा करीत आहे असें मला वाटलें म्हणून मी त्याला पहिल्यांदा खोट्यांतच काढलं. पण त्यानें अगदीं गयावया करीत शपथेवर सांगितलें आणि म्हटलें, "आम्हीं तिकडे गेल्यावर तुझ्याशिवाय आम्हांला मुळींच करमायचं नाहीं."

"अन् आम्हांला तरी कसं गमेल ?" मी पण त्याला लगेच म्हणालें. मला अतिशय वाईट वाटलें. आम्हीं दोघेही किती तरी वेळ वाईट तोंडें करून बसलों होतों !

आणि खरेंच दुसरे दिवशीं अनंतराव मास्तर सामानासुमानानासह व सहकुटुंब सहपरिवार परगांवीं जायला निघाले. सदाशिवाची आई आमच्या आईचा निरोप घ्यायला आली होती. आईनें तिला पाटावर बसवून हळदकुंकू देऊन खणानारळांनीं ओटी भरली. तिचे डोळे पाण्यानें भरले होते. आईच्या डोळ्यांतही पाणी सांचले होते. सदाशिव गांवाला जायचा म्हणून तो आनंदांतच होता. त्याच्या हातांत आईनें खाऊ ठेवला. मी अगदीं रडायच्या बेताला आले होते. कुणी तरी मजकडे पाहून मला कांहीं फक्त विचारायचाच अवकाश होता. तें झालेंच शेवटीं ! भय्याला कडेवर घेऊन जवळच उभ्या असलेल्या मावशीबाई मध्येंच म्हणाल्या —

"आतां आमच्या ताईचं कसं व्हायचं ? सदाशिवाखेरीज तिला कसं करमणार ? कां जातेस ताई तूं यांच्याबरोबर ?"

झालं. मावशीबाईंनीं एवढं म्हणाचाच अवकाश होता. माझ्या डोळ्यांतून गंगा यमुना मनमुराद वाहायला लागल्या. मी थैमान मांडला ! मोठीं माणसं परगांवीं जायला निघालीं म्हणजे लहान मुलांची उत्कंठा वाढते, त्यांची तारंबळ कशी उडते त्यांना रडायला किती थोडं निमित्तापुरतं हें ज्यांना माहिती असेल त्यांना मी माझ्याबद्दल लिहितें आहे तें अक्षरन् अक्षर खरं वाटेल ! मी थैमान मांडला बाबा तिथें आले. त्यांनीं माझी समजूत पाडण्याचा प्रयत्न केला.

"तूं त्यांच्याबरोबर जातेस का ? सदाशिवाला आपल्याकडे ठेऊन घेऊं या कां ?" अशा परीनें बाबा माझी समजूत करूं लागले. सदाशिवाला त्यांनीं "रहातोस का रे ताईकरितां ?" असें विचारलें; तें ऐकून बरें वाटलें; पण आपलीं माणसें सोडून रहाण्याच्या विचरानें सदाशिव रडायच्या बेताला आला !

बाबांनीं, आईनें, मावशीबाईंनीं, सदाशिवाच्या आईनें देखील माझी नाना उपायांनीं समजूत घातली. अन् माझं रडूं थांबायच्या आंत मंडळी निघून गेली. त्या दिवशीं मी किती वेळ रडत होतें. माझें रडे केव्हां थांवलें; मी रडूं लागलें म्हणून भय्यानेंही कसें भोकाड पसरलें; आईनें माझ्यावर मी गप्प होण्याकरितां म्हणून हरतऱ्हा करून शेवटीं कसा हात उगारला; त्यावर बाबांनीं आईलाच कसें दटावलें आणि मला जवळ घेऊन माझ्या या आईला तूं का अशी सतावतेस ? आई माझे, ललूं नये असं ! तूं माझी आई आहेस हो ! माझ्या आईसारखी दिसतेस म्हणून मी तुला म्हणतों अं !—लहानपणीं माझ्या आईनं मला सौख्य दिलं. म्हातारपणीं तूं मला कांहीं तरी सुख देशील. म्हणून तुला कुणी त्रास दिलेला खपत नाहीं !" असे किती किती तरी बाबा स्वतःशीच मला त्या वेळीं न समजणारे बोलत होते; वगैरे वगैरे; आतां कांहीं मला त्यांतलें फारसें आठवत नाहीं. पण मला वाटतें मी रडून रडून दमून झोंपी गेलें अन् उठलें त्या वेळीं माझें रडूं थांबलें असावें. नंतर मी फारशी रडलें नाहीं; पण सदाशिवाच्या गोड संगतीची मध्येंच केव्हां तरी आठवण येई नी मनाला

हुरहुर वाटे. त्या वेळीं बाबा मला म्हणत, "कां ? सदाशिवाची आठवण झाली वाटतं ? येतेस कां त्याला भेटायला ? कां त्यालाच इकडे आणूं ? पण आतां भय्या आहे ना तुला खेळायला ?" यावर मी काय उत्तर देणार ? आपली खालीं मान घालून उभी राही, किंवा मानेला हिसका देऊन झटकन् तेथून सटके ! त्या वेळीं मनांत मात्र येई कीं आतां आपल्याला तसा शेजार मिळणारच नाहीं का ?

---

# प्रकरण ४ थें

## बाबांच्या सुखाशा !

एकदां घडी बिघडली म्हणजे पुन्हां पहिल्यासारखी कधीं बसत नाहीं. म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. अनंतराव मास्तर आमचा शेजार सोडून गेल्यावर आम्हांला तसले प्रेमळ शेजारी मिळाले नाहींत. ते गेल्यावर त्यांच्या जागेंत किती तरी लोक आले आणि गेले. पण आमच्या घराशीं त्या नव्या नव्या येणाऱ्या कुटुंबांचा घरोबा असा झालाच नाहीं. उलट कित्येक प्रसंगीं कांहींतरी क्षुल्लक कारणांवरून भांडणेंच झालीं. कुणी आमच्यापेक्षां अतिशय श्रेष्ठ समजून प्रथमपासूनच आमच्यापासून फटकून राहात. तर कित्येक आमच्याहून स्वतःला अत्यंत क्षुल्लक मानून दूरदूरच असत ! प्रत्येकाची आपली निराळीच तऱ्हा असायची ! या कारणानें अनंतरावमास्तर गेल्यानंतर कितीतरी दिवस शेजाऱ्याशीं आमचा तसा निकटचा संबंधच आला नाहीं.

आमच्या घरांतील मंडळींना त्या सर्व मंडळींच्या कितीतरी आठवणी होत असत ! मला सदाशिवाची चार दिवस आठवण राहिली. पुढें पोर-स्वभावाला अनुसरून मी हलकें हलकें सर्व विसरायला लागलें. कधीं आई किंवा बाबा यांनीं जर गोष्ट काढली आणि मला गंमतीनें विचारलें कीं, सदाशिवाकडे येतेस का ? कां त्याला इकडेच आणूं दे? त्या वेळीं मी नुसतीच हंसायची. आतां सदाशिवाला आणावेंच किंवा पांखरासारखें भुर्रदिशीं उडून तो जिथें असेल तिथें जावें असें मात्र वाटत असे ! आणखीसुद्धां

मनाला वाटलें असतें; पण आतां आमचा भय्या चांगला जाणता झाला होता. त्याच्या संगतींत आणखी दुसऱ्या कुणाच्या सहवासाची तितकी आवश्यकता वाटेच असें नाहीं.

भय्या जसजसा मोठा होऊं लागला होता तसतसा बाबांना अतिशयच आनंद वाटत असे. त्याच्यावर बाबांचें किती लक्ष असायचें पण! त्याचे कपडे, त्याच्या अंगावर घालावयाचीं बाळ लेणीं—आईनं सांगायचा अवकाश कीं तीं बिनबोभाट बाबांनी आणायचीच! त्याचं किंवा माझं एवढं कुठं दुखलं खुपलं—जरा आंग तापलं कीं बाबांचा जीव नुसता घाबरून जायचा! सगळीं कामं बाजूला राहूं दे, पण मुलांना संभाळ; असं निक्षून बाबा नेहमीं आईला सांगायचे! इतके बाबा शिकलेले—सुधारक म्हणविणारे ना? पण भय्याला नी मला सजवून आई आपल्याबरोबर कुठें बाहेर घेऊन गेली नी परत आली म्हणजे बाबांनीं आईला सुचवायच कीं, मुलांची अगोदर दृष्ट काढ!

मी व्हायच्या अगोदर आईचे एकदोनदां वाखे झाले होते; भय्याच्या पाठीवर देखील आईचा एक वाखा झालाच! त्याकारणानें आपल्याला ईश्वरानें दिलेलीं फळं आपल्याला नीट लाभावींत; आपल्याला त्यांना संभाळतां यावें ही आतुरता आईला आणि बाबांना साहजिकच अतिशय होती. त्यांचा जीव त्यामुळेंच आमच्या बाबतींत अगदीं हळवा झाला होता. बाबांचं म्हणणं प्रथम मुलांच्या प्रकृती निकोप आणि सुदृढ राहिल्या पाहिजेत. मग त्यांचं शिक्षण आणि संस्कृति! त्यांना घरीं फारसं लक्ष घालायला मिळत नसे; आईलाच सर्व संभाळावं लागे; पण आईला वरचेवर सूचना द्यायला बाबा कधीं कसूर करीत नसत!

अंतःकरणांत बाबा प्रेमळ खरे; पण बाह्यतः ते बरेच उग्र दिसत असत. हें मागें एकदां सांगितलेंच आहे. ते उंचेपुरे—कांहींसे स्थूल. डोळे टपोरे; मिशा थोड्याशा जास्तच! आणि आवाज सहज बोलले तरी मेघ गडगडल्यासारखा, असा असल्यामुळें कोणालाही स्वाभाविकच त्यांचा दरारा वाटे. त्यांत कोणावर कशामुळें तरी रागावलेले असले म्हणजे त्यांचा अगदीं रुद्रावतार भासे. मग त्यांच्यापुढें उभे राहायची कांहीं कुणाची छाती नसे. आईसुद्धां भेदरून जाई; आणि बाहेरच यायची नाहीं! आम्हां

मुलांना कांहीं कळत नव्हतं तिथपर्यंत ठीक असे. आम्हीं खुशाल बाबांच्या अंगाखांद्यावर खेळत असूं. पण जरा कुठें कळायला लागलं तेव्हांपासून आपोआपच बाबांच्या जवळ जायचं नी लाडकेपणा करायचें कमी कमी होऊं लागलें.

मग आम्हीं आईशीं विशेष बिलगूं लागलों. एकादे वेळीं बाबा रागावलेले असले म्हणजे भेदरून आई स्वयंपाक घरांत असायची, आम्हीं—मी भय्या—गडबड करीत असलों तर हलकेंच आम्हांला आईनें हांक मारायची, जवळ घ्यायचं नी सांगायचें 'दंगा करायचा नाहीं अं! बाहेरून रागवून यायचं झालं आहे. उगीच आणखी हें व्हायला नको!' आईचा तो कापरा कापरा आवाज ऐकला आणि बाबांची रागीट मुद्रा वर मान करून एकदां पाहिली कीं झालंच! आमची पण भीतीनं बोबडी वळायची आणि आम्हीं गपचिप आईच्याच कुशीचा आश्रय करायचा! अशा स्थितींत बाबा इकडून तिकडे जातांना सहज खांकरले तर त्यांच्या त्या नुसत्या खांकरण्यानें आमच्या चिमुकल्या छातींत धडकी भरायची. काळीज लक्-लक् करायला लागायचें.

पण बाबांना त्यांच्या या वागण्याची कधीं दादही असायची नाहीं. असायचं कारणही नसे. कारण आम्हांला त्रास व्हावा, आम्हीं भिऊन जावं, अशाकरितां म्हणून ते कधीं वागतच नसत! आणि त्यांच्यामुळें आम्हीं मुलें भ्यालों आहोंत याची त्यांना कल्पनासुद्धां नसे. पण वस्तुस्थिती अशी निर्माण होई इतकें मात्र खरें!

अशा परिस्थितींत आमची वाढ होऊं लागली होती. भय्या व मी नियमितपणें शाळेंत जाऊं लागलों होतों. भय्याची अभ्यासांत संथ पण उत्तम प्रगती होऊं लागली होती. माझं काय? इतर मुलींप्रमाणंच! बुद्धि तरतरीत खरी? पण तिचा विनियोग केवळ सर्व अभ्यासांतच व्हावयाचा नाहीं. आम्हां मुलींच्या सहज सवयीप्रमाणें नटणं, मुरडणं, केशरचना करणं, फॅशनकडे लक्ष देणं, दुसरी कशी नटली आपण कसं सजावं नी तिच्यावर ताण करावी, यांतच दिवसाचा बहुतेक वेळ खर्ची पडायचा! खर्चाला बाबा कधीं कमी करायचे नाहींत. आई कांहीं नको म्हणायची नाहीं. आमच्या मावशीबाईंना तर आम्हांला सजवायची मुलुखावेगळी हौस! मग

उणं कशाला पडतंय ? नटायचं, मुरडायचं, ठुमकायचं, नी शिकण्यापेक्षां आपला देखावा दाखवायला शाळेंत जायचं हें माझं मुख्य काम !

'शाळेंत 'ग म भ न' शिकायचं मावशीबाईंनीं उंदरामांजरांच्या काऊचिमुच्या गोष्टी सांगायच्या, आणि संध्याकाळीं आईनं 'शुभंकरोति' म्हणायला लावायचं; असे आमचे दिवसामागून दिवस वर्षामागून वर्षे व्यतीत होत होतीं.

आमचीं वयें आणि समज हीं वाढत चाललीं होतीं. बाबांचें भाग्य वाढत चाललं होतं. ते केव्हां आईजवळ तर कधीं मित्रमंडळींत भय्याबद्दल उघडपणानें बोलून दाखवीत असत ! मला कळूं लागल्यावर बाबांच्या तोंडून त्यांचे विचार मला ऐकायला मिळाले होते. तो प्रसंग मला अजून आठवतो आहे. तो अगदीं सांगण्यासारखा आहे म्हणून सांगतें:—

संध्याकाळच्या वेळीं आई कांहीं तरी काम काढून बसली होती. बाबा नुकतेच बाहेरून आले होते, दोघांच्याही कसल्यातरी गोष्टी चालल्या होत्या. मी त्या दिवशीं शाळेंत गेलें नव्हतें. आईजवळच माझी लुडबुड चालली होती. भय्याची शाळा सुटावयाची होती. बाबांना भय्याची आठवण व्हायला आणि घरकामाचा गडी समोर यायला एकच गांठ पडली. तेव्हां बाबांनीं त्याला म्हटलें:—

"अरे, भय्याला शाळेंतून आणायला गेला नाहींस अजून ? वेळ झाली आहे ना ?"

गड्याची जरा गडबड उडाली. तो हातांतलें काम बाजूस सारून बाबांनीं आठवण देतांच भय्याला आणण्याकरितां तसाच त्याच्या शाळेंत गेला.

आईला त्याचें मोठें कौतुक वाटलें. ती गालांतल्यागालांत हंसली. तिचें सर्वांग हर्षभरानें पुलकीत झालें. ती हंसत हंसत म्हणाली, 'गड्यालाच कशाला हवं होतं पाठवायला ? भय्याला आतां शाळेंत जायची चांगली संवय झाली आहे. एकटा गेला नी परत आला तर त्यांत काय बिघडेल ? असले भलते हट्ट आतां होतील नी मग पुढें:—"

"पुढें काय होईल अशी तुझी कल्पना आहे ?" बाबांनीं मुद्दामच विचारलें.

" ती संवय पुढें नडेल. दुसरं काय ? "

" असं होय ? मला वाटलं कीं तूं म्हणतेस लाडावून भय्या माझ्या डोक्यावर चढेल ?" बाबांनाही हें बोलतांना हसूं आल्याखेरीज राहिले नाहीं.

" इश्श्य ! " आई एवढेंच उद्गारली. बाबांच्याकडे एकदां किंचित् स्थिर दृष्टीनें पाहिलें नी मग चट्दिशीं तिनें आपली मान खालीं वळविली.

" तर काय तुझं म्हणणं भय्याला असा आतांपासून चौकीपहाऱ्यांत वाढविला तर तो भित्रा, बावळट होईल !" बाबांनीं आणखी एकदां असें बोलून आईची गंमत केली. आपल्या वागण्याबोलण्यानें आईला मौज वाटत आहे, आनंद होत आहे हें बाबांना कळत होतें; बाबा किती उत्कृष्टपणानें वागत आहेत; घरांतील मुलांमाणसांना आपल्या ऐपतीप्रमाणें जास्तींत जास्त सुखांत राखण्याचा त्यांचा प्रयत्न कसा चालला आहे, हें आईलाही समजत होतें आणि म्हणून संसारांतल्या एका विशेष सुखाचा दोघेही मनमुराद आस्वाद घेत होतें. त्या वेळीं त्यांतलं स्वारस्य कळण्याइतकं माझं वयच नव्हतं ! आई हंसली कीं, मी हंसायची. बाबा हंसले कीं, मला हंसावस वाटायचं इतकंच !

भय्या अजून शाळेंतून यायचाच होता. बोलणं त्याच्यासंबंधानंच चाललं होतं. त्या वेळींच बाबा हंसतां हंसतां एमदम किंचित् गंभीर झाले आणि आईला म्हणाले: —

" हें पहा; जो तो आपल्या नशिबानं आणि भाग्यानें घेत असतो. भय्याचं नशीब आज गडीमाणसं राबविण्याचं आहे. त्याच्याच नशिबानें मी म्हणतों, आज माझी चलती आहे. पैशाला कमी नाहीं; मानाला उणं नाहीं; कीर्तींत अडथळा नाहीं. जग माझा उदोउदो करीत असतां मी माझ्या मुलाबाळांचं कोडकौतुक करायला नको काय ? मी लहान असतांना मी आणि माझ्या आईनें अनेक हालअपेष्टा सोसल्या आहेत. प्रतिकूल परिस्थितींच्या फेऱ्यांत सांपडून माझ्या आईला दुसऱ्याच्या घरीं स्वयंपाकासारखीं हलकीं कामं करावीं लागलीं आहेत. मला माधुकरी मागावी लागली आहे. वार लावून जेवण मिळवावं लागलं आहे. पण मला मोठं करण्याकरितां, कर्तबगार बनविण्याकरितां निमूटपणें—निश्चयानें, डोळ्यांतलें पाणी डोळ्यांतच दाबून ठेवून, आईनं तें सारं केलं आहे. तिच्या आज्ञेनं मी 'ॐ

भवती' करीत असतां किंवा वारावर जेवीत असतां मनाला चलबिचल होऊं दिलं नाहीं. मन घट्ट केलं आणि भावी भाग्यावर नजर देऊन प्राप्त कर्तव्य पार पाडलं म्हणूनच मी आजचे सुखाचे दिवस पाहिले, तुम्हांला दाखवितां आले. माझ्या लहानपणीं मला तसं भोगावं लागलं म्हणूनच माझ्या भय्याला दुःखाची किंचितही झळ लागू नये अशी माझी इच्छा आहे. जितकं त्याला सुखांत ठेवतां येईल, सुखानं वाढवितां येईल तितकं मी अवश्य अवश्य करीन! तो लहानपणीं माझ्यामुळें सुखांत वाढला, मला त्याला कर्तबगार बनवितां आला, आणि ऐन उमेदींत तो कर्तबगार झालेला--जगांतलीं अनेक तऱ्हेचीं उत्तमोत्तम सुखं आपल्या हातांनीं जवळ ओढीत असलेला माझ्या दृष्टीला पडला म्हणजे माझ्या जन्माचं सार्थक झालें असें मी होईल.

बाबा आणि आई या वेळीं तें दिव्य सौख्य उपभोगीत होते. बाबांना भय्याचा भावी उज्ज्वल काल आतांच सुंदर रंगांनीं चितारलेला डोळ्यापुढें दिसत आहे असें वाटत होतें; तर बाबांनीं कल्पनेसमोर उभीं केलेलीं आपल्या मुलांच्या सुखाचीं रम्य चित्रं पाहत असतां आई त्यांतच पूर्णपणें रंगून जाऊन तिच्या हातांतलें काम तसेंच्या तसेंच राहिलें होतें.

आई अशी चित्रासारखीं तटस्थ बसली होती, तर बाबांनीं वाचायला घेतलेला वर्तमानपत्राचा अंक छातीवर तसाच अस्ताव्यस्थ पडला होता. दोघांना भान कुठें होतें? त्या दोघांना त्या क्षणीं माझं तिथलं अस्तित्व तरी ध्यानांत होतं का नाहीं हें देव जाणें!

जागृतावस्थेंतील त्यांच्या सुखाच्या समाधीचा भंग झाला, तो त्यांच्यापुढें भय्याच येऊन उभा राहिला म्हणून! स्वप्नांचं सुख संपलं आणि प्रत्यक्ष सुखनिधान समोर येऊन उभं राहिलं. एका सुखाला दुसऱ्या सुखानं खो दिला म्हणूनच बरं झालें. बाबांना आणि आईला त्या सुखसमाधीचा भंग झाला म्हणून वाईट न वाटतां उलट हर्षाच्या उकळ्या फुटल्या क्षणमात्र असा विलक्षण गेला कीं समोर उभ्या असलेल्या भय्याला प्रथम जवळ ओढून घेऊन त्याचे पटापट मुके घ्यायचे कुणीं? आईनं कीं बाबांनीं? विचारांच्या हेलकाव्यांत दोघांनाही जागचें चटकन् कांहीं हलवलें नाहीं. "ये-ये बाळ, भय्या, ये रे," असं दोघांनीं त्याला हातांनीं जवळ यायला खूण केली, कुणीकडे जावें अशी भय्याला देखील पंचाईत पडली, तो

दोघांच्या तोंडाकडे टकमक पाहत जागच्या जागीं थबकून उभा राहिला. त्या क्षणाचा मी बरीक चांगलाच फायदा घेतला. मी आपली चट्दिशीं उठलें; पट्दिशीं भय्याजवळ गेले नी "भय्या, आलास शाळेंतून?" असें म्हणत मट्दिशीं त्याचा मुका घेऊन मी मोकळी झालें! मी तें सारं मुद्दाम केलं होतं असं नाहीं, आपलं सहजासहजीं माझ्या हातून झालें.

पण त्यामुळें खळबळाट काय उडाला? बाबा आपल्या जागेवरून उठले आई उठली, दोघांनीं आम्हां दोघांना एकत्र कवटाळलें आणि प्रेमभरानं दोघांनीं आम्हां दोघांचा जो कांहीं लाडीकपणानें कुसकरा केला तो कांहीं पुसूं नका!

आम्ही त्या स्थितींत किती वेळ होतों कोण जाणें!

आंत जेव्हां चहाफराळाचं खडबडलं कपबशा आदळल्याचं ऐकायला आलं, 'स्टोव्ह' चा फर्रर आवाज कानांत घुसला आणि भय्यानं आणि मी संगनमतानं जेव्हां "आई, भूक लागली-खायला दे कीं," म्हटलं; तेव्हां आम्हीं तेथून हललों. आंत जायला उठलों तोंच आंतून मावशीबाई चला चला म्हणून बोलवायला बाहेर आल्या.

लहानपणींच्या त्या सुखाची जागृति झाली म्हणजे मनाला अजूनही कशी गोड हिरहिरी येते. अन तें अगदीं साहजीक नाहीं का?

---

## प्रकरण ५ वें

## वीस वर्षांनंतर!

"भय्या, ए भय्या, अहो शिष्टविशिष्ट, अहो तुम्हीं स्कॉलर, थांबा जरा! अस्मादिकांची स्वारी येत आहे ना? काय नाहीं थांबत? अगदीं आपल्याच तोऱ्यांत? हें नाहीं चालायचें अं आमच्या पुढें? कुठें जातोस पाहातों आमच्यापुढें? तुझ्या सायकलीवर सायकल घालून असा तुझ्या मार्गांत आडवा आलों म्हणजे!"

" अरे ! हें काय बाबू ! जरा शिष्टपणानें वागशील कीं नाहीं ? "

" शिष्टपणा जाऊं दे मसणांत ! आतां कसा थांबलास ! नाक दाबल्याशिवाय तोंड उघडत नाहीं म्हणतो तें उगाच नाहीं ! माझ्यापुढें जात होतास नाहीं का ? माझ्यापुढें कुणाची जाण्याची छाती आहे ? आपल्या कॉलेजांतला कोणता प्रोफेसर जाईल ? अरे, प्रोफेसरच काय ? पण खुद्द प्रिन्सिपलसाहेब जरी सायकलवरून चालले असले आणि मीं हटकलें तर उभे राहिल्याशिवाय पुढें जाण्याची त्यांची माझ्यापुढें प्राज्ञा नाहीं हें तुला माहित आहे ना ? असें असतां तूं माझ्या हांकेकडे दुर्लक्ष करून पुढें जातोस म्हणजे काय गोष्ट आहे ? भय्या–"

" बाबूराव, तुम्हीं पराक्रमीच तसे आहांत हें मला कबूल आहे–"

" कबूल आहे म्हणजे कबूल केलें पाहिजे तुला ! हातच्या कांकणाला आरसा कशाला पाहिजे ? तो पहा समोरून टिटवीच्या पायाचा–कबूतरासारखा डौलतां सायन्सचा प्रोफेसर येतो आहे. त्याला थांबवून दाखवितों. त्याच्या पाठीवर बरोबरीच्या नात्यानें थाप मारून त्याची चौकशी करतों, त्याच्या हातांत शिगारेट देतों नाहींतर त्याच्याकडेच मागणी करतों. पहा तर चमत्कार. म्हणजे तुझी खात्री पटेल भय्या. आणि मग माझ्याशीं तूं असा तुसडेपणानें वागणार नाहींस ! याच एका प्रोफेसराशीं अस्मादिक असें वागतात असें नाहीं, तर वाटेल त्या प्रोफेसराशीं वागायला सांग. चॅलेंज करून वागवून दाखवितों. तो कोळशाचा ढिगारा--तो मुंबईचा राजाबाई टॉवर, तो पिटकुला उंदिरमामा, नाहींतर ' अगबाई ' करीत मान लचकावीत चालणारा तो ' महाश्वेता ' नामाभिधानास पात्र असलेला नाजूक प्रोफेसर असूं दे- अस्मादिकाजवळ सब्घोडे बाराटक्के आहेत, हें सिद्ध करून दाखवितों. "

" बाबूराव, काय बडबडतोस हें ? बोलतांना जरा जिभेला हाड ठेवीत जा ! " भय्या बाबूरावावर चिडून जाऊन म्हणाला, " आपल्या प्रोफेसराबद्दल असें बोलतोस याचा अर्थ काय ? कांहीं झालें तरी ते प्रोफेसर आहेत; तूं विद्यार्थी आहेस. तुझ्यासारख्या विद्यार्थ्यांची प्रोफेसरासंबंधीं वाटेल तें बोलण्याची योग्यता--"

" हॅः हॅः हॅः हॅः हॅः ! भय्या ! मी विद्यार्थी असून ज्याअर्थी प्रोफे-

सराबद्दल वाटेल तें बोलतों, यावरूनच माझी योग्यता काय आहे हें ठरत नाहीं काय ? बाबूरावानें भय्याच्या रागाकडे दुर्लक्ष करून निल्लाजरेपणानें हॅः हॅः करीत म्हटलें, " बाबूराव, मला हें तुझें असलें बोलणें मुळींच पसंत नाहीं. तुला बोलायचें असलें तर नीट बोलत जा. नाहींतर माझ्याशीं नाहीं बोलला तरी चालेल. कोणाही प्रोफेसराबद्दल अनुदार उद्गार काढलेले ऐकणें मला प्रशस्त वाटत नाहीं ! " असें म्हणत भय्या बाबूरावाशीं बोलणें सोडून तसाच लगबगीनें मार्ग काटूं लागला. पण एवढयानें बाबूराव त्याचा पिच्छा सोडणार थोडाच ! तो तसाच घाईनें त्याच्या मागोमाग आलाच.

" काय रे भय्या, प्रोफेसराबद्दल आम्हीं थट्टेनें काय वाटेल तें म्हटलं तर तुला रे का राग यावा ? माणसानें कुणाची करमणुकीकरितां थट्टा करूंच नये वाटतें ? अन् तूं तरी एवढा तिरसटपणा धरून काय करणार रे ? ते प्रोफेसर आमचे सातजन्मीचे वैरी आहेत आणि तुझे काय काके--मामे लागून गेले आहेत काय ? तर त्यांची थट्टा केली तर तुला अगदीं असा राग यावा ? छट् ! आम्हांला नाहीं बोवा तुझ्यासारखीं पुस्तकांतले किडे होऊन राहाणारीं मुलें आवडत ! म्हणे स्कॉलर ! स्कॉलर म्हणून घ्यायचें आणि असें मेंगें मिसमिशीत असायचें हें नाहीं बोवा आपल्याला मुळींच पसंत ! "

" पण मी वागतों तें दुसऱ्याच्या पसंतीकारितां मुळींच नाहीं ! " भय्या-साहेब स्वतःशींच पुटपुटला ! " आपल्यालाही असा हुच्च उपरेपणा मुळींच पसंत नसतो ! "

" हं ! हं ! असं का ? " बाबूराव भय्यावर गुरगुरला " भय्या, लेका, तुलाही एक दिवस आमच्या हुच्च उपरेपणाच्या पंक्तीला आणून बसवीन तरच नांवाचा बाबू म्हण अं ! "

इतकें झाल्यानंतर मध्येंच वाटेंतून चालतां चालतां दोघांचेंही बोलणें थांबलें. मध्येंच रस्त्याचे दोन फाटे लागले. भय्याला वाटलें, बाबू आपल्या घराकडे वळेल. पण तसें झालें नाहीं. तो तेथेंच थांबला व त्यानें भय्यालाही थांबावयास लावलें.

" भय्या, तूं आमच्या घरीं चल ! "

" कां ? मला यायला वेळ नाहीं ! "

" बरं तर ! नको येऊंस ! मी तुझ्याकडे येतों ! "

" कशाला ? कांहीं काम आहे का ? "

" काम काहीं नाहीं. उगीचच ! "

" उगीचच ! पण मी लवकरच बाहेर जाणार आहें ! "

" बाहेर कुठें ? हं ! हं ! त्या मिस् कमला केतकराकडे कोर्टिंग करायला वाटतं ! वाः ! भय्या ! इतक्यांत इतकी मजल मारलीस वाटतें ? आहे बुवा ! "

" बस्स कर बाबूराव तुझा फाजीलपणा. " भय्या त्रासिकपणानें उद्गारला.

" वाः ! भय्या ! तूं चांगला कोर्टिंग करतो आहेस. तिच्या घरीं बैठक मारण्यापर्यंत प्रगती केली आहेस, तरी आम्हीं नुसतें बोलूं सुद्धां नये वाटते ! भय्या, I congratulate you ! " अरे, या बाबतींत तूं आम्हांला जिंकलेंस खरें ! मी त्याबद्दल तुझा हेवा करतों. अरे, त्या फॅशनेबल पोरीचें लक्ष आमच्याकडे वेधावें म्हणून आम्हीं कांहीं थोडेथोडके नाहीं प्रयत्न केले ! पण इतकें करून आम्हाला जें साध्य झालें नाहीं, तें तुला प्राप्त झालं. कांहीं हरकत नाहीं. तुला तर तुला ! बरें पण काय रे--"

" बाबू ! पुन्हां बजावतों तुझा असला भलता फाजीलपणा मला खपायचा नाहीं अं ! तुला नीट बोलायचें असेल तर बोल नाहीं तर—"

" सोडून दिला विषय ! आज यापेक्षां मुळींच बोलत नाहीं ! या विषयावर पुन्हां बोलावें असें तुला वाटल्याखेरीज बोलणार नाहीं मग तर झालं? बरं, भय्या, तुझ्या घरीं तरी येऊं काय ? "

" कशाला ? "

" तुझ्या सिस्टरला भेटायला ! चार दिवसांत तिला मी मुळींच भेटलों नाहीं ! आपल्याला बुवा तुझ्या सिस्टरचा स्वभाव फार आवडतों ! खरें सांगतों तुला भय्या, कॉलेजमध्यें जाणाऱ्या दिखाऊ-नटव्या पोरींच्या नादीं लागून फसण्यापेक्षां आणि शेवटीं पश्चात्ताप करून घेण्याची पाळी आपल्यावर आणण्यापेक्षां आपलं जीवित सुखाचं आणि प्रेमाचं व्हावं अशी इच्छा धरायची असेल तर तुझ्या सिस्टरसारखीच जिवाची सोबतीण पाहिजे असं माझं ठाम मत झालं आहे ! मला फटकळ म्हण पाहिजे तर ! पण आपण

तर ठरविलं आहे कीं करायचं लग्न तर तुझ्या सिस्टरशींच ! मी माझा हा निश्चय आज तुझ्याजवळ बोलून दाखविला आहे; तूं माझा दोस्त आहेस म्हणूनच मोकळया मनानं तुझ्याशीं हें बोललों आहे ! एक दिवस प्रसंग पाहून तुझ्या वडिलांच्याजवळही बोलण्याचें धाडस मी करणार आहें; हें मी तुला आजच सांगून ठेवतों ! तुझा संसार त्या कॉलेजगर्लशीं सुखाचा होऊं दे ! त्यांत मला आनंदच आहे ! पण माझा संसार मी तुझ्या सिस्टरच्या सहवासांतच सुखाचा करीन ! हें मात्र खचीत ! ”

बाबूराव फटकळ होता. मनांत येईल तें वरीलप्रमाणें बेछूटपणानें बोलत होता. आपलें बोलणें भय्याला रुचतें किती, पचतें किती, हें बाबूराव मुळींच पहात नव्हता ! बाबूरावासारखी जरा अधिक असणारी मुलें अशींच असतात. त्यांना दुसऱ्याच्या मनाची कल्पनाच नसते. ते आपल्याच आचरटपणांत गर्क असतात. स्वतःला सगळया जगाहून शहाणे समजत असतात आणि त्या जोरावर जगांत वाटेल तो फाजीलपणा बोलतात आणि तसेंच आचरण करण्याचीही त्यांची तयारी असते. असलाच नमुना म्हणजे भय्याचा कॉलेजमध्यें नुकताच झालेला स्नेही बाबूराव होता. बाबूराव माझ्याबद्दल अद्वातद्वा बोलत असतां वास्तविक भय्यासाहेब मनांतल्या मनांत अतीशय चिडला होता. बाबूरावाचा त्याला मनस्वी संताप आला होता. पण जात्याच भय्याचा स्वभाव मलूल, न बोलका आणि दुसऱ्याला न दुखविणारा असल्यामुळें त्याचा सारा राग-संताप आंतल्या आंतच धुमसे. बाहेरच येत नसे. आणि याच त्याच्या स्वभावाचा फायदा बाबूरावासारखा आचरट भरपूर घेई. हवे तें बोले !

बाबूराव भय्याला स्नेही म्हणवीत असे. पण भय्या त्याला तसा उलट मानी कीं नाहीं कोण जाणें ! कॉलेजांतच दोघांची ओळख झाली होती. एकदां वाटेंतून जातांना पिसाळलेलें वाटेवरील कुत्रें भय्यावर चाल करून येत असतां, त्याच्या तावडींतून बाबुरावानें सहजगत्या भय्याला सोडविले होतें आणि म्हणूनच भय्या त्याला थोडेसें मानीत असे, इतकेंच; परंतु तेवढ्याच जोरावर बाबुरावानें भय्याशीं मैत्रीचें संधान जुळवून आमच्या घरांत शिरून आमच्याशीं अघळपघळ मजल मारली होती ! तो आमच्या घरीं अगदीं ऐसपैस वागे ! भय्याचे स्नेहीसोबती भय्या आपल्या स्वभावानुरूपच निव-

डणार अशी सर्व साधारण बाबांची समजूत असल्यामुळें बाबुराव जरी घरीं आला गेला तरी बाबांची तीक्ष्ण दृष्टी त्याच्याकडे कधींच गेली नाहीं. मात्र कां कोण जाणें बाबुरावाचा स्वभाव, त्याचें फटकळ बोलणें, अधिक प्रसंगीं वागणें मला मुळींच आवडत नसे. तो जसजसा माझ्याशीं लगट करूं पाही तसतशी मी त्याच्या थाऱ्यालाही उभी राहण्याचें टाळी ! आम्हां बायकांना पुरुषांच्या स्वभावांतल्या खोडी उपजतच कळतात कीं काय हें कांहीं मला सांगतां येत नाहीं; पण एवढें खरें कीं, आमच्या मनानें एकाद्याबद्दल वाईट ग्रह घेतला, तर कधींना कधीं तेंच खरें झालेलें आढळून येतें. तसेंच बाबुरावाच्या बाबतींत व्हायचं होत कीं काय ? आणि म्हणून त्याच्याबद्दल मला बरें वाटत नसे कीं काय कोण जाणें ! या बाबूरावासंबंधीं आणखी थोडी जास्त माहिती इथेंच सांगून टाकण्यासारखी आहे. हा बाबूराव जसा बोलका–कुठेंही घुसून आपल्या बोलण्यानें, वागण्यानें अगदीं विश्वामित्राचा आव आणणारा; तोच प्रकार त्याच्या घरच्या मंडळीसंबंधानें होता. त्याचे आजारी वडील, आई आणि एक धाकटा भाऊ इतकीच काय ती त्याची घरीं मंडळी होती. त्याचे वडील बापूसाहेब सर्व कुटुंबासह गुलबर्ग्याकडे बरींच वर्षें होते. "**तोयो मेनका कैशा**" नांवाच्या एका जपानी कॉटन ट्रेडिंग कंपनीचे बापूसाहेब फार वर्षें एजन्ट असून त्यांत त्यांनीं बराच पैसा मारला होता. ते एकाएकीं अपंग झाल्यावर गुलबुर्गा सोडून ती मंडळी नुकतीच पुण्यास आली होती ! दोन्ही मुलांचें शिक्षण व्हायचें होतें म्हणून बापूसाहेब दोन्ही मुलांना घेऊन पुण्यास आले. बाबूराव लहानपणापासूनच बेछूट–बेजबाबदार रीतीनें वागावयाला शिकलेला. त्यांत त्याच्या आईची त्याला पहिल्यापासूनच फूस ! तीही बाई म्हणजे अगदीं बाबूरावाला खरींच आई शोभण्यासारखी ! जसा कांहीं सगळया जगांतला शहाणपणाचा मक्ता तिनें घेतलेला ! कोणाही पुरुषाला "अरे तुरे" आणि कुणाही स्त्रीला "अग–तुग, तूं माझ्या मुलीसारखी !" असें म्हणण्याची त्या बाईला उपजतच खोड होती कीं काय कोण जाणें ! बाबूरावाची आणि भय्याची कॉलेजांत जरा जास्त ओळख झाल्यावर जेव्हां तो आपल्या आईला आमच्या घरीं आमच्या आईला भेटण्याकरितां घेऊन आला, त्यावेळीं त्या बाईनें पहिल्याच भेटींत माझ्या आईच्या तोंडावरून

हात फिरवून ‘ तूं माझ्या मुलीसारखी ’ म्हणून आपला स्वभावविशेष व्यक्त केल्याचें माझ्या चांगलें ध्यानांत आहे. तिचा तो लघळपणा मला त्यावेळीं विशेष कळत नव्हतें तरी मला बरा वाटला नाहीं ! त्यानंतर ती मंडळी आमच्या वरचेवर जाण्यायेण्यानें चांगलीच परिचित झाली होती पण त्या सर्वांबद्दल आमचा–निदान माझा तरी अनुकूल ग्रह असा कधींच झाला नाहीं. थोडक्यात सांगायचें म्हणजे आईचे गुण मुलांत तंतोतंत उतरले होते आणि मुलें वाह्यांत व्हावयाला आईच बव्हंशानें कारण होती असें म्हणावयाला मुळींच हरकत नाहीं !

याप्रमाणें बाबूरावाची आणि त्याच्या घरच्या मंडळींची हकीकत होती. त्याची आई वरचेवर आमच्या घरीं येई. माझी आई तिचा परामर्ष घेई. तिच्या इच्छेप्रमाणें तिला मोठेपणाही देई ! पण तिच्यापासून विशेष कसली अपेक्षा मात्र करीत नसे. ती बाई तोंडावर भारी गोड बोले. यथास्थित साखर पेरी. पण पाठीमागें आमच्या घरांतल्या सर्वांची निंदा मनसोक्त करी, असें पुढें पुढें आमच्या प्रत्ययाला आलें होतें. आमच्या श्रीमंतीचा उपहास–माझ्या आईच्या आजाराची कुचेष्टा; भय्याच्या बावळटपणाबद्दल टीका ! माझ्यांतल्या नसत्या अवगुणांची चर्चा; असें चालत असल्याचें आमच्या कानांवर येऊं लागलें. एकदां तर आमच्या मावशीबाई त्यांच्या बोलावण्यावरून त्यांच्याकडे थोडा वेळ सहज बसायला म्हणून गेल्या; तर त्या बाईनें मावशीबाई जवळ आपल्या घरांतल्या सर्वांची स्तुति आणि आमच्या घरांतल्या यच्चावत् माणसांची मनसोक्त निंदा चालविली. हें आम्हांस परत आल्यावर मावशीबाईनींच सांगितलें.

अशा घरांतला बाबूराव ! तेव्हां तो स्वैराचारी, अहंमन्य, आणि आचरट असल्यास नवल काय ? आणि मग अशांचे आम्हांला बरें वाटलें नाहीं; तर त्यांत आश्चर्य तरी कसलें ?

तो बाबूराव भय्याशीं मैत्री करून आमच्या घरांत घुसला होता, माझ्याशीं लगट करूं पाहात होता; नानाप्रकारानें मला त्रास देण्याचा उद्योग करीत होता; हें ओघासच आलें होतें. मी त्याला टाळीत असें. त्याच्याबद्दलचा तिरस्कार भय्याजवळ वेळोवेळीं बोलून दाखवी आणि भय्याही माझी योग्य शब्दांनीं समजूत घाली आणि बाबूरावाला वेळोवेळीं

योग्य शब्दांत समजही देई. पण त्याचा लोचटपणा दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणांतच होता. मी त्या संकटांतून कायमची सुटेन कशी या विवंचनेंत पडलें होतें.

सध्याचे आमचे दिवस असे चालले होते. भय्याच्या पाठीवर एक दोन वेळां आईचे वाखे झाल्य मुळें आईची प्रकृति नेहमीं रुईझुई करूं लागली होती. ती आतांशा तर अगदीं अंथरुणाला खिळूनच होती. तिच्या सेवे-शुश्रूषेपुढें मला माझ्या अभ्यासाचें आणि शाळेचें महत्त्व कधींच वाटलें नाहीं. मी कधींच शाळा सोडून दिली होती. भय्याला तसें करणें शक्य नव्हतें व इष्टही नव्हतें. तो दरवर्षी उत्तम प्रकारें पास होत होत आतां कॉलेज प्रविष्ट झाला होता इतकेंच नव्हे; तर कॉलेजांत स्कॉलर म्हणून गाजत होता तो आपला अभ्यास वगैरे संभाळून माझ्याप्रमाणेंच आईच्या उशाशीं येऊन बसे. आईचा परामर्ष घेई, तिची सेवाचाकरी करी व आईला आपल्या वर्तनानें आनंदीत करीत असे. आमचें वर्तन पाहून बाबांना किती तरी बरें वाटत असे. ते आमच्या वर्तनाचें कौतुकच करीत!

आमच्याशीं आतांशा ते अगदींच थोडेच बोलत नेहमीं आपल्या व्यव-सायांतच मग्न असत! पण जेवढें बोलत त्यांत, त्यांचें पितृवात्सल्य पूर्ण प्रतिबिंबित झालेलें दिसे आणि आम्हांला अत्यंत आनंद वाटे! बाबा आणि आई ज्या ज्या वेळीं अलीकडे बोलत असत त्या त्या वेळीं काय केलें म्हणजे आईच्या अंतःकरणाला समाधान वाटेल हें पाहण्याकडे तसें विचा-रण्याकडे बाबांचा कल असे; तर आईही अगदीं मोकळया अंतःकरणानें मनासारखा आपल्याला जावई मिळावा आणि लक्ष्मीसारखी सून घरीं वाव-रतांना पाहावी, अशी आपली मनापासून इच्छा आहे तेवढें झालें म्हणजे आपण सुखानें आणि आनंदानें डोळे मिटूं, असें सांगत असे. बाबांच्या चालू संसारांत आईचा आजार एवढेंच काय तें वैगुण्य होतें. एवढेंच शल्य त्यांना बोचत असे. बाकी सर्व कांहीं ठाकठीक असे. बाबा आईचें सांत्वन करीत. "तुझ्या मनासारखें सर्व कांही करूं पण तूं असे उदास उद्गार उद्गारूं नकोस" असे तिला म्हणत व धीर देत!

आम्हांला तें सारें कळूं लागलें होतें. मी किंवा भय्या आईला किंवा बाबांना चुकूनही त्रास होईल असें वागत नसूं. आम्हांला व्यवहारांत पड-

तांना जगाचे धक्केचपेटे घेतांना त्रास होई. पण तो आमचा आम्हीं सहन करीत असूं, त्याची तक्रार आईपर्यंत किंवा बाबांपर्यंत नेत नसूं. मी भय्याला सांगे भय्या मला सांगे. आम्हीं एकमेक विचारविनिमय करीत असूं. आणि एकमेकांना मार्ग सुचवीत असूं !

बाहेर जें कांहीं नवलविशेष घडेल तें भय्या आम्हांला मन मोकळे-पणानें सांगत असे. आईला बरें वाटेल असें तो बोले. भय्याचें मन कॉलेजमधल्या कमला केतकरकडे ओढ घेऊं लागलें होतें; हें खरें होतें. त्याच्या बोलण्यावरून तें मी प्रथम ताडलें. नंतर हलकेंच युक्तीनें मी त्याच्याकडून काढलें होतें. त्यानेंही आढेवेढे घेऊन शेवटीं मजजवळ कबूल केलें होतें. मी पण तें गोड गुपीत आईच्या कानांत केव्हांच सांगून टाकून, " आई, तुला अशी अशी शहाणी सून आणि मला वहिनी लवकरच येऊं घातली आहे " असें म्हणून आईला आनंदीत केलें होतें. माझ्या इच्छेच्या विरुद्ध बाबूरावाचें नांव घेऊन भय्या आईदेखत मला चिडवी, पण त्यांत अर्थ नव्हता. आईला तें आवडत नव्हतें. मला जें पसंत नव्हतें; आणि भय्यालाही तें मनापासून नको होतें. पण तो नुसतें चिडवीत असे इतकेंच !

आई जेव्हां भय्याला कॉलेजमधल्या कमला केतकरबद्दल विचारी तेव्हां स्पष्ट जरी नाहीं, तरी एकंदरीनें अन्यप्रकारें आईजवळ आपला हेतु भय्या दिग्दर्शित करी. आईला तें बरें वाटे व त्याच वेळीं ती म्हणे, " तसेंच माझ्या ताईचं एकदां माझ्या मनासारखं झालं म्हणजे मला हायसें होईल !" सांगायला मला लाज वाटतें पण सांगतेंच, अशा वेळीं मला देखील वाटे कीं, " खरेंच, माझ्या भाग्याचा देव कोण आहे ? कीं तो मला भाग्याला चढवील आणि माझ्या प्रेमळ आईलाहि माझ्या भाग्याच्या उजरीनें संतोष देईल ? " ईश्वरानें प्रत्येकाच्या भाग्याची योजना आगाऊच केलेली असते; अगदीं जवळपासच भाग्याचें ठिकाण सज्ज असतें, पण त्याची दखलगिरी मनुष्याला ऐनवेळेपर्यंत नसते; एवढीच गंमत ईश्वरानें करून ठेविलेली असते. म्हणूनच मानव चकतो–भुलतो–भांबावतो–आणि आश्चर्यचकितही होतो ! अगदीं असेंच सध्यां आमच्या घरीं झालें नव्हतें का ?—

---

# प्रकरण सहावें

## दैवी धागेदोरे

जरी आई नेहमीं आजारी असे तरी तिऱ्हाईत पाहणाऱ्याला तसं वाटत नसे. म्हणून ती आपल्या आजाराचें स्तोम कधींच माजवीत नसे. ‘ या बाईचं काय श्रीमती दुखणं ’ असे कुणी म्हणेल कीं काय याला सुद्धां ती जपत असे. इतरांचे कशाला? मला किंवा भय्यालासुद्धां आपली आई आजारी आहे, आपण आपल्याकरतां तिला कसलाही त्रास देऊं नये उलट तिला आराम वाटेल अशीच आपली वागणूक ठेवावी हें आमच्या ध्यानीं मनीं न राहून तिला कित्येकदां त्रास देत असूं. पण बाबांचें तसें नव्हतें. आईची प्रकृति ढासळली आहे, तिच्या जिवाला चैन नाहीं डोळ्यांत तेल घालून तिला जपलें नाहीं तर देवानें दिलेल्या आपल्या सुखाचा शेवट केव्हां होईल याचा नेम नाहीं ही बाबांच्या मनांत सदासर्वकाळ धुगधुग असे. ते प्रसंगीं आईजवळ तसें बोलूनही दाखवीत. बाबा एखादे वेळीं बाहेरून आले किंवा बाहेर जावयाचे असले आणि त्यांना कांहीं हवें असून त्यांच्याकडे घरांतल्या कुणाचें लक्ष नसलें व हें आईच्या लक्षांत आलें म्हणजे स्वतःला विसरून ती बाबांची सुखसोय पाहण्याकरतां गडबडून उठे व स्वतां कामाला लागे. तेव्हां बाबा आईला म्हणत ‘ तुमचें तुम्ही नीट जपून वागा म्हणजे झालें. आमच्याबद्दल तुम्हांला नको काळजी. तुमच्याबद्दलची काळजी आमची आणखी वाढवूं नका म्हणजे आम्ही सर्व कांहीं भरून पावलों. कशा तुम्ही अशा प्रकृतीनें अधु निघालांत देव जाणे. देवानें आम्हांला सर्व बाजूनें सुखांत वैभवांत ठेवलें आहे खरें, पण तुमच्या बाबतींत मात्र ही अशी काळजी आमच्या मागें लावली आहे. म्हणून वरचेवर आम्ही तुम्हांला बजावीत असतों कीं काडीमात्र तखलीफ न घेतां नुसत्या पडून राहिलात तरी आम्हांला चालेल. पण भलतीच धडपड करून शूरपणा दाखवून आम्हांला अधिक काळजींत घालत जाऊं नका.

आज बाबा कांहीं कामानिमित्त मुंबइला निघाले होते. त्यांच्या जाण्याची तयारी करावयाची होती. पण मावशीबाई किंवा घरांतली इतर मंडळी यांचे

त्याकडे जरा दुर्लक्ष झाल्यासारखं वाटलं म्हणून आई स्वतां त्याकरतां उठली आणि तयारी करूं लागली. बाबांच्या हें लक्षांत येतांच त्यांनीं आईला आणखी एकदां नेहमींप्रमाणें बोलायाला सुरवात केली आणि त्याच वेळीं घरांतल्या मंडळींना समोर बोलावून त्यांची एकदां चांगली हजेरी घेतली. मावशीबाईंना बाबा सहसा कधींही बोलत नसत. इतकेंच नव्हे तर त्यांच्याविषयीं कुणी कुरबुजलेलें देखील त्यांना पसंत पडत नसे. पण त्या दिवशीं इतरांच्या बरोबर बाबांचा रागाचा प्रसाद मावशीबाईंनाही मिळाल्याशिवाय राहिला नाहीं. बाबांनीं मुंबईहून परत येईतोंपर्यंत कोणी कसें वागावें कोणी कसें वागावें-हेंही करड्या शब्दांनीं बजावून ठेवलें आणि आईलाही किंचित् घोगऱ्या आवाजांत ‘ तुम्ही दुसऱ्या करतां त्रास घेत जाऊ नका. आम्हांला तुम्ही पुष्कळ दिवसपर्यंत हव्या आहांत तेव्हां आमच्याकरतां तरी आपल्या प्रकृतीस संभाळा ’ अशी प्रेमळ ताकीद देऊन गाडीची वेळ होतांच दारीं उभ्या असलेल्या टांग्यांत बसून स्टेशनवर गेले.

बाबा गेले आणि मी माडीवर आईकडे जाण्यासाठीं म्हणून निघालें. तों दारांतून आंत बाबूराव आल्याचें दिसलें. मीं ओझरतें त्यांना पाहिलें पण त्यांच्या करतां मला उभें राहण्याचें काय कारण ? म्हणून मी तशीच पुढें झटकत होतें तरी मी वर जातांना बाबूरावांच्या दृष्टीस पडल्यामुळें व माझी नसली तरी त्यांची माझ्याशीं लगट करण्याची नेहमींच प्रवृत्ति असल्यामुळें मला पाहातांच त्यांनीं ‘ श्: श्: ’ करून मला थांबविण्याचा प्रयत्न केलाच. क्षणमात्र मी धबकलें. इतक्यांत ते जवळ येऊन अगदीं सलगीच्या शब्दांनीं ‘ भय्या कुठें आहे ? ’ म्हणून विचारलें. मी शब्दांनीं सांगण्याच्या भरीस न पडतां बोट व डोळे भय्याच्या खोलीकडे केले व तशीच पुढें निघालें तरी पण त्यांनीं आणखी ‘ थांबा जरा ’ म्हणून मला अडविलेंच ! ‘ थांबा मला एक मौज सांगायची आहे तुम्हांला- तुमच्याशीं थोडें बोलायाचं आहे. ” नाइलाज होऊन ‘ काय ? ’ या प्रश्नांकित मुद्रेनें मी त्यांच्याकडे पाहात राहिलें. मी थांबल्याचें पाहून त्यांना आनंद झाला. ते हंसून आपल्या डोकीवरची टोपी काढून ती काखोटींत मारून थोडासा अंगाला झटका देउन म्हणाला, “आज आमच्या ॲम्फी थिएटरमध्यें आनदराव टेकाडे, गिरीश, यशवंत, तांबे या कवींचें

काव्यगायन आहे. त्याकरतां तुम्ही भय्याबरोबर काव्यगायनला जरूर यावें म्हणून मी तुम्हांला मुद्दाम सुचवायाला आलों आहें. या कवीचें कविता-गायन म्हणजे षड्रस अन्नाची लयलूटच म्हणा ना! तुम्ही अजून त्यांच्या कविता ऐकल्या नाहींत? मग याच. तुम्हांला आनंद होईल ही माझी खात्री आहे. पण माझ्या शब्दाला तुम्ही मान दिला असें पहिलें म्हणजे तुमच्या-हून मला अधिक आनंद होईल. मग काय येणार ना? तसं संकोचाचें कांहीं कारण नाहीं. तुम्ही तेथें एकट्याच असणार नाहींत. कॉलेजांतल्या सगळ्या मुली हौसेनें हजर राहातात. बरं जा आतां. मी तुमचा खोळंबा केला. क्षमा करा. भय्या आपल्या खोलींत आहे ना? मी जातों तर—" इतकें बडबडून बाबूराव भय्याच्या खोलीकडे वळले व मी जिन्याच्या पायऱ्या चढूं लागलें. पहिल्यांदा माडीवर चढतांना माझ्या डोक्यांत काय चाललें होतें तें भी मधल्याच या विलक्षण प्रसंगानें अगदीं विसरून गेलें. आतां पायऱ्या चढत असतां माझी वृत्ति कितीतरी चमत्कारिक झाली होती. बाबूरावांनीं मला थांबण्यास कां सांगावें? त्यांनीं सांगितलें तरी मी कां एकावें? त्याची बडबड मी काय म्हणून ऐकावी? एक ना दोन. अशा निरनिराळ्या अनेक प्रश्नांनीं मला तेवढ्या वेळांत अगदीं भंडावून सोडलें. बाबूरावांच्या वागण्यापेक्षां आतां माझ्या वर्तनाचाच मला अधिक राग आला होता. पण इतकें झालें तरी बाबूराव आपल्याशीं आज कांहीं वाईट वागला नाहीं, वेडेंवांकडें बोलला नाहीं, कविंतागायनाला चला असं म्हणाला यात मला खरं म्हटलं तर रागवण्यासारखं कांहींच नव्हतें. कवितागायन-कवि टेकाडे, तांबे—यशवत, गिरीश, ॲम्फी थिएटर—तिथें जमणाऱ्या मुली. त्या जमणाऱ्या मुलींत आमचा भय्या कधीं कधीं आईजवळ ज्या कमला केतकरचें वर्णन करतो ती कमला केतकर या गोष्टी एकेक अशा डोक्यांत येऊं लागून माझा राग शांत होत जाऊन त्या गोष्टींचा मनावर ताबा बसूं लागला. विशेषतः तिथं गेल्यास कमला केतकर आल्यास दिसेल—बसायाची संधि साधली तर तिचें रूप, तिचें बोलणेंचालणें, तिचा स्वभाव, तिचा पोशाक वगैरेंचा थोडक्यांत तिला न कळत आपल्याशीं परिचय होऊन आपली भावी वहिनी कशी काय आहे हें अनायासें आपणास कळेल, आपल्या आईजवळ तिचं वर्णन करण्याची संधि आपणास सांपडेल.

त्यानंतर भय्याची थट्टा करण्याचा वरचेवर आपणास विषय मिळेल--याप्रमाणें मनांत येऊं लागून जर दुपारीं भय्यानें त्या समारंभास चल म्हटलें तर आपण जरूर जायाचं. आढेवेढे मुळींच घ्यायचे नाहींत असें मनाशीं पक्कें ठरवून टाकलें. जसें बाबूरावानें माझ्याजवळ सांगितलें तसेंच तो माझ्या-बद्दल भय्याजवळही सांगून ठेवणारच ही माझी खात्री होती. या अशा विचारांतच मी आईजवळ जाऊन तिच्या शुश्रूषेंत मन गुंतवत होतें. दुपारीं ठरल्या वेळीं नीटनेटका पोषाक करून बाबूराव घरीं आले. भय्या जाण्या-करतां तयार होता. त्यानें मला न्यावयाचें निश्चित केलें होतेंच. परत येई-पर्यंत घरीं स्वयंपाकीण काकूंना आईच्या जवळपास असा--हवं नको पाहा. सेवासदनांतून मावशीबाई आल्या म्हणजे मग तुम्ही जायाला हरकत नाहीं; असें बजावून मी भय्याबरोबर जाण्यास बाहेर पडलें.

संध्याकाळीं आम्ही कवितागायन संपल्यावर परत आलों, त्या वेळीं मी, भय्या व बाबूराव अगदीं निरनिराळ्या विचारांत पूर्णपणें मग्न होतों. मी कोणाच्या कविता कशा होत्या, कोणी आपल्या कविता चांगल्या रीतीनें गाइल्या या विचारापेक्षां आपली भावी वहिनी आपणास कशी दिसली, ती कोणाशी कशी हंसत होती, कोणाशीं कशी बोलत होती, तिच्या सभोंवतालीं मुलामुलींचा कसा घोळका जमत होता, भय्याचें तिच्याकडे व तिचें भय्या-कडे ज्या ज्या वेळीं लक्ष जात असे त्या त्या वेळीं तशाही स्थितींत सूक्ष्म असे कांहीं विशेष फरक पडत होते ते कसे, कमला ज्या वेळीं स्वतां प्लॅट-फॉर्मवर गेली व स्वकृत कविता तिनें खड्या आवाजांत म्हणण्यास सुरवात केली त्या वेळीं चिकार भरलेल्या थिएटरांतून टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला तेव्हां भय्या किंचित्काल उत्तेजित तर थोडा वेळ अस्वस्थ असा कसा झाला हीं चित्रें माझ्या मनश्चक्षूपुढें नाचत होतीं. कमलेंत मोहक असें काय आहे ? तिचे पाणीदार टपोरे डोळे कीं दुसऱ्याला भुरळ पाडणारी एक निराळ्याच तऱ्हेची हसण्याची लकब हें माझ्या नीटसें ध्यानांत येईना. भय्याला तिच्या हसण्याच्या लकबीनेंच भुरळ पाडली असेल काय ! असा मी आपल्या मनास प्रश्न केला. ती कविता गात असतांही अशी सहज हसल्यासारखी दिसली. नेमके त्याच वेळीं भय्याचे गालावरही सुरकुती पड-ल्याचा मला भास झाला. मी तो देखावा बघण्यांत गुंतलें होतें तर बाबूराव

माझें मन आकर्षण करण्याच्या प्रयत्नांत गढला होता. आम्ही गाडींत बसलों त्यावेळीं सहजच असें दाखवून पण मुद्दाम त्यानें मजजवळ बसण्याचा प्रयत्न केला होता. थिएटरमध्यें बसण्याच्या वेळींही तोच प्रकार त्यानें करण्यास कमी केलें नव्हतें. दोन्ही वेळीं मी अत्यंत चपळाईने मध्यें भय्याला करून मीं दूर झालें होतें. तेवढ्यांत माझ्या मनासारखें झालें असलें तरी बाबूराव मुळींच निराश झाला नव्हता. त्याची माझ्याशीं बोलण्याची एकसारखी टकळी चाललीच होती. तो मला कांहीं तरी प्रश्न करी व त्याचें उत्तर भय्या देई; जास्तच झालें तर भय्या चिडून मध्येंच म्हणे, ' काय रे बाबू, वाटेल तसले या पोरीला कठीण प्रश्न विचारतोस ते; तुला काय वाटतें कीं, ती पंडिता रमाबाई, ॲनिबेझंट, कीं सरोजिनी आहे ? " असें झालें म्हणजे तो थोडा वेळ खट्टू होऊन स्वस्थ राही. पण जरा वेळ गेला कीं, पुनः कसला तरी नवा विषय उपस्थित करून आपलें ध्रुपद सुरू करी. भय्या आपल्याच विचारांत मग्न असे. मला वाटे तो या वेळीं कमलेच्या विचाराशिवाय दुसरा कोणताच विचार करीत नसेल. असें मनांत आलें कीं, कांहीं तरी खुसपट काढावें, कमलेची आठवण करावी आणि भय्याची थट्टा करावी असें अगदीं मनापासून वाटे व शब्द अगदीं जिभेवर येत. पण बाबूरावच्या देखत हें नको असें मनांत येऊन मी तशीच स्वस्थ बसे. बाबूरावांकडे पाहिलें तर तो आनंदाच्या शिखरावर नाचत आहे असें वाटे. मी त्याच्या मनाप्रमाणें आज किती तरी वेळ त्याच्या सहवासांत होतें. एवढ्या थोड्या गोष्टींचा विचार त्याच्यापुढें "आम्ही दोघे लग्नाकरितां बोहल्यावर चढलों आहों" एथपर्यंत भरारी मारायला कमी पडणारा नव्हता. दैवाचा धागादोरा असाच विणला जाणार असेल काय? असें त्याच्या मनांत येत नसलें तरी माझ्या मनांत येत होतें. त्याचबरोबर भय्या व कमला केतकर यांची जीवितयात्रा एकत्र होणार काय? याही दैवी धाग्याचा विचार वावरत होता. याच मनःस्थितींत आम्ही जसें गेलों तसे परत आलों. निघतांना तशाही गर्दीत कमला केतकर भय्याजवळ येऊन हंसून चार शब्द बोलली होती. त्याच वेळीं भय्यानेंही माझी तिच्याशीं ओळख करून दिली होती. तो प्रकार त्या वेळीं मला सखवीत होता कीं दुखवीत

होता, हें या वेळीं सांगणें मला बरेंच कठीण आहे. इतकें मात्र खरें कीं, आपल्या भय्याला ही कमला सुखाचीसांगाती होईलच ही खात्री माझी मनोदेवता मला देईना. भय्याचा तिच्याविषयीं ग्रह अनुकूल व्हावा व माझा होऊं नये असें कां? कदाचित् मीच चुकत नसेन कशावरून? मी त्या दृष्टीनें पाहिलें तर अप्रबुद्धच नव्हतें कां? मग माझ्या बुद्धीवरच मी भरंवसून राहूं कशी?

रात्रीं आईनें दिवसाची हकीकत विचारली त्यावेळीं मला निःशंकपणानें ज्या ज्या गोष्टी सांगतां येण्यासारख्या होत्या त्या मीं तिला सांगितल्या. माझी कल्पना नसतांही आईनें मला कमला केतकरविषयीं असे कांहीं चार दोन सूचक प्रश्न विचारले कीं ते ऐकून मी चकित झालें. आईनें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें मीं निःसंकोचपणानें दिलीं व कमला केतकरविषयीं माझा झालेला ग्रहही तिच्याजवळ स्पष्ट बोलून टाकला. त्यावर आई कांहीं बोलली नाहीं "बरं तर! दैवाचे धागेदोरे जसे असतील तसं होईल. भय्याची परीक्षा अगदींच चुकेल असें आपण तरी कसं म्हणायाचं?" असें आई कांहींसें मला उद्देशून तर कांहींसें मनाशीं पुटपुटली व डोळे मिटून तशीच स्वस्थ राहिली. मीं सांगितलं तें आईला रुचलें नाहीं म्हणा कीं पचलें नाहीं म्हणा असा माझा ग्रह झाला व मीं तो विषय त्या वेळीं तितकाच सोडून दिला.

त्या दिवसानंतर पांच कीं सहा दिवसांनीं म्हणजे गुरुवारीं संध्याकाळीं बाबा मुंबईहून परत आले. आले ते एकटेच न येतां त्यांनीं आपल्याबरोबर आणखी कुणाला तरी आणलें होतें. मी बाहेरून येतें तों आईच्या उशागतीं असलेल्या इझिचेअरवर बाबा बसले आहेत, पलीकडे भिंतीला टेकून भय्या उभा आहे आणि बरोबर जे गृहस्थ आले होते ते पलीकडच्या एका खुर्चीवरच पण अत्यंत अदबीनें बसलेले आहेत असें मी पाहिलें मी एकदां भरदिशीं चोहोंकडे पाहून घेतलें. नवीन माणसाकडे माझी दृष्टी स्थिर होते न होते तोंच स्त्री स्वभावानुसार मला कसेसेंच वाटून मी आईकडे वळलें. बाबांनीं मला पाहतांच हंसून विचारलें, "काय ताईसाहेब कुठं गेला होता? हे गृहस्थ आले आहेत, ओळखतां का तुम्हीं त्यांना?" त्यावर आई, "हें काय? तिला कशी ओळख पटणार? किती वर्षे झालीं. मी देखील जर ओळखलं नाहीं तर ताईला कशी आठवण राहणार? त्यावेळीं ही तर अवघी पांच कीं

सहा वर्षांची होती. " असें क्षीण स्वरानें म्हणाली व तिनें एकदां त्या नवख्या गृहस्थाकडे स्थिर दृष्टीनें पाहिलें.

" काय रे सदाशिव, तूं तरी ओळखतोस कां आमच्या ताईला ? कदाचित् तुला ओळख पटली असेल, पण आमच्या या भय्याला मात्र तूं मुळींच ओळखणार नाहींस. कारण मला वाटतें तो चार सहा महिन्यांचा असतांनाच तुम्ही इथून निघून गेलांत. नाहीं कां हो ? " बाबा म्हणाले.

यावर त्या नवख्या गृहस्थानें-गृहस्थानें म्हणण्यापेक्षां त्या नवख्या तरुणानें-किंचित् स्मित करून बाबांच्याकडे, आईकडे, भय्याकडे आणि तसेंच माझ्याकडेही चटूदिशी पाहून दुसरीकडे मान वळविली. त्यावेळीं आमची किंचित्काल जी नजरानजर झाली त्यामुळें माझ्या सर्वांगांतून विजेचा प्रवाह खेळल्यासारखा होऊन कसेंसेंच झालें. माझ्याच ठिकाणीं मी लाजलें. आईच्या आंगावरून हात फिरवीत आणि तिचें पांघरून नीटनेटकें करीत मी स्वतांलाच सावरण्याचा प्रयत्न केला. अजून हे तरुण कोण हें मात्र माझ्या ध्यानांत आलें नाहीं. त्यांचें नांव व माहिती मी खोलींत येण्यापूर्वीच बाबांनीं आईला व भय्याला सांगून टाकली होती व मला तर ती कळण्याची उत्कंठा होती पण हें मीं विचारायाचें कुणाला ? व मला सांगणार कोण ? म्हणून गुपचुप मला त्या वेळीं तरी स्वस्थ बसणें भाग पडलें.

थोडा वेळ झाला. मावशीबाई कांहीं चहाफराळाचें घेऊन तेथेंच आल्या. त्यानंतर बाबांनीं त्या तरुणासंबंधानें आईला कांहीं माहिती सांगण्यास सुरवात केली. मला बरें वाटलें. मी सर्व लक्ष बाबांच्या बोलण्याकडे लाविलें. बाबा म्हणाले:—

" ऐकलंत का ? हा सदाशिव मला मुंबईला जो भेटला त्या वेळीं मी त्याला किंवा त्यानें मला पाहातांक्षणींच ओळखलें असे का तुम्हांला वाटतें ? अहो, मुळींच नाहीं. त्याच्या आमच्या भेटीचा योग आणि ओळख म्हणजे नाटककादंबऱ्यांतून खरोखर जसे चमत्कार म्हणून असतात, अगदीं हुबेहुब तशी गोष्ट, किंबहुना त्याहूनही फारच विलक्षण गोष्ट घडली म्हणा ना ! मी व्हिक्टोरिआटर्मिनसवर ज्या गाडीनें उतरलों त्याच गाडीनें याचा कोणी स्नेही बेळगांवहून आलेला उतरावयाचा होता. म्हणून हा त्याला उतरून घ्यायला आलेला होता. तो आमच्या डब्यांतच होता. यानें त्याला

पाहातांच हाक मारली. हा बी. एस. सी. उत्कृष्ट रीतीनें पास झाल्याबद्दल याचें त्यानें मनःपूर्वक अभिनंदन केलें आणि "अनंतरावमास्तर" या वेळीं हयात असते व तूं मिळविलेलें हें यश ते पाहाते तर त्यांना गगनाधिक आनंद झाला असता—पण तुझ्या तें नाशिबींच नव्हतें व अनंतरावांना हें सुख मिळायचें नव्हतें असें तो गृहस्थ म्हणतांना, तेवढ्या थोडक्या वेळांत मला ऐकायाला आलें व अनंतरावमास्तर माझ्या कानांत घुसतांच मला कशी कोण जाणें, पण वीस वर्षांपूर्वीची एकदम आठवण झाली व मी होऊनच त्या आठवणीची शहानिशा करण्यासाठीं पुढें होऊन या सदाशिवालाच अनंतरावमास्तरांबद्दल आणि खुद्द यांच्याबद्दल चौकशी केली. कांहीं खाणाखुणा विचारल्या. यानें मोठ्या चमत्कारिक नजरेनें मला एकवार नखशिखांत न्याहाळलें व आपली व अनंतराव मास्तरांची मला पटणारी हकीकत सांगितली. ओळख पटली व माझी ओळखही पटवून दिली. मला बरेंही वाटलें आणि वाईटही वाटलें. मी याला आपल्याबरोबर येण्यास आग्रह केला आणि त्यानें आपल्या वडिलांच्या जुन्या दोस्ताला मान देऊन तो माझ्याबरोबर आला. तो वयानें मोठा झाला—ज्ञानानें मोठा झाला पण त्याच्या घरच्या परिस्थितीनें त्याला गरीब केलें. असो. सदाशिव, जें झालें गेलें त्याला उपाय नाहीं. पण मीं तुला सांगतों वास्तविक तुला आतां कोणाच्याच साहाय्याची अपेक्षा नाहीं. तूं म्हणशील तें करशील व जगांत नांव, कीर्ति, संपत्ति आणि सौख्य मिळवशील हें खरें, पण माझ्या मित्राच्या मुलाकरतां मलाही कांहीं करावेंसें वाटलें तर तें तुला आवडेल काय ?" बाबांचें बोलणें एथेंच थांबलें. अनंतरावमास्तरांचा सदाशिव म्हणतांच मला लहानपणची अंधुक आठवण झाली व तो हा सदाशिव असा अस्फुट उद्गार व त्याबरोबरच थोडेंसें मला हंसू आल्याशिवाय राहिलें नाहीं. आई म्हणाली:—

"सदाशिव, तुला पाहिलं, मला फार बरं वाटलं. आल्यासारखा चार दिवस इथं राहिल्याशिवाय जाऊं नकोस. माझ्या भय्याच्या अन् ताईच्या संगतींत तुला इथें मुळींच कंटाळा येणार नाहीं. भय्या, सदाशिवाला संकोच वाटणार नाहीं असें याच्याशीं वागा बरें का रे. मग काय सदाशिव, राहणार ना चार दिवस ?"

" असं काय तुम्ही त्याला भलतंच विचारतां? तो आतांच जाईन म्हणेल पुष्कळ–पण आम्ही त्याला तसाच पाठवला पाहिजे ना? मी तर निराळ्याच विचारानें याला एथें घेऊन आलों आहें. मी तर हे ईश्वरी धागेदोरेच आहेत असें मानतों. सदाशिव व आपली ताई यांचा जोडा तुम्हांला पसंत आहेना? तुम्हांला पसंत असला कीं देऊं उडवून लग्नाचा बार! का रे, सदाशिव, आलं ना ध्यानांत मीं काय म्हटलें तें? अन् ताईसाहेब—"

पण तें ऐकायला मी तेथें राहतें कशाला त्यावेळीं? शेगडीवरचं दूध मांजर सांडणार म्हणून शुक शुक करीत मी तेथून एकदम झटकलें.

---

# प्रकरण ७ वें

## आमच्या सुखाकरितां बाबांना त्रास

आईच्या डोळ्यांना आमचीं सुखें दिसावींत म्हणून बाबांनीं भय्याचें लग्न करून टाकलें. त्याच बरोबर मलही सासर पहावयाला लावलें. आमचीं लग्नें झालीं. माझ्या लग्नाचीं कहाणी मी मागाहून सांगेन. ती विशेष महत्त्वाची आहे असें मला वाटत नाही. मी माझ्या मनाप्रमाणें सुखी झालें इतकें मी तूर्त माझ्यासंबंधानें सांगितलें तरी पुष्कळ झालें. महत्त्व आहे तें भय्याच्या लग्नाचें आणि म्हणून त्याच गोष्टीचा मला थोडासा अधिक विस्तार करावासा वाटतो. बाबांनीं आम्हां बहिणभावंडांचीं लग्नें किती थाटामाटानें केलीं, खर्च किती केला; डामडौल जगाला किती दिसला. लग्नें जुन्या तऱ्हेनें केलीं कीं नव्या? लग्नाला कोण कोण आणि किती मंडळी आली होती? कुणाचा मान झाला, कोण आपला अपमान झाला असें समजून तडीतापडीनें फुरंगटून आध्र्याच कार्यातून चालते झाले, बाबांनीं उभयपक्षांच्या व्याह्यांतून माणुसकी कुणी दाखविली आणि त्यापासून पारखे कोण झाले; बाबा कुठें चुकले कीं काय? मंडळींची यथासांग बोळवण झाली कीं त्यांतही कांहीं बखेडा झाला, कुणाचे रुसवेफुगवे झाले; हें पुष्कळ सांगण्यासारखें असलें, तरी त्याला अगोदर जागा अडवीत नाहीं. त्याबद्दल एवढेंच सांगितलें तरी चालण्यासारखें आहे

कीं, बाबांनीं खूप खर्च केला. पुष्कळांचे मान झाले; तर पुष्कळांचे अपमानही झाले. लग्नसमारंभांत साधारण ज्या गोष्टी व्हावयाच्या त्या झाल्याच! प्रत्येक बाब जी बाबा करीत होते, ते आईचा कल पाहून, ज्यांत आईला बरें वाटेल तें करावयाचें. तिला वाईट वाटेल तें करावयाचें नाहीं; असें बाबांचें जसें कांहीं ठरून गेल्यासारखें होतें. ते स्वतःच्या मनाला, सुखाला, मानाला, आवडीनावडीला हिशेबांतच धरीत नव्हते. स्वतः बाबांनीं किती त्रास सोसला आणि दुसऱ्याला सुखविण्याचा प्रयत्न केला हें एकाच गोष्टीवरून कळून येण्यासारखें असल्याहुळें तेवढीच गोष्ट मी पुढें देत आहें—

भय्याच्या लग्नाचें घाटूं लागलें. बोलणीं चालू झालीं. मुली सांगून येऊं लागल्या. कमला केतकरसंबंधानें आईकडून बाबांच्या कानांवर गोष्टी जात होत्या. तिच्याकडे भय्याचा ओढा आहे. तीच बायको मिळाली तर भय्या अधिक सुखी होईल; अशी नव्या मताप्रमाणें बाबांची समजूत करण्यांत येत होती. बाबा त्या स्थळासंबंधानें तितकें प्रतिकूल जरी दिसले नाहींत तरी अनुकूलताही त्यांनीं ताबडतोब दाखविली नव्हती. दररोज मुली पहावयाला जावयाचें, कांहीं मुलींना घरीं आणावयाचें; त्या मुली आईच्या व भय्याच्या नजरेखालीं घालावयाच्या; व त्याबद्दल आई व त्यापेक्षां भय्याचेंही मत आईमार्फतच विचारावयाचें; त्या स्थळासंबंधानें साधकबाधक चर्चा करावयाची व अखेर निर्णय भय्याच्याच मतावर ठेवावयाचा; असा क्रम बाबांनीं चालू केला होता. असें करण्यांत बाबांचा हेतु, "कोणत्याच कारणानें आपण चुकलों; भय्या घसरला; कुणाची तरी क्षुल्लक चूक झाली, घाई झाली, असें होऊं नये; आणि उगीचच्याउगीच थोडक्याकरितां जन्मभर कुरकुरीलाच जागा राहूं नये, याच एका दृष्टीनें बाबा चालले होते. आई आलेल्या मुली पाही. भय्याही पाहत असे. चांगलें तर चांगलें, वाईट तर वाईट," असें तो आईजवळ आपलें प्रांजलमत देई. पण शेवटीं 'कमला केतकरच इतक्यांतून आपल्याला योग्य आहे. ती मिळाली तरच आपण अधिक सुखी होऊं' असें पालूपद तो आईजवळ गायल्याशिवाय राहत नसे. दर वेळचा साद्यंत रिपोर्ट आई बाबांकडे पोंचवीच! आईनें सर्व सांगितलें म्हणजे बाबा तिला म्हणत, " माझी कांहीं हरकत नाही. सारे त्याच्याच सुखासाठीं करावयाचें आहे. त्याला कोणती मुलगी पसंत

असेल तीच त्यानें करावी. त्याआड मी येणार नाहीं. अमूकच मुलीशीं तूं लग्न केलें पाहिजेस असें मी त्याला अधिकारानें सांगणार नाहीं; तसेंच अमूक मुलीचा तूं डोक्यांतून विचार काढून टाक. अशी सक्तीची आज्ञा करून मी त्याला वडिलकी गाजवित आहे असेंही वाटूं देणार नाहीं. पण हलगर्जीपणा मी केला, किंवा उतावीळपणानें तो हुरळला आणि अंधपणानें मी त्याला सम्मति दिली असें व्हायला नको! म्हणून मी करतों आहें हें योग्यच आहे. कमला केतकरला मी जसा बाजूला सारीत नाहीं; तसा ताबडतोब तिच्याच संबंधाच्या विचाराला लागत नाहीं. तसेंच भय्यानेंही करावें असें मला वाटतें! मी यांत व्यवहार पाहत नाहीं, हुंड्याचा लोभ दाखवीत नाहीं. वधूपक्षाला नाडण्याकरितां हें करीत नाहीं; तर भय्याला आपलें वैवाहिक सौख्य अधिकांत अधिक कसें चांगलें मिळेल हें पाहत आहें व भय्यालाही पाहवयाला अवसर देत आहे इतकेंच! भय्याच्या या विवाहसंबंधांत माझ्या अधिकाराचा अतिक्रम मीं करूं नये असें जसें मला वाटतें, तसेंच त्यानेंही उतावीळपणानें, कसल्या तरी मोहाला बळी पडून, बाह्यांगावर भाळून, स्वतःची क्षणिक फसवणूक करून घेऊन भय्यानें 'बंधनाच्या पलिकडे' अविचारानें जावें व आजन्म मनस्ताप करीत रहावें, असें मला वाटत नाहीं. एवढ्याचकरितां हा माझा सारा खटाटोप आहे दुसरें कांहीं नाहीं!"

हें आणि असेंच बोलणें बाबांचें त्या वेळीं आईला ऐकावें लागे. लग्नाचें अजून निश्चित कांहींच झालें नव्हतें. 'प्रेमाचें खूळ' बाबा अगदींच मानीत नव्हते असें नाहीं; पण त्याचें अवास्तव स्तोम माजवीत नव्हते हेंही तितकेंच खरें आहे. आणि व्यवहारदृष्ट्या यांत कांहीं चूक आहे असें कोणता समंजस म्हणेल? वयमानपरत्वें भय्याच्या डोक्यांत प्रेमाच्या खुळाचें प्राबल्य असलें तरी तोही अविचारानें त्याच्यापायीं लीन होऊन बाबांच्या विचारांना, हेतूला, सांगणीला धाब्यावर बसवून आपलाच हेका चालवीत नव्हता कीं तोरा मिरवीत नव्हता! किंवा जुन्या काळच्या "बाबांना कळतंय काय?" असेंही हुच्चपणानें म्हणत नव्हता; हें भय्यासंबंधानें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें होतें; म्हणूनच बाबांना दिवसेंदिवस भय्याबद्दल अधिकाधिक आदर आणि अभिमान वाटत होता.

इकडे अशी घटना चालू असतां, दुसरीकडे काय चाललें होतें ? बाबा आपल्यापरी विचार सुविचार करीत होते; व त्या मुळें दिवसामागून दिवस व्यतीत होत होते. पण दुसरीकडे त्याचा परिणाम चांगला होण्याचा संभव कमी होता. दररोज कॉलेजांत भेटणाऱ्या भय्या व कमला केतकर यांच्यांत बरेच वादविवाद होत होते. गूढ भाषा चालत असत. भय्या आपल्या घरच्या राजकारणाची परिस्फुटता जरी त्या वेळच्या बोलण्यांत चुकूनही करीत नसे; तरी त्याच मुळें तो अधिक स्पष्ट व लगटीचें बोलत नसे. कमला लाडीकपणानें त्या मानानें अधिकच प्रेमाचें जाळें पसरी. कांहीं दिवस कमलेच्या लक्षांत जरी भय्याची मनःस्थिति आली नाहीं. तरी ती लपून तरी किती दिवस राहणार ? भय्याकरितां इतर ठिकाणच्या मुली पाहाण्याचें काम चालू आहे, हें तिला समजल्याशिवाय राहिलें नाहीं. तें समजल्यावर भय्याला त्या बद्दल तिनें स्पष्ट विचारलें. पण भय्या सांगणार काय ? तो गुळमुळला. कमलेला तो आपला अत्यंत दांडगा असा अपमान वाटला. ती भय्यावर चिडली; संतापली, रागावली. त्या भरांत ती त्याला हवें तसें टाकून बोलली. त्याला, आमच्या बाबांना, आमच्या घराण्याला तिनें हव्या तशा शिव्या दिल्या आणि आपल्या रागाचें उट्टें तिनें चांगलेंच काढून घेतलें. इतकें करून ती राहिली नाहीं, तर झालेल्या हकीकतीचें सविस्तर तिनें आपल्या वडिलांना पत्र टाकलें. तिनें भय्याला स्पष्ट बजावले, " जर तुमचें माझ्यावर खरें खरें प्रेम असेल, जर तुम्ही सुशिक्षित म्हणवीत असाल, जर तुम्हांला आपल्या उच्च शिक्षणाबद्दल कांहीं महत्त्व वाटत असेल, तर भलते चाळे बंद करा. आपल्या वडिलांच्या चाळ्यांना ताबडतोब आळा घाला ! शिक्षणाची, स्त्रीदाक्षिण्याची, सुशिक्षित स्त्रीयांची कांहीं कदर ठेवावयाची असेल तर चालवलेला मूर्खपणा थांबवा ! " हें आणि असेंच आणखी किती तरी ती त्याला बोलली. सरळमार्गी, एककल्ली, पापभीरु मनाच्या भय्याला कमलेचे एकूणएक शब्द मुकाट्यानें ऐकावे लागले व ते त्याला सर्व बरोबरही वाटावयाला लागले. इकडे बाबांना चुकीचें म्हणतां येईना, तिकडे कमलेला खोडून काढतां येईना. अशी भय्याची त्या वेळीं अतिशय कुचंबणा झाली. त्यानें कमलेची नाना तऱ्हेनें समजूत घालून पाहिली. अजून वेळ गेली नव्हती. वाईट कांहीं घडलें नव्हतें. हें त्यांतल्यात्यांत बरें होतें म्हणून कम-

लेला अजून शांत व्हावयाला जागा होती. "दुसरी मुलगी मी आतां पाहाणार नाहीं. तसलें कार्य एकदम थांबवीन व तुझ्याशींच विवाह करीन," या असल्या अटीवर कमला शांत झाली. भय्याला तेवढ्यापुरतें हायसें झालें. भय्यानें यापुढें बरीच जबाबदारी शिरावर घेतली.

कमला एक महिन्यापूर्वीच आपल्या गांवीं जाऊन आली होती. तिनें पण आपल्या आईला व वडिलांना आपलें मनोगत कळविलें होतें. तिकडूनही तिच्या व भय्याच्या विवाह शृंखलेचा एकेक दुवा जुळत चाललेलाच होता. त्यानंतर सर्व साधारण चांचणीवजा तिच्या वडिलांचें आमच्या घरीं बाबांना एक पत्रही आलें होतें. कमलेच्या वडिलांच्या संबंधानें माहिती सांगण्यासारखी म्हणजे अशी कीं; तिचे वडील व आमचे बाबा अगदीं लहानपणचे शाळासोबती होते. आतां ते एका संस्थानांत खाजगी कारभारी म्हणून होते व बाबा इकडे अशा नौकरीपेशांत पडले होते. कमलेच्या वडिलांनीं त्या संस्थानांत आपला दाब चांगलाच ठेवला होता. खुद्द संस्थानिकावर त्यांचें वजन चांगलें असून त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल, कर्तबगारीबद्दल, व एकंदर कारकीर्दीबद्दल चांगलाच चोंहींकडे बोलबाला झालेला होता. त्यांनीं बरीच संपत्तिही सांचविली होती. अशामुळें स्वाभाविकच कांहीं चांगल्या सद्गुणांच्या जोडीला संस्थानीबाण्याचा अवगुण म्हणूनच कीं काय घमेंडखोरपणा, अहंमन्यता, दुसऱ्याला तुच्छ लेखण्याची प्रवृत्ति, सूडबुद्धि इत्यादि दुर्गुणांचा प्राहुर्भावही त्यांच्याजवळ झालाच होता. त्याच खाजगी कारभाऱ्यांची मुलगी कमला. तिच्यांतही कांहीं वडिलांचे अनुवंशिक म्हणून गुण उतरले असल्यास नवल काय?

कमलेच्या वडिलांची हकीकत इतकी खुशालनें सांगण्याचें कारणही तसेंच आहे, तें पुढें आपोआप ओघांत येईलच!

कमलेनें संतापाच्या भरांत एकाचे दोन करून वडिलांना पत्र लिहिलें. त्या पत्राचा परिणाम तिच्या वडिलांच्या मनावर भलताच झाला. पूर्वी एक साळसूदपणाचें आमच्या येथें पत्र आलेंच होतें. त्याचें उत्तर बाबांकडून जायचें राहिलें होतें. याही एका कारणाची त्यांत भरपडली. झालें! खाजगी कारभाऱ्यांच्या अंगाचा नुसता भडका झाला. माझ्या बाबांचा कसा सूड घेऊं! त्यांना नाक मुठीत धरून केव्हां शरण आणूं! असें त्यांना होऊन गेलें!

त्यांनीं त्याच संतापाच्या भरांत तावातावानें बाबांना एक खरमरीत पत्र टाकलें. त्या पत्राचें विशेष वर्णन करीत न बसतां तें पत्रच पुढें दिलें आहे. त्या पत्रावरून कमला केतकरांच्या वडिलांच्या स्वभावाची साधारण कल्पना येईल. नित्याच्या टपालांतून बाबांच्या टेबलावर तें पत्र येऊन पडलें. बाबांनीं तें पत्र वाचलें. पत्र असें होतें:—

॥ श्री ॥

संस्थान ×××××
मिति वैशाख शु ॥-

न. वि. वि.

आम्ही तुम्हांस फार शहाजोग समजत होतों. आपली लहानपणाची मैत्री लक्षांत घेऊन तुम्हांस कांहीं दिवसामागें पत्रही पाठविलें होतें. परंतु तुम्हीं त्याला कस्पटाइतकीच किंमत दिलीत. असो. त्याचें विशेष नाहीं. आम्हांस नुकतेंच खात्रीलायक कळलें आहे, कीं तुम्हीं आमचा तिरस्कार करतां. तुच्छ लेखतां. इतकेंच नव्हे, आपल्या पुढील पिढीचा जडून घातलेला ऋणानुबंध तुम्ही आपल्या अरेरावीनें कायमचा तोडून टाकीत आहां ! आमची मुलगी कमला व आपले चिरंजीव भय्यासाहेब यांचा विवाह होणें तुम्हांस मान्य नाहीं; व त्याकरितां कमलेबद्दल तुमच्यामार्फत खोट्यानाट्या कंड्या पिकविल्या जात आहेत ! आम्ही असें म्हणतों कीं, अशा कंड्या पिकवण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे ? उलट आम्हीच तुम्हांला बजावतों कीं, तुमच्या चिरंजीवानें आमच्या मुलीस फशी पाडली आहे. आणि आतां तिचा स्वीकार करण्याची जबाबदारी त्याच्यावरच आहे. आम्ही संस्थानचे खाजगी कारभारी आहोंत. तुम्हांला कल्पना नसेल कीं, आतां आमची मुलगी आपल्या मुलाला करून न घ्याल, तर त्याचे काय घोर परिणाम होतील ! आमच्या मुलीला नादीं लावून, वचन देऊन तुमचे चिरंजीव ऐन् वेळीं फसवितात आणि त्याला तुम्ही उत्तेजन देतां, याचा अर्थ काय ? आतां तें चालणार नाहीं. आमची मुलगी कशीही असो. ती आतां तुमच्या मुलाला तुम्हीं करून घेतलीच पाहिजे. नाहींतर आमच्याशीं प्रसंग आहे ! अजून नीट विचार करा. आतां पूर्वीचा सलोखा शिल्लक नसला तरी त्याची पर्वा नाहीं. आमच्या इभ्रतीकरितां आणि मुलाच्या शीलाकरितां

ती तुमच्या घरींच पडली पाहिजे. दुसऱ्याला बोल लावण्यापूर्वींच आपल्या पापाखालीं काय जळत आहे याचा विचार तुम्हीं करणें जरूर होतें. यापेक्षां अधिक आम्हीं लिहूं इच्छित नाहीं. कॉलेजांतल्या मुली चटोर आणि फाजील असतात, असें प्रतिपादण्याचा तुम्हांला अखत्यार नाहीं. असें विधान तुम्हीं केल्याचें आम्हांस नक्की कळलें आहे. आमच्या मुलींचें असें बदनाम करून आपल्या मुलाला शहाजोग ठरविण्याचा खटाटोप तुम्हीं करतां काय ? पण ध्यानांत ठेवा, आतां तें व्यर्थ आहे. असें भकल्याबद्दल आमची उलट उत्तरीं बिनशर्त माफी मागा आणि कमलेच्या व तुमच्या मुलाच्या विवाहाच्या आड येणार नाहीं, असें लिहून द्या. आतां विवाहही लांबविण्यांत अर्थ नाहीं. जितक्या लवकर मुहूर्त धरतां येईल व कार्यें उरकतां येतील तितक्याच लवकर उरकलीं पाहिजेत. तुमच्या बुद्धीला पुन्हां फाटे फुटण्याचा संभव असल्यामुळें आतां आम्हांस थांबतां येणार नाहीं ! हें तुम्ही न ऐकल्यास कायदेशीर इलाज करून तुम्हांला ताळ्यावर आणावें लागेल व पुढील कार्यें उरकून घ्यावीं लागतील. ध्यानांत ठेवा व या सर्व गोष्टींचा विचार करून काय तें कळवा. कळावें.

—केतकर—खाजगी कारभारी.

संस्थान ××××× "

असें हें अनपेक्षित, विचित्र, आचरटपणाचा नमुनाच जसा कांहीं—पत्र पाहून, वाचून बाबा तर स्तंभित झाले ! अगदीं हतबद्धच झाले ! हा आहे काय प्रकार ? असें विलक्षण पत्र आपल्याला येतें कसें ? याबद्दल बाबांना कांहींच उलगडा होईना. कांहींच आपल्याला थांगपत्ता नसतों, आपण कोणाबद्दल कांहींच बोललों नसतां, हा गृहस्थ एवढा कांगावा, इतकें अकांडतांडव कां करतो ? अशी दहशत—हा धाकदपटशा कां घालतो ? बाबांना कांहींच कळेना ! त्यांनीं किती तरी डोकें खाजविलें. त्या गृहस्थाचा मूर्खपणा आहे कीं दुष्टपणा आहे ? त्यानें असें कां लिहावें ? आपण याला केव्हां वचन दिलें होतें ? त्यानें तरी हा भलता हट्ट कां धरावा ? पण त्याचा उलगडा व्हावा कसा व करणार कोण ? बाबा खूप संतापलें. त्यांनीं आईला पत्र वाचून दाखविलें नाहीं पण मजकूर सांगितला. भय्यालाही तें कळलें. त्याची मति कुंठित झाली ! उभय कुलें जीं सलोख्यानें, एकोप्यानें,

प्रेमानें जखडलीं जायचीं तीं अशा पायांवर हट्टानें, धाकदपटशानें, अरे-रावीनें काय ? आणि दोन्ही कुलांच्या अब्रूची त्याकरितां आज-अगोदर ही अशी हानि व्हावयाची वेळ यावी ? असल्या बेफाट, आचरट, मूर्ख, दुष्ट घरण्याशीं संबंधही नको, आणि त्यांची मुलगी आपल्या घरीं करूनही घ्यावयाची नाहीं, असें बाबा ठरविण्याच्या बेताला आले होते ! पण बाबा, आई, भय्या, वगैरे एकत्र जमले. त्यांनीं खूप–खूप विचार केला. कुणी तरी हा मध्येंच दुष्ट बुद्धीनें चावटपणा केला असला पाहिजे. त्यांत कांहीं अर्थ नाहीं, व तिकडे लक्ष देण्याचें तादृश्य कारणही नाहीं असें ठरलें. व अनेक जग-जाहिर धिंडवडे करून घेऊन मग ती मुलगी वाजतगाजत आपल्या घरीं येण्या-पेक्षां आपणच अगोदर गुपचूप आणावी; असें बाबांना ठरवावें लागलें. आईनें तसेंच सांगितलें. झाला हा प्रकार अत्यंत वाईट झाला, असें भय्याला वाटलें तरी अखेर ' कमला 'च आपली सहचारिणी होणार हें पाहून भय्याला त्यांतल्यात्यांत बरें वाटलेंसें दिसलें !

भय्याचें लग्न ठरलें !

लग्नाच्या तयारीला मंडळी लागली. कमलेच्या वडिलांनीं बाबांना चांग-लेंच व निष्कारण प्रथमच दुखावलें. पण बाबांनीं परिस्थितीकडे लक्ष देऊन तें गिळलें. आईच्या समाधानाकडे, भय्याच्या कायमच्या सुखाकडे लक्ष पोंचवून कमलेलाच भय्याला करून घ्यावयाचें ठरविलें.

ज्या मुहूर्तावर भय्याचें व कमलेचें लग्न ठरलें; त्याच मुहूर्तावर मुंबईहून बाबा ज्यांना घेऊन आले, त्यांच्याशीं माझा विवाह ठरला. माझ्या लग्नांत कुठला अडथळा ! वैगुण्य, असमाधानाला जागा वगैरे कांहींच नव्हतें.

कमलेच्या बाबतींत मात्र बाबा त्या वेळेपासून अगदीं मुग्ध असत. बरें किंवा बुरें कांहींच बोलत नसत ! कोणी त्यांना खोदखोदून विचारलेंच तर ते दीर्घ निश्वास सोडीत. मग त्या वेळीं त्यांच्या मनांत काय चाले कोण जाणें ?

बाह्योपचार सर्व ठाकठीक चालू होते. मंगलकार्यें मोठ्या कडाक्यानें व गाजतगर्जत उरकलीं. वधुवरें विवाहबंधनांनीं निगडीत झालीं इष्टमित्रांना यथेच्छ मेजवान्या मिळाल्या ! सर्व कांहीं चांगलें झालें. माझ्या आईला बरें वाटलें. कन्यादान करतांना तिच्या डोळ्यांतून अश्रू आल्यावांचून राहिले

नाहींत. पण ते अश्रू आनंदाचेच होते! कमला केतकर आमच्या घरीं माझी वहिनी म्हणून अखेर आली! तिच्या, तिच्या वडिलांच्या मनासारखें झालें. भय्यालाही समाधान झालें. सुनमुख पाहायला मिळालें म्हणून आईला देखील आनंद झाला. पण बाबांच्या जिव्हारीं बसलेल्या घावाची दाद कोणाला होती? फक्त एक त्यांची त्यांनाच!

कमलेच्या एका पत्रानें बाबांच्या जिव्हारीं घाव बसला होता हें कोणालाच कित्येक दिवस कळलें नाहीं! कसें कळणार?

कां कोण जाणें! बाबा मात्र कमलेसंबंधीं कसल्याही प्रकारचा चकार उच्चारीत नसत!

आपल्या मुलांच्या सौख्यासाठीं वडील माणसें कसकसे हृदयावर घाव घेत असतात, आणि ते लपवून ठेवून मंगलकार्यें धिमेपणानें उरकीत असतात, हें सांगितलें तरी कुणाला खरें वाटेल का? पण माझ्या बाबांनीं तें आपल्या वर्तनानें प्रत्यक्षांत आचरून दाखविलें होतें. हें मला पक्कें माहीत आहे! बाह्यतः दिसणारीं सर्वच कार्यें अंतर्बाह्य मंगलच असतात असें नाहीं! प्रेमानें, गोडीनें, सुखानेंच सारीं मंगलकार्यें होत असतात, असें जोंपर्यंत माझ्या बाबांचें सर्व चरित्र माझ्यापुढें उभें आहे तोंवर मी तरी कांहीं खास तसें म्हणणार नाहीं! मी या विचित्रपणाचा नेहमीं विचार करीत असतें. ‘ शुद्ध बीजा पोटीं फळें रसाळ गोमटीं ’ असें म्हणतात. पण प्रत्येक ठिकाणीं तसें असतें का? चिखलांतच कमळाचा जन्म कां होतो? काळ्याकुट्ट ढगांच्या राशींतच डोळे दिपविणारी विद्युल्लता कां चमकते? ‘ माता ’ समजल्या जाणाऱ्या गायीचें तोंडच अपवित्र कां असतें? मी किती किती विचार करी. पण याचा मला उलगडा होत नसे व तसाच मंगलकार्याच्या मुळाशीं कुणाला तरी हृदयाच्या टोंचणीचें शल्य रुजलेलें असतें तें कां? हेंही समजत नसे. पण मी म्हणतें,

असें मंगलकार्यांतसुद्धां अमंगलाचें बीज रोवण्यांत परमेश्वराचा कांहीं हेतु असेल का?

---

# प्रकरण ८ वें

## मांडवझळा !

एकादी मोटी आणि चांगली गोष्ट होऊन गेली म्हणजे तिच्या अनुषंगानें बऱ्याच वाईट, त्रासदायक गोष्टी घडावयाच्याच, असा कांहीं नियम असतो कीं काय कोण जाणें ! घर बांधून पाहावें, लग्नकार्य करून बघावें, अशी एक जुनी म्हण आहे ती देखील अशाच कारणाकरितां पडली असावी असें वाटतें. घर बांधलेलें तेवढें दिसतें; लग्नकार्य होऊन गेलेलें दिसतें; पण तीं उरकतांना कर्त्याचा जीव किती हैराण होत असतो; त्याला अगोदर आणि नंतरही त्याचे वेडेवांकडे परिणाम कसे आणि किती भोगावे लागतात हें 'जावें त्याच्या वंशा' तेव्हां कळावयाचें !

आमचीं लग्नें होऊन आम्ही नव्या सुखाच्या नादीं लागलों हें खरें. पण त्याकरितां बाबांना किती त्रास झाला, त्यांचे किती हाल झाले; याबद्दलची दाद कुणाला असणार ? कर्ते ते. त्यांना त्रास व्हावयाचाच. त्यांत विशेष काय ? कर्तेपणा पाहिजे असेल तर त्या त्रासाची कुरबुर करून कसें चालेल ? असें कुणीही विचारणारच ! कर्त्याला कुरकुर करायला तोंड नसतें; आणि बाबा तशी कधीं कुरबुर करतांना कुणालाही दिसले नाहींत ! त्यांनीं कार्याकडे नजर दिली आणि शेवटीं गोड तें सारेंच गोड असें व्यवहारांत प्रत्यक्ष वागण्यानें सर्वांना दाखविलें. बाबांच्या अशा वर्तनानें आमच्या वहिनींचे वडील तर चकितच झाले. अगोदर बाबांच्या विरुद्ध केलेल्या कांगाव्याबद्दल त्यांना पश्चातापसुद्धां झाला असेल. व्याही झाले. सर्व गोष्टी त्यांच्या मनासारख्या झाल्या. बाबांनीं त्यांना अतिशय आदरानें वागविलें. मग ते आश्चर्यानें थक्क कां होणार नाहींत. भय्यासारखा लाखांत न मिळणारा जांवई त्यांना मिळाला. मग त्यांना खुषींत नसायला काय झालें ? कमळावहिनी मात्र अवघा दिवस तोऱ्यांतच वागत असे. ती आपल्या वर्तनावरून जणूं काय साऱ्यांना न बोलतांच समजावून देत होती कीं "ज्यांची इच्छा मीं या घरीं येऊं नये अशी होती, त्यांच्या–बाबांच्या–नाकावर टिचून आलेंच कीं नाहीं या घरांत घरधनीन म्हणून !' कार्य होऊन जाण्यापूर्वी त्या मंड

ळींना त्रास होत होता. आतां त्यांचा ताप संपला होता. त्यांच्या मनासारखें झालें होतें. आतां मनांत आणल्यास त्यांनाच दुसऱ्याला त्रास देतां येण्यासारखें होतें; व त्याचा आरंभ म्हणूनच कीं काय? कमळावहिनी घरीं फारच उद्धटपणानें वागूं लागली होती! नवखेपणामुळें व दुसऱ्या कार्यांच्या व्यापामुळें दुसऱ्या कोणाच्या लक्षांत येण्यासारखें तें नव्हतें इतकेंच!

माझ्या लग्नाचा त्रास अगोदर कुणालाच झाला नाहीं. आणि नंतर तरी दुसऱ्या कोणाला खरें म्हटलें तर होणार होतां? माझ्या मनासारखें झालें, म्हणून मी सुखीच झालें होतें. तिकडच्याही मनासारखें झालें होतें, म्हणून तिकडून आनदांत असायचं होतं. आईला आणि बाबांना मनाजोगता जांवई मिळाला म्हणून त्यांना समाधान होतं.

पण इतकं जरी सारं सुरळीत झालं होतं; तरी माझ्या लग्नाचा परिणाम दुसऱ्या कांहीं मंडळींच्यावर निराळाच होऊन त्यांच्याकडून त्याचें प्रायश्चित्त म्हणून आम्हांला विशेषतः मला त्रास होण्याचा दाट संभव होता. नव्हे, त्या त्रासाला केव्हां आरंभ होईल याचा नेमच नव्हता! हा असा त्रास कुणाकडून पोंचावयाचा संभव होता, हें सांगितल्याशिवाय कळण्यासारखें आहे. पण सांगितल्याशिवाय कळेल असेंही नाहीं. त्याकरितां या कथानकांत सामील झालेली थोडीशी दुसरी हकीकत इथें सांगणं आवश्यक आहे.

भय्याचें लग्न ठरण्याच्या अगोदरच माझ्या लग्नाचं निश्चित झालेलं होतं, इतकेंच नव्हे, तर माझ्या लग्नाचं ठरलं आणि त्याबराबरच भय्याचंही लग्न व्हावं अशी आईनेंच आपली उत्कंठा विशेष प्रकारानें दाखविली म्हणूनच बाबांना भय्याच्या लग्नाची घाई करावी लागली होती. लग्नांत ज्यांनीं हाडं मोडून कामंधामं केलीं होतीं, त्यांना आतां मांडवझळा लागल्या होत्या. बिचारीं कशींबशीं जेवत असत आणि हातपाय तणावून लोळत पडत. त्यांना कसलेंही काम सुचत नव्हतें. या अशा झळा कामकऱ्यांना लागल्या होत्या; तर दुसऱ्याच झळांचा प्रारंभ इतर व प्रमुख मंडळींना जाणवूं लागला होता. जशा भय्याच्या लग्नाआधीं बऱ्याच भानगडी झाल्या; तशाच भानगडीचा प्रारंभ इतरेजनांतून माझ्या लग्नाच्या संबंधांतही झाला. तो असाः—

ज्या दिवशीं बाबा मुंबईहून आमच्या बाळपणींच्या शेजाऱ्याला—एका

माणसाला घेऊन आले आणि आईनीं व त्यांनीं माझ्या लग्नासंबंधानें वाटाघाटी केल्या; त्याच्या दुसऱ्याच दिवशींची गोष्ट आहे. ती गोष्ट जशीच्या तशीच आपल्यापुढें मांडली म्हणजे चटदिशीं आपल्या ध्यानांत सारा प्रकार येईल.

मी, भय्या आणि सदाशिव ( इश्श ! आतां किनई मला नांव घ्यायची लाज वाटते हो ! पण त्याला इलाज नाहीं ! अशा प्रसंगीं नांव घेतल्यावांचून गत्यंतर काय ? बंधुभगिनी माझ्या या उद्धटपणाबद्दल, निर्लज्जपणाबद्दल मला क्षमा करतील ही मला आशा आहे. असो ! ) दुसरेच दिवशीं पलिकडच्या माडींत कांहीं तरी बोलत बसलों होतों मला प्रथम थोडी तिथं लाज वाटली; पण भय्याच्या आग्रहानें व तिकडच्याही मोकळेपणाच्या वागणुकीनें मला भलती लाज भिरकावून द्यावी लागून त्यांच्यांत मिसळणं भाग झालं होतं. मला त्यांत मनापासून आनंद वाटत होताच ! भय्या तिकडच्याशीं विचारपूस करीत होता. तिकडून यथास्थित बोलणं होत होतं. मी दोघांकडे सावकाशपणें आळीपाळीनें पहात होतें. मधून केव्हांतरी कुठल्या तरी बोलण्यानें हंसत होतें. माझ्या नुसत्या हंसण्याचा किंवा साध्या हुंकाराचाही त्यांच्या बोलण्याला भरती आणायला पुरासा उपयोग होत होता ! अशीं आम्ही गप्पागोष्टींत पूर्णपणें रंगून गेलों होतों. भावी आयुष्यांतील सुखचित्रें रंगविण्यांत बाह्य व कठोर जगाला अजीबात विसरून गेलों होतों. त्याच वेळीं:—

" हॅलो ! भय्या ! हाऊ डू यू डू ? ॲण्ड,—"

या अशा पृच्छेनें कुणी तरी आमच्या तंद्रेचा मध्येंच भंग केला. आम्हीं सर्वांनीं एकदम दचकून आवाज आला त्या दिशेकडे वळून पाहिलें. आमच्याजवळ बेधडक येऊन अशा बेधडकपणानें विचारणारा बाबूरावाशिवाय दुसरें कोण असणार ? होय ! तो बाबूरावच होता. आमचें त्रिकूट बसलेलें त्यानें पाहिलें. मला वाटतें दूर उभा राहून आमचें बोलणेंही त्यानें अगोदरच ऐकलें असावें. कारण जवळ येऊन त्यानें भय्यालाच जरी क्षेमकुशलतेचा पहिला प्रश्न केला तरी, त्यानें आपले घारे डोळे माझ्यावर व तिकडे एकदां तितक्यांतल्या तितक्यांत फिरवलेच. त्याच्या गरुड नाकावर माशीच्या नाजुक पायाचें सूक्ष्म नृत्य झालें असावें अशी मला क्षणभर शंकाही आली !

कुणी तरी परका तरुण माझ्याकडे पाहात हसत उल्हासानें आणि हात वारे करीत मलाच उद्देशून कांहीं गोष्टी सांगत आहे मीही त्या आनंदीमुद्रेनें व कुतुहलानें एकाग्रमन करून प्रसन्न अंतःकरणानें ऐकण्यांत रंगलें आहे, असा देखावा बाबूरावासारख्याला कसा बरा वाटावा, कसा आवडावा ? आणि असें दृश्य तर त्याच्या डोळयांनीं त्याला प्रत्यक्षच दाखविलें होतें. मग त्याचे कावेबाज घारेडोळे आमच्यावर क्षणमात्र खिळल्याखेरीज, भिवया चढल्या खेरीज, कपाळाच्या तिरस्काराच्या, मत्सराच्या, द्वेषाच्या उभ्या एकदोनच आठ्या उठल्याखेरीज आणि नाकाचा अणकुचीदारशेंडा लालसरहोऊन किंचित् फुरफुरल्याखेरीज कसें होणार; क्षणमात्रांत बाबूरावाच्या मुखावर इतके फरक झाले असले पाहिजेत. मी त्यांच्याडे पहिल्याझटक्यासरशीं वळून निनिमिषमात्र पाहिलें असेल नसेल लगेच मीं माझी मान वळविली व खालीं पायाच्या आंगठ्याकडे पाहूं लागलें. नंतर मला तिथें बसूं नये असें सुद्धां वाटूं लागलें. उठण्याविषयीं मन चुळबुळ करूं लागलें. पण काय झालें कोण जाणें ! माझें शरीरच जागचें हालेना ! तरीपण तितक्यांतून मी उठण्याचा प्रयत्न केलाच. उठलेसुद्धां ! पण भय्या म्हणाला, “ बैस ग ताई; उठायला काय झालं तुला इतक्यांत ?” तसेंच “ बसाहो, निघालांत काय ? मी आलों म्हणून निघालांत काय ? मला इतकं लाजायचं कांहीं कारण नाहीं. आपल्याला बायकांनीं असं लाजलं बिजलेलं नाहीं खपत बुवा ! बसा ! ” असं कांहींच्या बाहींच बोलून माझा लघळपणाचा परामर्ष घेण्याची संधि बाबूरावांनीं दवडली नाहीं. मी त्याच्याकडे पाहिलें नाहीं कीं बोललेंही नाहीं. बाबूरावाच्या या विक्षिप्त विचारण्यानें तिकडचें लक्ष मात्र त्याच्याकडे क्षणभर गेल्याशिवाय राहिलें नाहीं. भय्यानें बस म्हटल्यामुळें माझें उठण्याचें उसनें आणलेलें धैर्य तत्क्षणींच कुठच्या कुठें पसार झालें. मी जागच्याजागींच बसलें. न उठून जातांना पुन्हां बसलें, पण त्या बसण्याची मीमांसा मी माझ्याशींच अशी करून घेतली कीं “ बाबूराव आला म्हणून मीं कां उठून जावें ? त्याला कां भ्यावें ? कां लाजावें ? तो माझा कोण मी त्याची पर्वा कां करावी ? जवळ भय्या असतांना आणि तिकडची स्वारीही समोर असतांना बाबूला भ्यायचं आणि लाजायचं कारण काय मला ? त्याला मी असा मान

देण्याइतकं तरी त्याचं महत्त्व काय आहे ? डोंगरासारखा पाठीवर पाठिराखा भाउराया आणि आपलें आवडतें माणूस जवळ असल्यावर स्त्रिया जगांत कोणाला भिणार ? कुणाला दचकणार ? आणि जगांत त्या पर्वा तरी कुणाची करणार ? बस्स ! नाहींच इथून मी हलणार ! " अशा तेवढ्या वेळांत किती तरी कल्पना डोक्यांत भराभर येऊन गेल्या व मी त्या आधारावर स्वस्थ बसलें !

बाबूराव नित्याप्रमाणेंच भय्याच्या भेटीच्या निमित्तानें पण माझ्याशीं लघळपणा करण्याकरितां आला असेल. येतांच ऐटींत डाव्या हाताचा भय्याला " हॅलो " करीत सॅल्यूट केला, माझ्याकडे पाहिलें; पण त्याचवेळीं त्यानें आमच्यांत तिऱ्हाईत तरुणाला पाहिलें आणि आपल्या हुच्च उपरे-पणाचा मोर्चा त्यांच्याकडे त्यानें वळविला.

" आपण मुंबईचे वाटतें ? " एकदां नखशिखांत स्वारीला न्यहाळून बाबूरावानें एकदम प्रश्नाची सरबत्ती उडविली.

" होय ! " असं अर्धस्फुट तोंडांतून आणि किंचित् मानेच्या झुकवि-ण्यानें स्वारीनें उत्तर दिलें. त्याच वेळीं किंचित् भय्याकडे आणि मजकडेही स्वारीची नजर वळली. प्रश्नाला उत्तर मिळाल्यावर काय ? बाबूरावांच्या प्रश्ना-वर प्रश्नाला सुरुवात झाली. " मला वाटलेंच तें ! मुंबईच्या माणसाचा पोषाख आणि भाषेची ढब यावरून मनुष्य ताबडतोब ओळखतो " अशी सुरुवात करून, " तुम्हीं हायस्कूलमध्यें असतां कीं कॉलेजांत ! रहातां कुठें ? कोणत्या विषयाचे आपण अधिक चाहते आहांत ? कोणतीं पुस्तकें वाचलीं आहेत ! अमके तमके प्रोफेसर आपल्या माहितीचे आहेत काय ? त्यांच्या खाजगी वर्तणुकी कशा आहेत ! कॉलेजांत ते कितपत पाप्युलर आहेत कॉलेजांतील विद्यार्थी कोणत्या प्रोफेसर मजकुरांची पगडी उडविण्याच्या प्रयत्नांत असतात ? फलाण्या कॉलेजांतील फिलासफीचे प्रोफेसर अजून आहेत का विलायतेला गेले ? त्यांचा तुमचा परिचय कितपत आहे ? ते नागपूरकडे हैस्कुलांत हेडमास्तर असतांना मी त्यांचा आवडता विद्यार्थी होतों. वयाच्या पंधराव्या वर्षी मी त्यांच्या अध्यक्षतेखालीं पंधरा हजार समाजापुढें दीड तासपर्यंत अस्खलित " समर्थांचें राजकारण " या अवघड विषयावर जाहीर व्याख्यान दिलें होतें व त्यांची शाबासकी मिळविली होती. तुम्ही फिलॉ-

साफीचे विद्यार्थी आहांत काय? ज्ञानेश्वरीचा सूक्ष्म अभ्यास तुम्हीं केला आहे का? आमचे ते प्रोफेसर ज्ञानेश्वरी व दासबोध या दोन ग्रंथांना जगाच्या वाङ्मयांत अग्रस्थान देतात ते उगीच नाहीं!" वगैरे वगैरे बेसुमार बाबूराव बडबडत सुटले होते. त्याच्या बोलण्यांत अडथळा कोण आणणार? भय्या आपला ऐकतच बसला. तिकडून कधीं "हूं! असं असं! किंवा मला तें माहीत नाहीं. असं का!" एवढेंच उत्तरादाखल म्हणावयाचें होत असे आणि बाबूरावाच्या बडबडण्याच्या गाडीला तेवढीच हिरव्या निशाणाची लाईन क्लीअर पुरी पडत होती!

त्याच्या कल्पनेप्रमाणें त्यानें आपल्या ऐसपैस बोलण्यानें स्वारीवर छाप तर ठेवून दिली! आणि इतकें झाल्यावर मग जवळचें सिगारेटचें पॉकेट काढून स्वारीपुढें व भय्यापुढें करीत व त्यांनीं 'एक्सक्यूज' म्हटल्यावर आपणच ओढायला लागून शेवटीं भय्याला बाबूरावानें विचारलें, "भय्या लेका आम्हींच आमची ओळख या तुझ्या पाहुण्यांची करून घेतली. आम्हीं आमची करून दिली. पण तुझी कांहीं वाचा उकलते का? नुसतां स्कॉलर आहेस झालें. स्कॉलर म्हणजे मूर्ख! व्यवहारशून्य! बेअकली! पुस्तकांतले किडे! एक्सक्यूज अं मिस्टर! मी भय्याला असं म्हणतों म्हणून राग येऊं देऊं नका तुम्हांला! असं हें आमचं पहिल्यापासूनच आहे! मी आपला असा ऐसपैस आणि उघड्या दिलाचा माणूस आहे. काय, भय्या, या वेळीं तुझ्या हातांत पुस्तक कसें नाहीं. तुम्ही म्हणजे सोमलांतल्या किड्या सारखे! सोमलांतले किडे जसे सोमलांतच मरायचे तसे तुम्हीं स्कॉलर पुस्तकांतच डोकें खुपसून मरायचे! तुमचा तुम्हांला कधीं उपयोग व्हावयाचा नाहीं आणि तुमच्याकरितां पाण्यासारखा पैसा खर्च करणाऱ्या तुमच्या आईबापांनाही तुमचा उपयोग काडीचा व्हावयाचा नाहीं! खरें कीं नाहीं भय्या मी म्हणतों यांत तथ्य आहे कीं नाहीं? बाकी, तूं तसा निघणार नाहींस ही खात्री आहे आमची! मी तुला सांगून ठेवतों पण भय्या, तूं आमच्यासारखा असा जरा उडाणटप्पू होशील तरच व्यवहारांत निभशील, नाहीं तर पट्दिशीं मरून जाशील पहा!" इतकें म्हणून बाबूराव आपण कायपण बोललों अशा विजयी मुद्रेनें माझ्याकडे आणि तिकडच्या चेहऱ्याकडे पाहूं लागला. तिकडच्या मनावर बाबूरावाच्या बोलण्याचा काय परिणाम

झाला असेल कोण जाणें ! त्यांनीं चेहऱ्यावर किंचित्‌च फरक सुद्धां केला नाहीं. मग मनांत काय चाललें असेल देव जाणें ! मला मात्र त्याच्या अभद्र बोलण्याचा भारीच राग आला होता ! " मरण, मृत्यु, " याशिवाय त्याच्या तोंडांत दुसरे शब्दच नव्हते ! मग मला राग आल्याखेरीज कसा राहील ? त्या वेळीं एकदां मधूनच ते तसले त्याचे घाणेरडे शब्द ऐकण्यापेक्षां उठून जावं असं वाटलें पण गेलें मात्र नाहीं !

भय्यानें मध्येंच विषय बदलण्यासाठीं बाबूरावाची आचरट चर्पटपंजारी थांबविण्यासाठीं तोंड उघडून दोघांचा परिचय करून देण्याचा थोडासा प्रयत्न केला पण बाबूरावानें तो भय्याचा प्रयत्न सफल होऊं दिला नाहीं. त्याचें त्याच्याकडे लक्षच नव्हतें. त्यानें पुन्हां भय्याकडेच मोर्चा करून म्हटलें; भय्या, लेका, तूं आमच्यापासून बऱ्याच गोष्टी लपवून ठेवूं लागला आहेस हं ! बरं नव्हे हें ! मिस् केतकरच्या संबंधांत वाङ्‌निश्चयापर्यंत तूं प्रगती केली आहेस; हें तूं एका शब्दानें कांहीं आम्हांला कळूं दिले नाहींस. काल माझी तीची वाटेंत गांठ पडली होती. मी तिला थांबवून मुद्दाम चौकशी केली. तेव्हां तिच्याकडून कळलें हें ! पण तूं कांहीं दाद लागू दिली नाहींस ! वा: ! खूप आहेस ! आम्हांला कळूं दिले असतेस तर काय आम्ही तुमच्या या लव्ह अफेअरमध्यें बिब्बा घालणार होतों काय ! पहा मुंबईकर आमच्या भय्याच्या वागण्याची व वागविण्याची तऱ्हा ! जाऊं दे भय्या ! तुझा स्वभावच तसा आहे त्याला तूं काय करणार ? आम्ही तें विसरून जातों व तुला थोर मर्जीनें क्षमाही पण करतों. मग तर झालें ! काल मिसेस केतकरचं मी अभिनंदन केलं आज तुझंही अभिनंदन करतों ! अच्छा, जातों मी भय्या. आतां येऊन बराच वेळ झाला ! आल्यासारखा आमच्यासारख्या श्रेष्ठ पुरुषाला तूं किंवा तुझ्या सिस्टरनें चहा सुद्धां देऊं नये ही दुर्दैवाची नवलकथा आहे. पण जाऊं दे ! त्यांत विशेष कांहीं नाहीं. माझा चहा आतां प्रिन्सिपल साहेबांच्या बंगल्यावरच होईल. मला तिकडेच जायचें आहे आतां !- असा 'ऑ' करून माझ्याकडे काय पहातो आहेस ! अरे, प्रिन्सिपलनीं मला मुद्दाम बोलावलं आहे बंगल्यावर ? कां ? तुला तेवढं त्यांनीं बोलवावं आणि आम्हांला बोलावूंच नये वाटतें

त्यांनीं ! अरे, प्रिन्सिपलसाहेब झाला म्हणून काय झालं? आतां गॅदरिंग आलं आहे ना ! आमच्याशिवाय त्यांचं गॅदरिंगच्या वेळीं चालायचं कसं? तुमच्यासारखे पाप्याचे पितर या वेळीं काय उपयोगी पडणार कपाळ ? आमच्या शिवाय गॅदरिंग सुखरूप पार पडत नाहीं; जेवण होत नाहीं. नाटक होत नाहीं. प्रिन्सिपलनीं नाटक स्त्रीपार्टीशिवाय केलं पाहिजे नाहीं तर नाहीं. असा "जी आर" काढला, पण आम्हीं अशी मेख मारली कीं थंव ? प्रिन्सिपालना एवढें तोंड वासावं लागलं आणि आमच्या प्रत्येक अटीला त्यांना मान्यता द्यावीच लागली. मोठा प्रिन्सिपल झाला म्हणून काय झालें ? जातो कुठें आमच्यापुढें ! एवढा अरेराव, पण असा आमच्या पुढं " आमी " आला आहे कीं बोलूं नकोस ! आतां बेटा बंगल्यावर बोलवतो आहे ! अच्छा आहे म्हटलं. म्हणून तिकडे निघालों आहें. भय्या, गॅदरिंगचा सेक्रेटरी मी आहें. स्त्रीपार्ट्यांना मी सजविणार. नाटकाच्या तालमी मीच देत असतों आहेस कुठें तूं ! आतां दाढीला हात लावशील तर तुझी गॅदरिंगांत सोय लागेल नाहीं तर नांव कशाला ? असा आम्हीं तुझ्या करड्या प्रिन्सिपलला वठणीवर आणला आहे पहा ! बरें ! - जातों म्हणजे जातोंच आतां--गुडबाय-- "

पण भय्यानें त्याला थांबाविला. मला चहा आणायला त्यानें सूचना दिली. मी त्याकरितां जायला उठलें. चहाचें नांव काढल्यावर व त्याकरितां मी प्रत्यक्ष उठलेंच हें पाहून बाबूराव पुन्हां घोंटाळला. थांबला. " बरं आहे मिस्टर–किती दिवस इथं मुक्काम आहे ? मुंबईला परत केव्हां जाणार !–आम्ही मुंबईला येऊं तेव्हां तुमच्याकडे अवश्य येऊं–ओळखीबळख ठेवा आमची –अरे, पण भय्या, इतकें झालें, तरी तूं आमची यांची तशी ओळख करून दिलीच नाहींस. आतां तरी मूर्खा, ओळख करून दे ना ! असा थांबत थांबत बाबूराव म्हणाला. भय्या हंसला तीकडूनही हंसणं झालं. त्या हंसण्याचा अर्थ काय होता कोणजाणें !

भय्यानें हंसत हंसत ओळख करून दिली. तो म्हणाला, " बाबू, तूं जसा आतां आमचा शेजारी; तसेंच हे आमचे बालपणाचे शेजारी. तुम्ही ज्या घरांत हल्लीं राहतां, त्याच घरांत आमच्या लहानमंडळी रहात होती. हे अनंतराव मास्तरांचे चिरंजीव यांचें नांव सदाशिवराव. हे याच वर्षी

B. S. C. झाले आहेत. आणि बाबू, यापेक्षां आतां यांची जास्त जवळची ओळख करून द्यावयाची म्हणजे-" इतकें म्हणून भय्या केवळ आवंढा गिळण्याकरितांच थांबला. मी अजून तिथेंच घुटमळत होतें. दारापर्यंत सुद्धां गेलें नव्हतें. भय्यानें एकदा माझ्याकडे व तिकडे पाहिलें. किंचित् हंसल्यासारखें केलें आणि बाबूरावाला त्यानें सांगितलें; " बाबू, तुला विशेष आनंदाची गोष्ट सांगावयाची म्हणजे हा सदाशिवराव म्हणजे आमच्या ताईचे बाबांनीं योजून निश्चित केलेले, ताईनें पसंत केलेले ताईचे भावी पति होत ! यांचा व ताईचा प्रीतिविवाहच्च निश्चित झाला आहे म्हणेनास ! "

सरळ आणि भाबड्या मनाच्या भय्याचे सारे शब्द बाबूरावाच्या कानांत घुसले कीं नाहीं कोण जाणें ! त्याचे डोळे गरगर फिरले. आंगाला झटका बसला. " काय ? " असें प्रश्नार्थक त्यानें सर्वांकडे पाहिलें. व्यतिपात, वैधृति, आमावास्या, ग्रहण, वगैरे झाडून सारे अशुभ एकदमच गोळा झाले कीं काय ? असें त्याला वाटलें. मस्तकावर अशनीपातच झाल्यासारखें झालें. त्यानें भेदक आणि दुष्ट नजरेनें एकदां तिकडे पाहिलें. मी जिन्यांतून जातां जातां वळून मागें पाहिलें, " त्याचे डोळे अग्नीच्या ठिणग्या फेकताहेत असा मला दिसला. कोंकणांतल्या विषारी व हलकट सापाप्रमाणें त्याचे फुत्कारे चाळले आहेत असें मला वाटलें ! त्याच्या अंगाची व मनाची नुसती तडफड उडून गेली होती ! कां नाहीं उडणार ? त्यानें आल्यापासून ज्या विश्वासाच्या जोरावर एवढा बोलघेवडेपणा चालविला होता. आमचा त्याचा कसा संबंध जोडणार आहे हें त्याला तिकडे ज्या घमेंडीनें समजावून द्यावयाचें होतें. तें आतां चट्सारें कोठच्या कोठें पळालें होतें. मी व तो यांच्याकडे ज्या दृष्टीनें तिकडून पहाणं व्हावं म्हणून त्यानें इतकी आचावचा चालविली होती. त्याचा उपयोग न होतां उलट भय्यानें दिलेल्या माहितीमुळें त्यालाच आतां माझ्याकडे व तिकडे निराळ्या दृष्टीनें पहावें लागलें होतें व तेंही त्याच एका बैठकींत ! मी तशीच खालीं गेलें. मी परत येईपर्यंत आणखी तिथें काय काय झालें हें मला कळलें नाहीं. पण मी जेव्हां चहा घेऊन वर आलें तेव्हां सर्वत्र स्तब्धता होती कोणीच बोलत नव्हतें. बाबूराव अजून स्तब्ध होताच. त्याचा नूर अजीबात बदलला होता. बोलला तेव्हां कळलें कीं, त्याच्या आवाजांतला घटकेपूर्वींचा खणखणीतपणा राहिला

नसून तो बद्बद्ला आहे! हें असें कां झालें हें मला कळलें. भय्याला समजलें असेल. पण तो बोलला नाहीं. तिकडच्या लक्षांत तो फरक येण्याचें विशेष कारण नव्हतें. मनुष्य तास दीड तास अस्खलित बोलून गेल्यानंतर थांबला म्हणजे दमतो व शांतही होतो. असा तिकडचा बाबूरावाविषयीं समज होण्याचा संभव होताच! बाबूरावाची तयारीही पण तशीच दांडगी. कां सैतानाचा त्याच्यावर वरदहस्तच कोणजाणें! पण त्यानें अटोकाट प्रयत्न करून घसरत्या मनाला सावरून धरलें असलें पाहिजे. त्यानें आपला राग–त्वेष–मत्सर–हीं सर्व आंतल्या आंत दाबून टाकण्याची शिकस्त केली असली पाहिजे.

नंतर पण लगेच तो तेथून झटकलाच. चहा झाल्यावर थांबलाच नाहीं. निरोप घेऊन गेला.

ही गोष्ट घडून गेल्यावर बाबूरावाची आई नेहमीं यायची ती बंद झाली. इतकेंच नव्हे तर आमच्या लग्नाच्या वेळीं कांहीं तरी निमित्त काढून भावाच्या बायकोच्या बाळंतपणाचें निमित्त काढून माहेरीं चालती झाली. आमची निंदा चौपट सुरू केली. आईला लाखोली वाहिली. लग्नानंतर बरेच दिवसांनीं ती घरीं आली तोंडावर लटका हंसरेपणा आणून आईजवळ समाधान व्यक्त केलं. पण कुचकेपणानें "ताईला सासूसासरा-दीर मंडळी असती तर दुधांत साखर पडली असती. पण तिच्या तें नशिबांतच नव्हतं तर त्याला तूं काय करशील!" असें म्हणायला तिनं कमी केलं नाहीं. हिच्या घरीं पडलें असतें तर सासूसासऱ्याचें सौख्य मला मिळालें असतें हेंच तिच्या बोलण्यांतलं सार होतं! दुसरं काय! बाबूराव त्या दिवसानंतर चार आठ दिवस आमच्याकडे आला नाहीं, हें खरें पण पक्का निलाजराच मेला तो. आमच्या लग्नसमारंभाला आलाच. आरवला मिरवला. धूम माजविली, भय्याची, माझी, माझ्या वहिनीची देखील त्यांनीं वेळीं अवेळीं हवी तशी थट्टामस्करी केली. तिकडची देखील त्यानें थट्टा करायला कमी केलं नाहीं! त्या समारंभांपासून मला त्यानं "ताईसाहेब" या संबोधनानें बोलायला आरंभ केला! मी मात्र त्याच्याकडे पाहाण्याचं प्रत्येक वेळीं टाळीत होतें. त्याच्याकडे पाहिलं कीं मला भीतिच वाटत होती. मेला मेल्याचे डोळे खुनशी–सूडी असेच दिसायचे. त्याला मी तरी काय करूं?

आमच्या लग्नसमारंभांतून ज्यांनीं ज्यांनीं अतिश्रम केले त्यांत बाबूरावाचीही धामधूम होतीच. त्याच्या संबंधानें पुन्हां एकदां विषय निघाला असतां तिकडून भय्याजवळ सहज म्हणून म्हणायचं झालं ही असली मंडळी असतात बरी. धडाडीची असतात पण वाहवलेली असतात ! यांचें शहाणपण राजमार्गानें न जाता गटारांतूनच वाहू लागतं. त्याला कित्येकदां जमावं लागतें. ही मंडळी चांगल्या रस्त्यानें जातील तर किती तरी चांगली कृत्यें करतील यांत शंका नाहीं. पण दुर्दैवानें तसें सहसा झालेलं आढळत नाहीं इतकच काय तें त्यात वाईट असतें ! हा तुमचा बाबूराव चांगला तर होईल. पण कोणी सांगावं तो काय होईल हें ? माझं त्याच्या संबंधानें मत चांगलें झालं नाहीं इतकं मात्र खरें ! पुढें बदलल्यास नकळे !"

ती एक तिकडची सावधगिरीची सूचनाच मी समजले. तसेंच त्याच्या संबंधानें कांहीं प्रकाश पडला आहे हें कळून मला तितकंच बरंही वाटलें !

मी बाबूरावा संबंधानें अगदीं पहिल्यापासूनच खूणगांठ बांधून ठेविली होती कीं इतरांना मांडवाचीच झळ लागली आहे. पण बाबूरावाला त्याच्या कल्पनेप्रमाणें त्याच्या आगोदर पासूनच झळ लागलेली आहे. त्या झळीचं देह तो सर्पाच्या जातीचा वाटत असल्यामुळें केव्हा काढण्याचा प्रयत्न करील तेव्हां त्याच्यापासून आपल्याला नित्य सावधच असलं पाहिजे इतकं बरीक खरें आहे. मी त्याप्रमाणें अगदी अखेरपर्यंत सावध राहिलें. पण त्यांचा काय उपयोग नव्हता हें त्यावेळीं मला कुठें कळलं !



# प्रकरण ९ वें.



## पांडोबांचा प्रपंच !

आमचे पांडोबा वाटेकरी आमच्या लग्नाच्या वेळीं अगदीं सकुटुंब सपरिवार आले होते. पांडोबांना आणलंच पाहिजे, त्यांची या वेळीं कोणतीही सबब ऐकू नये. चार दिवस शेतामाळांतल्या कामाची खोटी झाली तरी हरकत नाहीं. नुकसान झालें तरी चालेल पण पांडोबा आलेंच पाहिजेत असें आईनें बाबांना अगदीं बजावून बजावून सांगितलें होतें. व बाबांनाही पांडोबा आलेच पाहिजेत असें मनापासून वाटत होतें. त्याप्रमाणें बाबांनीं त्यांना निक्षून निरोप धाडला होता. पांडोबाही पण अगदीं आनंदानें बायकामुलांसह आले. ते आल्याचें पाहून सर्वांनाच आनंद झाला. पांडोबा जातीचे कुळंबी. आमचे वाटेकरी. शेतांत रात्रंदिवस राबत. त्याचकारणानें त्यांची राहणी जराशी मळीण. पण त्यांचीं अंतःकरणं किती तरी धुवट. अगदीं लहानपणापासूनची मला आठवण आहे. पांडोबा केव्हां तरी सठीसहामाशीं शेतावरून घरीं यायचे; पण येतांना शेतांतली कसली तरी भाजी तर आणायचेच पण आम्हां मुलांकरितां शेताच्या बांधावरच्या झाडांचीं फुलें आणायचे. आंब्याच्या दिवसांत आंबे, पाडाचे, कैऱ्या, पिकलेले, सर्व प्रकारचे आंबे आणीत. करवंदाच्या दिवसांत करवंदें, तर जांभुळांच्या दिवसांत जांभळे आणल्याशिवाय कधीं चुकायचे नाहींत. मला बोरें फार आवडायचीं. तशाच आंबटगोड्या चिंचा, पांडोबा आले कीं मी अगोदर त्यांना विचारीत असे कीं, "पांडोबा, मला बोरं आणलींत ? चिंचा आणल्यात ?" मी हें केव्हांही विचारी. पण भलत्या दिवसांत बोरें, चिंचा, आवळे कुठून असणार ! भलत्या वेळींच पांडबा आले आणि त्यांना असें क ! हीं मी विचारलें म्हणजे ते हंसायचे नी मला म्हणायचे " नाहीं ताईसाब, ह्या दिसांत बोरं नसत्यात. म्हणून आणली न्हाईत पघा. आतां म्होरल्या वक्ताला तुमच्यापायीं बोरं आणीन हं !" त्याप्रमाणें ते आणीतही असत. म्हणून पांडोबा आम्हां पांढरपेशाप्रमाणें धुवटपणानें

वागत नसले तरी आम्हांला त्यांच्याबद्दल भारी आपुलकी वाटे.ते आमच्या घरांपैकींच एक आहेत असें वाटे. ते केव्हांही आले तरी आम्हांला आनंद होई. आम्हीं त्यांच्या सभोंवतीं गोळा होत असूं. पांडोबा जेवायला बसले म्हणजे मीं त्यांना हौसेनें वाढायला जात असे. त्यांनीं " पुर–पुर–पुर ताई-साब, कितीं वाढतायसां म्हटलें तरी मी ऐकायचीच नाहीं. आपली बदबद वाढीत सुटायची.

असें असल्यामुळें पहिल्यापासून शेवटपर्यंत पांडोबाबद्दल आम्हांला परकेपणा केव्हांच वाटला नाहीं. तो आपल्या बायकोमुलाला घेऊन लग्नाला आला हें पाहून बाबांना, आईला जितका आनंद झाला, तितका, किंबहुना त्यापेक्षां जास्त आनंद मला आणि भय्यालाही झाल्याशिवाय राहिला नाहीं. बाबा त्यांना मानीत. तेही बाबांची चांगलीच आदब राखीत ! पांडोबा लग्नाला आले. अडाणी खरे पण तसेच दालदालवीत, चारदिवस गोड घड खाण्याच्या बुभुक्षित आशेंनच कांहीं नुसते आले नाहींत. त्यांनीं आपल्या आवडीप्रमाणें, कल्पनेप्रमाणें व ऐपतीप्रमाणें " आहेर " आणले होते. 'आहेरा'च्या जिन्नसा साध्या, ओबडधोबड, खेडवळ, अशा जरी होत्या; तरी त्यांत पांडोबांचं आमच्या विषयींचं आपुलकीचं मूर्तप्रेम सांचलेलं असल्यामुळें त्याबद्दल आमच्यापैकीं कुणीही नाक मुरडलें नाहीं किंवा तुच्छ लेखलं नाहीं. " पांडोबा कशाला हें आणलेंस ! याच्याबद्दल काय नडलं होतं काय ?" असं बाबा किंवा आई यापैकीं कुणी म्हटलं असतं तर पांडोबाच्या काळजाला तें किती तरी लागलं असतं. त्यानें ते उपचारार्थ वरकरणी केलेलं नव्हतं. त्याचं स्वच्छ गंगेसारखें प्रेमळ अंतः करण त्यांत दिग्दर्शित झालेलं होतं; तर त्याला तसं कोण म्हणणार ! तसं कुणी म्हटलं असतं तर तो पांडोबाच्या गरीबीचा, कुळंबीपणाचा, खेडवळपणाचा, उघड-उघड अपमानच झाला नसतां कां ! त्याचं अंतःकरण दुखावलं नसतं कां ! बाबांनीं किंवा आमच्यापैकीं कुणीही तसं केलं नाहीं. म्हणून पांडोबांना किती तरी अभिमान–आनंद वाटला. " आहेरा " बरोबर त्यानें त्यांच्या पद्धतीप्रमाणें मळयांतल्या " केळीं" आणल्या होत्या. त्यापैकीं बाबांनीं तर कांहीं केळीं प्रत्यक्ष पांडोबाच्या देखत खाल्ल्या.खातां खातां पांडोबाला बाबा म्हणाले, " पांडोबा एवढयाच केळीं आणल्यास ! त्या आमच्या घरांत

पुरायच्या कशारे ? मी एकटाच त्या खाऊन टाकीन. मग बाकीची तुझ्यावर रागावतील ना ?"

बाबांच्या या बोलण्यानें पांडोबाला अस्मान ठेंगणें वाटण्याइतका आनंद झाला. त्याच्या आंगावर मूठभर मांस आल्यासारखें झालें. सांगायचं कारण इतकंच कीं, बाबा पांडोबांना कसे मानीत. पांडोबा बाबांची किती आदब राखीत. त्यांना किती मानीत. आम्हीं पांढरपेशे व पांडोबा कुळंबी खरे पण त्यांच्या अंतरंगीं कुठलाच भेदभाव, उच्चनीच कल्पना, गरीब श्रीमंतीचा भेद किंवा ज्ञानी-अज्ञानी असा खुळा फरक दोघांकडून दाखविला जात नसे. पांडोबा आपली पायरी सोडत नसत, तर बाबा पांडोबाची पायरी कमी प्रतीची आहे असें मानीत नसत. दोघांनाही बाह्योपचाराची, लौकिकी मोठेपणाची फारशी क्षिति वाटत नसे. बाबांना कोटपाटलोण वापरावी लागे तर पांडोबा जाड्या भरड्या वस्त्राच्या कुडत्यानें, मोठ्याशा मुंडाशानें, आणि कमेरभोंवतीं पांच हाताच्या पंचानें आपलें शरीर सजवीत असे. बाबांच्या शेजारीं बसून जेवण्याची पांडोबा अपेक्षा बाळगीत नसे; तर बाबा तो बाहेर बसून जेवतो म्हणून तो आपल्यापेक्षां कमी दर्जाचा आहे असें कधींच समजत नसत. दोघांचीं अंतःकरणें इतकीं स्वच्छ, निर्मळ, पवित्र आणि मायाळू किती तरी एकमेकांविषयीं असत. पांडोबाचा प्रपंच म्हणजे निराळा आणि आपला वेगळा असे असे बाबा मानीत नसत; तशीच अवस्था अडाणी मानल्या जाणाऱ्या कुणबी पांडोबांच्या मनाची असे. ते आमच्या लग्नाच्या वेळीं जेव्हां आले आणि त्यावेळीं कुणी तरी त्यांना जेव्हां विचारलें कीं, "कां पांडोबा, शेतवाडी सोडून कसं बाबा तुला लग्नाला यायला फावलं ?" त्या वेळीं त्यांनीं जें उत्तर त्यांना दिलें; तें एकच त्यांचें उत्तर आपण ऐकल्यावर पांडोबांच्या मनाविषयीं आपली खात्री पटेल. ते त्या विचारणाऱ्याला उद्देशून म्हणाले, "वाः राव ! असं कसं इचारताव तुम्ही माझ्या घरचीं कार्व्ये ही न्हवका ? मग मला याला नग व्हय ! मातींत रातदिस राबतुयाच कीं मग ! आमच्या ह्या ताईसाबांच लगीन निघालं, माझ्या भय्यासाबाचं बी बाबासाबांनीं लगीन काढलं. ह्या वक्तीं याचं नाहीं तर कवा व मंग ? ही मानसं मला परकी हायती व्हय ? "

या पांडोबांच्या उत्तरानें विचारणारा तर थिजलाच. पण आम्हांला

त्यांच त्या उत्तरानेंच भारी कौतुक वांटलें. साऱ्या लग्नकार्यांत पांडोबा जेठा मारून कुठें तरी पिचकाऱ्या मारीत आणि ऐत्या वेळीं पानथाप रामला पंक्तीबारगीर म्हणून कधींच बसले नाहींत, इतकेंच काय तर त्यांनीं आपल्या बायकोला किंवा मुलांलाही तसें वागूं दिलें नाहीं. त्यांच्या हातून जेव्हां जेव्हां आणि जिथें जिथें गरज लागेल तेव्हां तेव्हां आणि तिथं तिथं हौसेनें ते हजर असायचे. कोठीच्या बाजूला पांडोबांच्या बायकोनं आपण होऊन आपली नेमणूक करून घेतली होती. त्यांचा मुलगा हरकाम्यासारखा राबत होता; तर पांडोबाच्या उद्योगाला कसला घरबंधच नव्हता! त्यांना कोणी अमूक करा–तमूक करा, असें सांगण्याची जरूरी नव्हती व त्यांना तसें कोणी सांगितलेंही नव्हतें. उलट एकादें वेळीं आई, बाबा किंवा आमच्यापैकीं मावशीबाई वगैरे कोणी जर म्हटलें, कीं "आतां पुरे करा. बसा जरा एके ठिकाणीं. कांहीं पोटापाण्याची तरी आठवण ठेवत चला." तर त्या वेळीं ते म्हणायचे, "तें सगळें ठीक होतय. बसून काय करायचं आहे?–आम्हीं भाडोत्री कां माणसं आहोंत? घरांतल्या माणसांनीं असं भलत्या वेळीं बसून कसं भागणार? तुम्हीं गप्प बसा. आमच्या सोयीसवडीप्रमाणें आम्हीं आमचं सारं कांहीं करून घेतों आहोंत. आमची नाहीं यावेळीं पत्रास. आपल्या घरीं पै–पाहुणे आले आहेत त्यांची उस्तवारी नीटनेटकी अगोदर झाली पाहिजे." वगैरे वगैरे.

यावरूनच पांडोबा आपल्या प्रपंचाचा पसारा केवढा विस्तृत समजत असत याबद्दल किंचित् कल्पना येईल. स्वतःला विसरून पांडोबा आपल्या सर्व मंडळीसह आंग मोडून काम करण्यांत, कुठें कुणाचें उणें पडूं न देण्यांत चूर असत, तर बाबा, आई हरघडी, फराळाला, जेवायला, पानसुपारीच्या वेळेला, त्यांना हटकून हटकीत असत! त्यांच्या मानपानांत उणें पडूं देत नसत! मग पांडोबा आणि आम्हीं निराळे निराळे आहोंत असें आम्हांला कसें वाटणार? आणि आमच्यांत भेदभावाला जागा तरी कुठें राहणार?

आतांपर्यंत पांडोबा आणि आमचें घर यांच्या मधला ऋणानुबंध कोणत्या स्वरूपाचा होता हें सांगितलें. पण आतां त्याच्या घरापुरतेंच थोडेसें

अधिक सांगावयाचें आहे. त्याचा उपयोग आम्हांला पुढें कुठपर्यंत कसा झाला हें कळण्यास त्यामुळेंच सोयीचें जाणार आहे.

आमच्या लग्नाची गडबड संपली. जिकडची मंडळी तिकडे गेली. पांडोबाही दोनतीन दिवसापासून जाण्याविषयीं चुळबुळ करूं लागला होता. पण त्याला कोणी जाऊं दिलें नाहीं. त्यालाही रहावेसें वाटत होतेंच. अजून आम्हीं सगळी जणें एके ठिकाणीं बसून मनमुराद गप्पागोष्टी करणार होतों. तशी संधि लगीनघाईच्या वेळीं कशी मिळणार होती? म्हणून पांडोबांना बाबांनीं रहायला सांगितलें आणि त्यानें शेतवाडीकडे कांहीं दिवसापुरता चांगला बंदोबस्त करून ठेवला असल्यामुळें त्याला रहावयाला जड गेलें नाहीं.

सर्वत्र स्थिरथावर झाल्यावर एक दिवस चांदण्यारात्रीं आम्हीं सर्वजण आंगणांत बसलों होतों. बाबा होते. आईला जराशीं हुशारी वाटत असल्या-मुळें व तिच्या मानसिक आनंदानें तिला थोडेसें अधिक बरें वाटत आहे, असा भरंवसा वाटूं लागल्यामुळें तीही पलिकडे बसली होती. मी तिच्या-जवळच होतें. माझी कमला वहिनी आमच्या जवळच बसली होती. तिच्या बसण्यांत अधिक मोकळेपणा दिसत होता. ती जितक्या मोकळे-पणानें माझ्याशीं वागे बोले तीच तऱ्हा आईशीं व इतर मंडळीशीं तिची होती. संकोच किंवा उच्चनीचपणा किंवा मर्यादा यांच्या फारशा मर्यादा ती मुळींच राखीत नसे. ती उच्च शिक्षणविभूषित असल्यामुळें तिच्या त्या तऱ्हेनें वागण्याकडे विशेष कडक नजरेनें कुणीच पहात नव्हतों इतकेंच! तिथें त्या वेळीं बाबांच्या बोलावण्यावरून भय्या येऊन बसला होता. तिकडे ही असायचं होतं. पांडोबा, त्याचा मुलगा परसू आणि बायको विठाबाई हीं त्या ठिकाणीं हजर होतींच.

बाबा आज विशेष सुप्रसन्न होते. आई आनंदीत होती. त्या दोघांच्या मनावर कृतकार्याचा सात्विक तजेला झळकत होता असें सांगितल्यास त्यांत अतिशयोक्ति मुळींच नाहीं. बाबा कोणाला कांहीं कोणाला कांहीं मधूनच विचारीत. मंडळीही आपापल्या परी त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें देत. त्या वेळच्या बैठकींत मला नक्की आठवतय कीं, त्या वेळीं कुणी जर अजिबात बोललें नसेल, तर त्यापैकीं मी एक व दुसरा भय्या. कमलावहिनी अगदीं

बेछूट बोलत होती. बाबांच्या प्रश्नाला उत्तर ती अगदीं ठणकावून देत असे. पहिल्यांदा इकडच्या तिकडच्या सामान्य गोष्टी झाल्यावर हळू हळू कोणी कोणी पुढे काय काय करायचें याविषयीं बोलणें निघालें. ज्या सुमारास आमचीं लग्नें झालीं, त्याच सुमारास—त्याच्या अगोदर थोडेंच दिवस भय्या 'बी. ए.' झाला होता. तिकडूनही B. S. C. व्हायचं होतें. त्या दोघांनाही 'पुढें काय करणार? कोणते उद्देश ठरविले आहेत?' असें बाबांनीं गंभीर प्रश्न केले व पुढें म्हणाले, "तुम्हां सर्वांकरितां आम्हीं आतांपर्यंत झटलों आहोंत आणि या स्थितीपर्यंत आलों आहे. आजवर तुम्हांला अमुकच मार्गानें गेलें पाहिजे असें अधिकारानें सांगत आलों. पण आतां तुम्हीं प्रौढ झालां आहांत. स्वतंत्र विचारांची तुमच्यांत परिणति झाली असून, त्याचाच उपयोग तुम्हीं करून घ्यावा असेंच आम्हीं केव्हांही म्हणूं. आतां तुम्हीं 'आम्हीं अमूक दिशेनें जाणार आहोंत, अमूक उद्योग हातीं धरणार आहोंत आणि त्याकरितां तुम्हांला अशा अशा प्रकारचें प्रत्यक्ष साहाय्य हवें आहे' असें तुम्हीं आम्हांला सांगावयाचें व आम्हीं त्याला मान्यता देऊन त्याप्रमाणें वागावयाचें एवढेंच तुमच्या बाबतींत आमचें काम आहे. तुम्हीं जगांत जास्तीत जास्त मोठे व्हावेत; नांव, लौकिक, कीर्ति आणि संपत्ति यांचा यथास्थित लाभ करून, स्वतःला, आप्तेष्टाला, शेजाऱ्याला, देशाला सुखी--समाधानी करायला तत्पर व्हावें, अशी आमची महत्त्वाकांक्षा आहे. तुम्हीं असें तयार होण्याकरितां आमचा देह भूमीला लागेपर्यंत साहाय्य करण्यांत आमच्याकडून कसूर होणार नाहीं.मग बोला? तुम्हांला उच्चतर शिक्षणाचा लाभ घेण्याकरितां विलायतेंत जायचें असेल तर त्यालाही आमची तयारी आहे. तुमची तयारी पाहिजे आहे."

बाबांचें हें सगळें बोलणें भय्याला व तिकडे उद्देशून होतें;हें सांगायला का हवें? भय्याच्या मनांत तें होतेंच.पण तो कधीं तोंड उघडून बोलायचा नाहीं. हें ओळखूनच बाबा त्याला बोलून उत्तेजन देत होते. तिकडे आपण होऊन बाबांना कसं विचारतां येणार? पण तिकडचे विचार बाबांना अगोदर कळले होते, म्हणून त्यांनाही बाबांना जाणवावयाचें होतें. ती वेळ बाबांनीं साधली.

" काय ? भय्याला विलायतेला पाठवायचा विचार आहे ? " आईनें बाबांना कुतुहलानें विचारलें.

" होय ! आणि त्याच्याबरोबर सदाशिवरावालाही ! " बाबा बोलले. त्या वेळीं आईनें त्या दोघांच्याकडे आणि लगेच आम्हां दोघींकडे पाहिलें. बाबा कोणाकडेच पहात नव्हते असें कोणाला वाटलें असतें. पण त्यांची तशी दृष्टि सर्वांच्याचकडे होती. विलायतेला लवकरच जायला मिळणार ही सुखदायी कल्पना भय्याला व तिकडे किती तरी उत्साहाच्या गुदगुल्या करीत होती. मी चोरून तिकडे पाहिलें. माझ्या मनांत त्या वेळीं काय चालले होतें हें मला आतां सांगतां येणार नाहीं. पण मी वहिनीकडे जेव्हां पाहिलें तेव्हां त्याच वेळीं ती बाबांना " मी त्यांना ( भय्याला ) एकट्यांनाच विलायतेला जाऊं देणार नाहीं. मीही त्यांच्याबरोबर जाणार ! एकटी मी येथें राहणार नाहीं ! " असें सांगण्याकरितां उतावीळ झाली आहे कीं काय, असें मला वाटलें.

आई आजारीच असे तरी ती विलायतेला पाठविण्याच्या आड मुळींच आली नाहीं. तिनें उलट आशीर्वादानेंच उत्तर दिलें.

त्या संस्मरणीय चांदण्या रात्रींच भय्याचें आणि तिकडे विलायतेला जायचें जवळ जवळ नक्कीं झालें म्हणाना ! आतां फक्त कोणत्या महिन्याच्या कोणत्या तारखेला, कोणत्या बोटीनें जायचें तेवढें ठरवायचेंच राहिलें होतें. तिकडचे दोन मित्र प्रभाकर क्षीरसागर आणि शंकर क्षीरसागर प्रतिकूल परिस्थिति असतांही जसे हजार खटपटी करून विलायतेला चालते झाले; तसेंच आपल्यालाही विलायतेला जातां आले पाहिजे, अशी तिकडच्या मनाची तळमळ होती. त्या तळमळींत बाबांनीं अनुकूल अशी गोड फळें आणिलीं. बाबांचें केवढें हें थोरपण ! कर्तेपण त्यांनीं अशाच आचरणांनीं सार्थ केलें असें कोण म्हणणार नाहीं ?

भय्याच्या आणि तिकडच्या विलायतेला जाण्याच्या गोष्टी चालल्या असतांना पांडोबा मुकाट्यानें ऐकत होते. त्यांना त्याबद्दल काय वाटत होतें, त्यांतलें काय कळत होतें कोण जाणें ! विठाबाईला तर कशाचेंच कांहीं कळत नव्हतें; व त्याकडे तिचें फारसें लक्षही नव्हतें. ती मधूनच कांहीं तरी आईला हलकेंच विचारीत होती. व आई तिला कांहीं कांहीं गोष्टी सांगत

होती. परसू अगदीं स्वस्थ होता. मला वाटतें त्याला बसल्या बसल्या झोंपही लागली असेल. खेडवळ तो! बोलून चालून शेतकरी. त्याला त्या वेळच्या गप्पागप्पांत काय कळणार? तो आपला शेतमळ्याचा—बैलांचा विचार करावयाचा !

बाबा आतां पांडोबाकडे वळले आणि म्हणाले, " पांडोबा, तुझं कसं आहे बाबा---? "

" ब्येस हाय कीं सारं ! " त्यानें पट्दिशीं उत्तर दिलें.

" तें ठीक ! पण " बाबा आणखी म्हणाले, " तुझं चाललं आहे कसं? तुझा परसू काय म्हणतो ? काय करतो ? त्याचं तूं आतां लगीन केव्हां करून देणार ? करणार ना लग्न ? "

" हां तर ! " पांडोबानें उत्तर दिलें; " म्होरल्यासालीं पोराचीं हाडं भाजावींत म्हणतो पर—"

" मग पर काय रे ? " बाबांनीं विचारलें.

" पर पोराच्या डोक्सींत झोटिंग शिरला है ना ?"

" म्हजजे काय ?" बाबांनीं त्याकडे पाहत म्हटलें. त्या वेळीं आम्हीं सारींच जण पांडोबाकडे हा सांगतोय तरी काय, म्हणून कुतुहलानें पाहूं लागलों. आपला विषय निघाला, आपलें नांव निघालें हें ऐकून परसूही गुंगींतून जागा होऊन जांभया देत आणि हातानें चिटक्या वाजवीत, डोळे तणाणून सर्वांकडे पाहूं लागला.

पांडोबानीं बाबांच्या प्रश्नाला उत्तर दिलें, " त्येला आतां घर नगूसं झालया. त्यो म्हंगतो मी म्हमई करायला जानार! त्येच्या शीणची चार पोरं हायती तकडं; ती ह्याला लावत्यात याड अन् ह्यो जातुया हुरळून ! "

" काय ? परसू मुंबईला जातो म्हणतो ? आणि तो कशाला ? " आईनं मध्येंच विचारलं. " परसू शिकला आहे काय ? " कमला वहिनीनें ऐटीनं विचारलं. तिनं व्हिलेज प्रॉब्लेम वरचं करंट लिटरेचर नुकतंच वाचलं होतं व अडाणी व्हिलेजर्सबद्दल तिला मोठा पुस्तकी कळवळा वाटत होता असें तिनें त्या वेळीं आमल्या मध्येंच बोलण्यानें दाखविलें; " त्याला शेतकी करायची नसेल. नौकरी करावयाची असेल; मग त्याला तुम्हीं तरी असें अडवून कां ठेवतां ? परसू कांहीं शिकला आहे ना ? "

" तर–तर " पांडोबांनीं प्रामाणीकपणानें सरळ उत्तर दिलें; " शिकलाय म्हंजे ! चांगली मोट हाकतो, कुळवकाटी करतो. नांगरतों. शेत कामांत तो चकोट तयार झालाय ना ! मला त्येच्या गुणानं चांगला इसावा मिळतो. पर त्ये त्याला आतां नव्हसं झालंया; मंग कसं करावं ?" पांडोबांचें हें उत्तर ऐकून वहिनी गप्पच बसली. मनांतल्यामनांत खजील सुद्धां झाली.

बाबांनीं पांडोबांचें ऐकून घेतल्यावर परसूला विचारलें, "काय रे, परसू, कशाला जाणार मुंबईला तूं ?" परसू कांहींच बोलला नाहीं. बाबांच्या प्रश्नानें तो गांगरूनच गेला. " कशाला कपाळाला जातुया म्हमईला ?" त्याच्या ऐवजीं पांडोबाच बोलले. " सोन्यासारखी शेती सोडून बंगाळवाणी म्हमईची चाकरी त्याला होवी झालीया ! गेल्या सालापून त्येला हें येड लागलं. ततवर नव्हतं. अशी वैताग आनतो आम्हां दोघास्नी ! ह्यो म्हमईला जाऊन करनार काय ! हाडाचीं काडं करुनशान अन् बवल्याची बाजी शिकूनशान याचा. दुसरं काय ! मी तंदीच त्याला तुमच्याकड त्याचं कान-मोडायपायी आन् शिक्षन लावायपायी आननार व्हतों. पर तवा झालंच नाहीं. या कार्ट्याच्या परसंगानें आतां त्येला आनला. आपुन सांगाल तर त्यो ऐकल. माझंबी ऐकत न्हायी आन् कारभारनीचंबी ऐकत नाहीं !"

पांडोबा आपल्या मुला संबंधीं ही एक प्रकारची तक्रारच सांगत होते. पण ती कोणत्याही वाईट हेतूनें नसून परसूच्या कल्याणाकरितांच अगदीं कळवळून सांगत होते. बाबांच्या विषयीं त्यांना इतका मोठा विश्वासच वाटे कीं, जर बाबा सांगतील तर आपला परसू त्यांचें ऐकेल व खास ताळ्यावर येईल ! एवढीच पांडोबांची कल्पना ! म्हणून ते आणखी म्हणाले; " हातच सोडून पोरगा पळत्याच्या मागं लागतुया. मी त्याला सांगतुया कीं अर बाबा, नग, नव्ह तें आपलं काम ! हायबी जाईल, हुईबी जाईल आन् धुपाटणं अखेरीला हातीं येईल. पर त्यो ऐकतुया कुठं आमचं ? ही हेंच सांगायला गेली त्याला एकादिस, तर त्यो रागावला काय, जाजावला काय ! श्या काय दिल्या, गोंधूळ काय घातला, आन् अखेरशेवटाला तूं कोन मला सांगनार म्हून काठी घेऊन तिच्या अंगावर धावला न काय ! इचारा व्हीव तर समक्ष त्येला हातल्या हातं ?"

पांडोबा असें सांगत होते पण तिकडे परसूच्या अंगाचा नुसता तिळ-पापड उडाला होता. पण त्याला बोलायची सोय नव्हती. त्याला कल्पनाच येईना कीं बाबांच्या जवळ पांडोबा आपली गाऱ्हाणीं कां सांगताहेत ? तें सर्व ऐकून घेतल्यावर बाबा इतकेंच म्हणाले, "पांडोबा, बरोबर आहे तुझं म्हणणं ! पण तें कळण्याचं परसूचं वय नाहीं. तरुण रक्त आहे. सळ-सळत असतं. इकडेतिकडे जाऊन धामधूम करावी, मजा मारावी, असं त्याला या वयांत वाटावयाचंच ! ही पाहा, आमचीच मंडळी विलायतेला जायचं म्हटल्यापासून कशी फुरारली आहेत. प्रत्येकाला असंच वाटत असतं. ही मंडळी विलायतेला जाण्यांत जी उत्सुकता दाखवितात तीच परसूची मुंबईला जाण्याची. दुसरें काय ?"

"वा: ! असें कसें होईल ?" पांडोबा बाबांना खोडून काढण्याकरितां घाईनं म्हणाले, "ही मंडळी विलायतेला जाणार ती काय हौसा-मौजा करायला ? ती शिकायला--मोठी व्हायला जाणार ! तसं पोराचं कुठं आहे ! तो आपली शरीरसंपत्ति गमवायला, नादान व्हायला जातुया ! माझ्या परसूनें शेतवाडी टाकली तर ती करनार कोन ? शेतीच व्हईल कसं ? हें कुठं त्येच्या ध्येनांत येतय ?"

"म्हणून काय त्यानें मुंबई कधीं पाहूं सुद्धां नये वाटतं ?" आईनें हलकेंच विचारलें.

"पर तसं कोनचा त्योक म्हनतुया ? यंदाच्या दिवाळीला म्हमई बघाया चल. मी नेतों तुला, म्हून मी त्याला कवाचा म्हनतूयाच नव्ह का ? पर त्ये त्याला नकु ! त्येला धंदा करायला जावं वाटतय ना ? तुम्हीं कायबी म्हना मला. वक्तावर पोटच्या पोरावर पीती न्हाई म्हना. त्याबदली मला वंगाळ न्हाइ वाटायचं; पर परान गेला तरी आपुन पोराला धंदा करायला परमुलखाला धाडणार न्हाई !"

पांडोबानें हें अतिशय गंभीरपणानें सांगितलें व थोडा वेळ स्वस्थ बसले. आम्ही सारी जणें एक चित्तानें त्यांचें म्हणणें ऐकत होतोंच. परसू खाली मान घालून हातांतील काडीनें जमीन टोकरीत होता. दुसरें काय करणार बिचारा !

" मग परसूनें करावं कसं तुझं म्हणणं पांडोबा ? " बाबांनीं कांहीं कारणानें पृच्छा केली.

" त्येनं शेतीच केली पाह्यजे ! आतां माझे हातपाय थकले. मला इसावा होवा. आपली शेतवाडी कांहीं थोडीथोडकी नाहीं. त्यो आतां जानता झालाय. नेणता न्हाई. त्येचं त्येला समजलं पाह्यजे ! मला कांहीं चारदोन पोटीं पोर न्हाईत. तर ह्यानें कसबी वागलं तरी चालेल. म्हणून तर तुमच्या पावतर त्येला घेऊन आलों आहें ना ? ह्येनं आतां मला सुख द्याला पाहिजेल का नग, तुमीच सांगा ! "

" तुझं म्हणणं रास्त आहे ! "

" म्यां ठरवून टाकलय. ह्यो म्हमईला पळाला तर आपुन शेतवाडी सोडून कुंठ बी मुलखांत जानार ! न्हाई तर हिथं येऊन बसन ! आपलं हातपाय कांहीं चालत न्हाईत ! "

पांडोबांच्या या विचारसरणीनं मला कसेंसेंच झालें. माझ्या किंवा भय्याच्या मनांत आम्हीं बाबांना मोठं होऊन सौख्य दिलं पाहिजे असं कधी तरी येतं कां ? अगदीं याच वेळीं भय्यानें माझ्याकडे आणि मी त्याच्याकडे पाहिलें. दोघांच्या डोक्यांत पांडोबांच्या वरील विचारसरणीचा प्रकाश पडल्याचें मात्र आम्हांला आम्हीं न बोलतांच कळलें.

थोड्या वेळानें पांडोबाच आणखी म्हणाले, " परसू नीट वागला तर आमच्या परपंचाची धडगत आहे. नाहीं तर सत्यानास दिसतुया मला. म्हून म्हनतों; तुमचीच शेतीभाती हाय. तुम्हीच त्येचा गळयांत ती टाका म्हंजे माझ्या गळयांतलं पेंड पडलं " बराच वेळ पांडोबा बोलत होते. ते आतां थांबले. त्यांनें बहुतेक सांगून झालें होतेंच ! आम्हीं सर्वच त्यावर व आपल्या परी विचार करीत होतों. बाबांनीं पांडोबांना धीर दिला. परसूलाही बरें वाटेल असे ते बोलले. ते म्हणाले; " पांडोबा, पाहूं पुढं काय होईल तें ! परसू इतक्यांत कांहीं चाकरी धरायला मुबईला निघाला नाहीं ना ? मग आतांच त्याचा विचार कशाला ? आणि परसू, तुला ज्या वेळीं कुठेंतरी जावं असं वाटेल, त्या वेळीं तूं बेशक इकडे येत जा. तुला चाकरीच पाहिजे असेल तर मी तुला चाकरी मिळवून देईन. मग तर झालं ? पण लक्षांत ठेव कीं,

पांडोबांच्या सांगण्याचा जरा विचार पण करीत जा. तूंच त्याला सुख दिलंस तर होणार आहे. नाहीं तर काय ? ”

असेंच आणखी बरेंच बाबा बोलत होते. आतां वेळ पुष्कळ झाला होता. आई बसून कंटाळल्यासारखी झाली. म्हणून तिला मी आंत नेलें. नंतर एकेकजण तिथून उठण्याच्या नादाला लागलाच !

त्या रात्रीं अशा किती तरी सांसारिक सुखदुःखाच्या परस्पर विनिमयाच्या गोष्टी झाल्या. ती सुखस्मृति अजून माझ्या मनांत जशीच्या तशी आहे. त्या रात्रीं आमच्या स्वतःच्या सुखसंवेदनापेक्षां पांडोबांच्याच प्रपंचासंबंधींची मला स्वप्नें पडत होतीं. दुसरें दिवशीं भय्या देखील मला सांगूं लागला कीं, मलाही तुझ्यासारखींच पांडोबांच्या प्रपंच्यासंबंधानें स्वप्नें पडत होतीं. पांडोबा ज्या दृष्टीनें परसूकडे पाहात होते; तीच आम्हांकडे आशेनें पाहाण्याची दृष्टि बाबांची असली तर त्यांत अयोग्य असें काय होतें ? पण बाबांची ती आशा सफळ करण्याचें आमच्या नशिबीं होतं का ? पण हें त्या वेळीं आम्हांलाच काय, पण कोणालाही कुठं कसं कळणार !

---

## प्रकरण १० वें



## मावशीविषयीं

जगांत तुम्ही कसेंही वागा; जग आपल्या लहरीप्रमाणें तुम्हांला नाचवीत असतें. त्याला लहर लागली तर तें तुम्हांला डोक्यावर घेऊन नाचवील; तुमचा हवा तितका उदोउदो करील. आणि तीच त्याची लहर फिरली कीं, तुम्हांला पायाखालीं तुडवून टाकील. तुमची जितकी छीथूः होईल तितकी थोडीच असें त्याला वाटेल. असें असल्यामुळें तुकारामानें त्याला उद्देशूनच “ जग हें दुतोंडी सावज सांपडे सहज तिकडे धरी ” असे मोठे मार्मिक उद्गार काढले आहेत. जगाचा हा न्याय सर्वांना

सारखाच आहे; त्यांत भेदभाव मुळींच नाहीं. कोणी श्रीमंत असो, कीं गरीबनाचारी असो, अबला असो कीं पुरुष असो, जगाला त्याची पर्वा नाहीं. तें आपलें कर्तव्यकर्म मोठ्या दक्षतेनें बजावीत असतें. आणि त्यांतल्यात्यांत तसेंच पाहूं गेल्यास जगाची करडी नजर जरा जास्त प्रमाणांत गरीबदुबळ्याकडेच असते. श्रीमंतापुढें, सत्ताधाऱ्यापुढें, जबरदस्तापुढें जगाचें फारसें चालत नसल्यामुळें जग आपली हौस, -अनाथांना हरघडी अडवून, दुबळ्यांना क्षणोक्षणीं दडपून, निराश्रितांना पावलोंपावलीं निंदून- पुरवीत असतें; आणि असें करण्यांत त्याला मोठी प्रौढी व धन्यता वाटत असावी असें वाटतें. कारण, जगाची अशी कुटिल नीति नसती तर, तें आज अनेक वर्षे आमच्या घरीं, असेल त्यांत सुखासमाधानानें वागत आलेल्या आमच्या मावशीबाईसंबधानें नासकी कुजकी कुजबूज इकडे तिकडे इतर जनांच्या तोंडून का करायला लावते? त्यांच्या संबंधानें निरनिराळया कंड्या कां पिकविते?

गरीब बिचाऱ्या आमच्या मावशीबाई! आमच्या लग्नाच्या वेळेला त्या चाळीशीच्या घरांत आलेल्या पोक्त्यापुरवत्या झालेल्या, मी लहानपणीं त्यांच्या अंगाखांद्यावर खेळलेलें. भय्याचं त्यांनीं चांगलं कोडकौतुक केलेलं! त्यांनीं आम्हांला जन्मच तेवढा दिला नाहीं इतकंच काय तें! बाकी आमचं संगोपन करणारी तीच आई खरी! आमच्या आईनं दूरची कां होईना, पण बहीण म्हणून आणि तिच्यावर आकाशींची कुऱ्हाड कोसळून ती अनाथ झाली म्हणून तिला मायेनं आपल्याकडे आणिली. त्या वेळीं ती फार तर अठरावीस वर्षांची असेल. आईनं तिला ममतेनं वागविली. कुठलं ही दुःख तिला दिलं नाहीं. तिचा पाणउतारा होईल, तिच्या मनाला यातना होतील असं केव्हां आई तिला बोलली नाहीं कीं दुसऱ्या कुणाला तिला बोलूं दिलं नाहीं. आईनं आपली श्रीमंती तिला तशी कधीं जाणवूं दिली नाहीं. आपल्याला एक, तिला दुसरें, असा भेदभाव तिच्यांत कधीं केला नाहीं. ती दूरची बहीण खरी. पण आपल्या पोटच्या मुलीवर जसं प्रेम असावं तसंच आई मावशीवर प्रेम करी. आमच्या इकडच्या विधवा स्त्रियांना जगांत कोणी त्राता नाहीं; ती सर्वांचीच मत्ता असते. माहेरीं किंवा सासरीं भाऊभावजयींच्या किंवा दीरजावेच्या तोंडाकडे पहात, त्यांचे, त्यांच्या मुलाबाळांचे

काबाडकष्ट उपशीत आणि त्यांच्या मेहेरबानीनें मिळालेलें कसलें तरी शिळें पाकें गोळाभर अन्न पोटांत घालून दिवस कंठावयाचे; त्यांना स्वातंत्र्य नाहीं, मोकळेपणानें वागण्याचा अधिकार नाहीं; त्यांना स्वत:चें सुखदु:ख मुळींच नाहीं. त्या वास्तविक जगायलाच नालायख असतात. त्यांचा पति इहलोक सोडून गेल्यावर विधवा स्त्रियांचें या जगांत काय काम? त्यांच्याशीं कोणी नीट बोलायचं सुद्धां नाहीं. त्यांनीं विद्रूप व्हायचं. मंगलकार्यप्रसंगीं आपलं अशुभ तोंड कुणाला दाखवायचं नाहीं; एकीकडे कुठें तरी अंधेरांत स्वत:ला त्या विधवेनं लपवून घेतलं पाहिजे; अशा प्रकारचे प्रकार पूर्वी फार असत. अझूनही अनेक ठिकाणीं असतील; नाहीं कुणी म्हणावें ! जी गत इतर विधवांची तशीच मावशीबाईची व्हावयाची. पण आईनें तिला अशाच वेळीं आपल्याकडे आणिली आणि आपली मायापांखर तिच्यावर घातली. बाबांनीं आईला असें अशुभ चिन्ह घरीं कां आणलेंस, असें कधीं विचारलें नाहीं. किंवा आणलीस तें बरें केलेंस, आपल्या घरीं आतां स्वयंपाकाला दुसरी बाई ठेवण्याचं कारण नाहीं, आहे तिला रजा देऊं आणि तें काम तुझ्या बहिणीकडे सोपव म्हणजे झालं; असंही बाबांनीं आईला कधीं सुचविलें नाहीं. उलट बाबाच आईला मधून मधून केव्हां तरी म्हणत, "मावशीला घरांतलीं कसलीं तरी कामंधामं सांगत जाऊं नकोस ! तिला आपल्याघरचं पोतेरें करूं नकोस ! तिला आपण शाळेंत जावयाला लावूं या, बिचारी चार अक्षरं शिकलीसवरली तर तिचा तिलाच पुढें उपयोग होईल. ती आपल्या पायावर स्वतंत्ररीतीनें उभी राहील. आपलें पोट भरील कारण बायकांच्या शिक्षणाची, त्यांना पोटापुरतें मिळण्याची व मिळविण्याची सोय सध्यां आपल्याकडे चालू झाली आहे. कर्व्यांसारख्या महात्म्यानें अनेक हालअपेष्टा सोसून, अविश्रांत श्रम करून, विधवांना जरा तरी सुखस्थिति लाभावी म्हणून त्यांच्या शिक्षणाची सोय करून ठेविली आहे आणि समाजही अशा शिकल्यासवरलेल्या स्त्रियांच्या पोटापाण्याची व्यवस्था करून त्यांना काम देऊन आपलें कर्तव्य बजावण्यांत तत्परता दाखवूं लागला आहे. हिंदु-विधवांची कायदेशीर दुर्दशा करण्याचा हक्क आपल्याला काय आहे ?"

याप्रमाणें बाबा मावशीबाईविषयीं कळकळ व्यक्त करीत. आईला बरें वाटे, व तिला मावशीबाईना चांगलें वागविण्यांत जास्तच हुरूप येई.

आईच्या व बाबांच्या उत्तेजनानें मावशी सेवासदनांत वगैरे शिकायला जाऊं लागलीही होती. तिच्या शिक्षणाला दिशाही चांगली होती; तसें शेवटपर्यंत तिला शिक्षण घ्यायला मिळतें, तर आजपर्यंत त्या शिक्षणाचा फायदा घेऊन कुठें तरी स्वतःच्या कर्तबगारीवर पोटापुरतें ती मिळवतीही ! पण तिच्या बाबतींत तसा फारसा योग नव्हता. मावशीबाई शाळेंत जायला लागून कांहीं थोडे दिवस झाले नी आई अजारी पडली. केवळ आईच्या आजाराचें निमित्त जरी झालें, तरी मावशींचें शिक्षणाकडे तसें फारसें चित्तच लागेना. ती आपण होऊनच आईच्या आजाराकडे आणि घरकामाकडेच जास्त लक्ष घालूं लागली; त्यांतच तिचें मन रमूं लागलें; आम्हांला जन्म देणारी आई एक व संगोपन करणारी आई दुसरी–मावशीबाई; असेंच झालें. आमचा त्रास मावशीबाईला किती परीनें नेहमीं व्हायचा म्हणतां ! पण तो ती माउली अगदीं आनंदानें सोशीत असे. मावशीची मायाच तशी असते; म्हणूनच म्हण पडली आहे ना कीं "माय मरावी पण मावशी जगावी" ? आमची मावशीबाई अगदीं तश्शी होती. आमचा घरगाडा आईच्या आजारांत तिनें म्हणून सुयंत्रित चालविला होता ! तितक्यांतून विणण्याचा, शिवण्याटिपण्याचा, निरनिराळ्या कलाकुसरीचीं कामें करण्याचा ती हौसेनें उद्योग करी. शेजारपाजारच्या मुली, झबलीं, गलुतीं, ब्लॉउझेस् शिवायला, शिकायला आपल्या मावशीबाईकडे यायच्या. आळींतल्या बायकांनीं आपले खण बेतायला, चोळ्या शिवायला, गोड बोलून मावशीबाईकडे आणून टाकायच्या बायकांचीं पोलकीं, मुलाचीं आंगडीटोपडीं, असें कांहीं ना कांहीं मावशीबाईच्या हातीं रिकामपणीं असायचेंच. ती रिकामी म्हणून कधीं कोणाला दिसायचीच नाहीं.

अशी मावशीबाई कांहींतरी शिवण्याटिपण्यांत गुंतलेली दिसायची; मी आईच्या उशापायथ्याशीं बसलेली असायची; जवळपास भय्या अभ्यासाच्या पुस्तकाखेरीज करमणुकीकरितां कसलेंतरी काव्य–कादंबरी–नाटक यासारखें पुस्तक हातांत घेऊन वाचीत, आपल्याशींच हातवारे करीत आणि हंसत असायचा. अशा वेळीं मावशीबाई भय्याला मुद्दाम हांक मारी आणि म्हणे, "भय्या, आपल्याशींच काय असे हातवारे करतोस आणि हंसतोस

रे ? असं त्या पुस्तकांत आहे तरी काय इतका त्यांत रंगून गेला आहेस तो ? मला तरी थोडं वाचून दाखीव ना ? ”

म्हणजे मग मावशीबाईची आज्ञा प्रमाण मानून भय्या आपल्या हातां-तलें पुस्तक मावशीबाईजवळ घेऊन यायचा आणि खरोखरच वाचून दाख-वायचा ! आपल्याला कां हसूं आलें ? आपण या पुस्तकांत कां रंगून गेलों होतों; वगैरे व्यवस्थित सांगत असे. मावशीबाईचें हातांतलें काम चाललेलें असा-वयाचेंच. लक्ष अर्धेमुर्धे या कामांत असायचें; फक्त भय्याच्या वाचनाला मधूनच केव्हांतरी “हूं ! हूं !” असें हुंकार देवून आपलें भय्याच्या वाचनाकडे लक्ष असून आपण तें ऐकतों आहोंत; असें भय्याला ती भासवी. असें वरचेवर चाले. त्यामुळें एकाद्या वेळीं भय्याची व मावशीबाईची गंमतही होत असे. “ पण लक्षांत कोण घेतो ?” ‘ **प्रेमसंन्यास** ’ ‘ **मतीविकार** ’ ‘**अभागी कमल** ’ ‘ **विधवा कुमारी** ’ यासारखीं विधवांच्या दुःस्थितीवरील पुस्तकें वाचून दाखविण्याची हुक्की भय्याला येई. त्यांतला कांहीं भाग भय्या आपण होऊन मावशीला वाचून दाखवावा असें मनांत येऊन तो तिच्याजवळ वाचून दाखवावयाला लागे. विधवांची करुणकहाणी विधवांनाच वाचून दाखविल्यानें त्या विधवांच्या दुःखसागराला भरती येईल कां ओहोटी लागेल हें अपक्व बुद्धीच्या भय्याला त्या वेळीं कुठून कळणार ? त्याला वाटे किती सुंदर पुस्तक विधवांच्या दुर्दैवाची बाजू प्रकाशांत आणण्या-करितां तयार झालें आहे. आपली मावशी विधवा आहे, तेव्हां तिला तें वाचून दाखविलेंच पाहिजे. अशा कल्पनेनें तो वाचूं लागे. वाचतां वाचतां त्याला गहिवर येऊन, पाण्यानें डोळे भरून येत. हुंदका आवरेनासा होई. व त्याच वेळीं त्याच्या ध्यानांत येई कीं, आपण हें काय वाचतों आहोंत, आणि कोणापुढें वाचतों आहोंत. आपल्याला जर वाचतांना ब्रह्मांड आठवलें, तर मावशीच्या मनाची अवस्था काय झाली असेल ? म्हणून त्या वेळीं त्यानें थांबावें, व पुस्तक किंचित् आड धरून मावशीकडे पाहावें; तों तिच्या तोंडावर त्याला काय दिसे ? तर मावशीबाईचें भय्याच्या वाचनाकडे, त्याच्या पाण्यानें डबडबलेल्या डोळ्याकडे किंवा रुद्ध झालेल्या कंठाकडे मुळींच अवधान नसून ती आपल्या हातांतील कामांत अगदीं पूर्ण गढून गेली आहे. “ चोळीचा उभार कापायला चुकलाय कीं काय, अन् त्या

बाईलाही चोळी लांडी होईल कीं काय; पुणें प्रांतांतल्या कुणब्यामाळणींच्या अंगांतून जशा पोत्यासारख्या कसल्या तरींच चोळया असतात, तशी ही होईल कीं काय ?" अशासारखा किंवा आपलीच हातटीप किती छान पडत चालली आहे, किंवा आतां आपल्या शिवण्यांत किती सफाई यायला लागली आहे; असल्या कोणत्या तरी आपल्याच विचारांत मावशीबाई भय्याला आढळून यायच्या ! त्यामुळें एकपरी भय्याला बरंही वाटायचें आणि बाईटही वाटायचें.

भय्या वाचतां वाचतां थांबला आहे असें मावशीच्या जेव्हां लक्षांत येई तेव्हां त्या मध्येंच मान वर करून त्याच्याकडे पाहाच्या नी म्हणायच्या, "अं ! हें रे काय ! थांबलास कां ! वाच ना ! माझं लक्ष आहे तुझ्या वाचनाकड !—"

भय्या त्यावर हंसत मात्र नसे. पण वाचीतही नसे. तो मग हिरमुष्ट होऊन उठूनच जात असे. मध्येंच केव्हां लहर लागली तर त्या मलाच कांहीं तरी वाचायला सांगत. मला सांगायच्या वेळीं म्हणत मात्र कीं, "भयासारखं नको करूंस ! तूं आपली वाचीत जा म्हणजे झालें. तो कुठलं कांहीं तरी आणतो. आणि वाचायला लागतो. माझं लक्ष एखाद्या वेळीं न समजल्या-मुळें नाहीं लागत. म्हणजे मग तो तें पाहून रागावतो, रुसतो आणि कुढतो. त्याला मी तरी काय करणार ? म्हणून त्याला वाचायला सांगायची मला जरा भीति वाटते. एकाद्या वेळीं माझ्यापुढें तो आपलं डोकं देखील आप-टून घेईल. मग काय करूं मी ! एवढ्याकरितां मी तुला सांगतें, कीं माझ्या-करितां तूंच आपली वाचीत जा कशी ?"

सर्व साधारणपणें वरीलसारखी आमच्या घरीं आल्यापासून अव्याहत मावशीची दिनचर्या बिनधोक चालली होती. तिच्याकडे पाहणारास ती अगदीं आत्मतृप्त दिसे. आमच्या घरीं ती खूप काबाडकष्ट उपशी. पण तिला कंटाळा, वैताग, असंतोष यांपैकीं कांहींच कधीं माहिती नव्हतें. शरीर आणि मन सतत राबवून तपश्चर्या वाढविण्यांत तिचा सारा काळ जात असल्यामुळें रिकाम्या डोक्यांत सैतान धिंगाणा घालायला यायला तिच्याकडून त्याला सवड केव्हां मिळणार ?

घर आहे तिथें कांहीं तरी पर असायचीच. त्याप्रमाणें अधूनमधून

मावशीबाईला कोणीकडून कांहीं तरी त्रास व्हायचाच. पण तिला आतां कोणाचेंही बोलणें पाठीवर टाकण्याची चांगली सवय झाली होती. आई केव्हां रागाचा शब्द बोलली तर बाबा मावशीची कड घेऊन आईला गप्प करीत. बाबा केव्हां रागाच्या भरांत एकादा वाकडा शब्द बोलून गेले तर आई तें सावरून घेई आणि मावशीबाईचें मन राखी. असें चालत असल्यामुळें मावशीबाईला तसें दुःख असें आमच्या घरीं कधींच माहिती नव्हतें. त्या केव्हां तरी आईजवळ नाहीं तर बसायला आलेल्या आळींतल्या आयाबायाजवळ म्हणायच्या देखील कीं, "माझ्या बहिणीचीं हीं मुलें हीं माझींच नाहींत का ? यांच्यासाठीं कष्ट करण्यांत मला मुळींच वाईट वाटत नाहीं. मला बरें वाटतें. हा भाडोत्री सेवाधर्म नव्हे. पैसे घेऊन 'परिचारिका' बनून कामें करायचीं नी वर सेवाव्रताचा टेंभा मिरवायचा, हें मला नसतें आवडलें. भाडोत्री कामं कुठं चांगलीं होत असतात का ? कामांत मन पाहिजे. प्रेम पाहिजे. आपुलकी पाहिजे. तशी मला इथं मिळाली आहे. मी अगदीं संतुष्ट आहें ! मला वाटतें, स्वतंत्रताउपभोगाच्या लालसेनें मी कुठें बाहेर पडलें असतें, तर माझे कोण हाल झाले असते. नव्हे, मला सच्चारित्र्यानें राहातांच आलं नसतं. मला कुणी तसं राहूंही दिलं नसतं; नी माझ्या हातून कोणाची सेवाचाकरी पण झाली नसती. नुसते ढोंगधतुरे बरीक माजले असते. मी आपली बहिणीच्या आश्रयाला आहें. माणसं कशीं देवासारखीं आहेत. मी इथं अगदीं निष्काळजी, बेफिकीर नी आनदांत असतें. मला इथं कशाचं कमी नाहीं. माझं कुणी कमी पडूं देत नाहीं. यापेक्षां मला तरी काय हवं होतें नी जगांत जाऊन मी आणखी मिळवणार तें काय होतें ? कदाचित् पैसाअडका मिळाला असता. स्वतंत्रपणाचं सुखही पण पाहिलं असतं. पण मायेचीं, अंतःकरणाचीं माणसं मात्र मला मिळालीं नसतीं. आपलेपणाच्या जिव्हाळ्याचं समाधान मला खचित लाभलं नसतं ! मी आपली भित्री आहें. सगळ्यांना भिऊन असतें. त्या कारणानें माझं कुणी वाईट करील असें मला कधीं वाटत नाहीं. कसली काळजी मला कधीं शिवत नाहीं. भय्या आणि ताई हीं मुलं माझ्या जवळपास असलीं म्हणजे मला दुसऱ्या कशाची नी कुणाची आठवणसुद्धां होत नाहीं."

हें असं मावशीबाईनीं म्हणतांना मीं कितीदां तरी ऐकलं होतं. मी

मावशीला आवडते. भय्या मावशींचा फार-फार आवडता आहे, ही कल्पना आम्हांला किती तरी सुखदाई होई. केव्हां केव्हां तर मला मावशीला विचारावसं देखील वाटे कीं, "मावशी, तुझें माझ्यावर जास्त प्रेम आहे का भय्यावर?"

मावशीबाईच्या गुणांमुळें व वागणुकीमुळें तिची वाखाणणी आमच्याच घरीं होत असे असें नाहीं, तर किती तरी बाहेरच्या बायकांच्या तोंडांतून मावशीबाईबद्दल चांगले उद्गार आम्हांला ऐकायला मिळाले होते.

दुपारीतिपारीं अशा कांहीं बायका कसलं तरी काम काढून मावशीबाईच्या सभोंवार येऊन बसल्या म्हणजे एकीकडे हातानें काम चालायचं नी दुसरीकडे तोंडानें बायकांची बडबड चालायची. मावशीबाईकडेच बायका आल्यामुळें मावशीबाईच सगळ्याजणींचा बोलायचा विषय व्हायची.

कुणी म्हणे, "मावशींचें नशिब तसं चांगलं म्हणून तिला बहिणीनं थारा दिला."

कुणी म्हणे, "हिची बहीण बिचारी माहुली आहे बरं! नाहीं तर हिची कशी धडगत झाली असती!"

तिसरी म्हणे, "ही वागते चांगली म्हणून बहीण नीट आहे. नाहीं तर काय झालं असतं?"

दुसरी दुजोरा देई, "नाहीं तर काय! हिच्याच वागण्याची धन्य आहे झालं! आज काल कोणहो, दुसऱ्याची 'इतकी' सेवाचाकरी करीत राहणार?"

मध्येंच एकजण म्हणे, "खरंच तें! अलिकडच्या पोरी, दुर्दैवानं परत आल्या, तर त्यांना नातेवाईकांकडे राहाणं कमीपणाचं वाटतं. जिवावर येतं. त्या अनोळखी ठिकाणीं एकाद्याची धुणीं धुतील, भांडीं घासतील; वाटेल तसलीं हलकीं कामं करतील. पण नातेवाईकांशीं अश्शा एकाद्या सम्राज्ञीसारख्या ताठ्यानं नी कुऱ्यानं वागतील. इकडची काडी तिकडे करायच्या नाहींत त्या. आणखी दुसरें तें कशाला पाहिजे?"

"तसं या मावशींचें नाहीं-आपली अष्टौप्रहर राबत असते."

"खरंच, मावशी, तुला कधीं कंटाळा ठाऊक आहे कां ग?"

"हिला रागबिग म्हणून कांहीं पदार्थ असतो हें तरी माहीत आहे कीं नाहीं देव जाणें!"

"सदा बिचारी हंसतमुख नी कामाला अगोदर!"

याप्रमाणें मावशींच्या गुणांची नेहमीं पोथी सुटत असे.

आम्हांला व मावशीबाईलामुद्धां वाटत असे कीं, मावशीबाईसारख्या सरळ, सालस, निरुपद्रवी, एकमार्गी बाईला आतां जगांत कोण त्रास देऊं शकणार ! वाईट कोण म्हणणार ? तिच्या प्रशांत--धीरगंभीर मन सागरामध्यें प्रक्षोभ कोण उत्पन्न करायला धजणार ? पण जगांत सतत एकच प्रकार कधीं टिकला आहे का ? मावशीबाईची पुष्कळ दिवस वाखाणणी चाले. तिचा आयुष्यक्रम अगदीं ठरावीक चाकोरींतून अगदीं निर्धोक चालला होता आणि आतां तो अखेरपर्यंत तसाच चालणार अशी बहुतेकांची दृढ समजूत ही होती.

आमचीं लग्नें होऊन जाईपर्यंत तशा समजुतीला कोणाकडून बाधही आला नाहीं. पण लग्न होऊन आमची कमळावहिनी घरांत जेव्हां आली आणि मीहि सासरीं जाण्याकरितां निघालें तेव्हां इतर सृष्टींत आणि बऱ्याच मंडळींच्या मनोवृत्तींत जसा फरक पडला; तसे मावशीबाईचेही दिवस बदलल्यासारखे झाले.

तशी मावशीबाई ठाकठीक नीटनेटकी वागे. त्याकारणानें कमळावहिनींनीं तिच्याशीं बाह्यदेखाव्यावरूनच—आपलें जमेल असें समजून आपलें सुतगुत जमविण्याचा प्रयत्न केला. चार दिवस नव्यानवलाचे म्हणून मावशीबाईनें सूनबाईचें कोडकौतुक केलें. पण एक दिवस जसा तिचा थोडासा वागण्यांत जास्त लघळपणा दिसला, तेव्हां मावशीबाईनें एकदोनच वेचक शब्दांनीं तिच्या पायरीची तिला चांगली जाणीव करून दिली. आपणही कोण व कशा आहोंत, याबद्दल समज दिली. त्याक्षणापासून नव्या सूनबाई आपल्या जिथल्या तिथें आवळल्या. इतकेंच नव्हे तर त्या मावशीबाईकडे जरा निराळ्याच नजरेनेंच पाहूं लागल्या म्हणा ना ! कमळावहिनीची दृष्टि मावशीकडे त्या दिवसापासून "ही कोण माझी आखाड सासू?" या अर्थानें पाहूं लागली व त्याच बरोबर मावशीबाईतलीं नसतीं वैगुण्यें, तिच्या पाठीमागें कांहीं काळीं बरीं आहेत काय ? याबद्दलचा ठाव घेऊं लागली. असलेले दामदुपटीनं विकायचं नी नसलेलं पिकवून बाजारांत मांडण्यासारखं करायचं ही जगाची रीतच आहे. या रीतीनेंच मावशीचा उणेपणा पाहायचा,

नसल्यास तिच्या आंगीं चिकटवून त्याचा डांगोरा पिटायचा, या उद्योगाला कमळावहिनी लागली असल्यास नवल नाहीं !

अशा माणसांनाही कुणी ना कुणी तरी सांथीदार मिळत असतातच ! कमळावहिनीलाही साथीदार मिळायला वेळ लागला नाहीं.

आपल्या बाबूरावची बोलघेवडी--लगापचक आई,--ती हलके हलके कमळावहिनीला सामील झाली. सहज एकाद्याचं जातां जातां वाईट करतां येत असेल तर कां करूं नये, या स्वभावाची ती अगोदर बाई ! त्यांत तिच्या मनासारखं आमच्या मावशीबाईंनीं कधींच वर्तन केल नाहीं. मग तिचा दांत मावशीबाईवर असला तर त्यांत आश्चर्य कसलें ? त्या बाईची किती दिवसांपासूनची इच्छा होती कीं मावशीबाईंनीं मध्यस्थी करून बाबूरावांच्या गळ्यांत मला बांधण्याची खटपट करावी. त्याकरितां तिनें मावशीबाईचें मन अनेक प्रकारांनीं वळविलें होतें. तिच्यावर प्रेम दाखविलं. बसायला गेल्यावर आग्रह करून जिन्नस करून खायला घातले. काय वाटेल तें केलं. पण त्याचा मावशीबाईंनीं कांहींच उपयोग केला नाहीं. तो राग त्या बाईच्या मनांत होताच. आणि तो उगवण्याकरितां ती बाई अनुकूल कालाची वाटच पहात होती ! मावशीबाईला त्याची कल्पना मात्र मुळींच नव्हती ! आपण कुणाच्या आध्यांत न मध्यांत–आपणांला कोण काय करणार ? हीच तिची समजूत असे. तिच्यांत आंत एक बाहेर एक हा प्रकार नव्हता व दुसऱ्यांत असेल हीही तिला कल्पना नव्हती. हें तिचें अज्ञान म्हणा कीं भोळेपणा समजा. पण अशी वस्तुस्थिति होती इतकें मात्र सत्य !

बाबूरावची आई आमच्या घरीं आली आणि आई व मावशीबाई एकत्र असल्या म्हणजे त्या बाईची भाषा निराळी असायची. एकटी आमची आई सांपडली म्हणजे त्या बाईची भाषा वेगळीच! एकटी मावशीबाई आढळली म्हणजे तिची रसवंती भलतेंच कांहीं तरी बोलायची आणि कमळावहिनी कधीं आपण होऊन त्या घरीं गेली किंवा तिला बोलावून नेली म्हणजे, तिला जें आमच्या घरासंबंधानें सांगायचें तें कांहीं तरी भलतेंच्या सलतेंच !

गोड बोलण्यांत बाबूरावची आई फारच पटाईत होती. तिनें हां हां म्हणतां सर्व आळीभर आपली सत्ता स्थापित केली होती. कोणी कोणी तर

चेष्टेनें या बाईला त्या आळीचा 'स्त्री--फौजदार' म्हणून संबोधित ! तिच्या घरीं बायकांची 'जा--ये' व्हायला लागल्यापासून मावशीबाईकडे येणाऱ्या साळकायामाळकायांची रहदारी कमी झाली होती. यांत मावशीबाईला कांहींच वाटण्यासारखें नव्हतें. पण बाबूरावाची आई मात्र तेवढ्यावरून चांगलीच फुशारून गेली होती. तिला वाटे आपल्याइतकी शहाणी बाई त्रिभुवनांत नाहीं. नवऱ्याला आपण वागविले. ह्याला उद्योगी आपण बनविला. मुलगा बाबुराव—इतका हुशार, धीट, शहाणा झाला आहे त्याला कारण केवळ आपण आहोंत. आणि हें ती ज्या त्या बाईजवळ मोठ्या प्रौढीनं, विस्तारानें पण गमतीनें सांगत असे.

ती आमच्या घरीं आली आणि त्यावेळीं आई व मावशी एकत्र असल्या म्हणजे ती म्हणायची, "बहिणीबहिणीचें प्रेम असावं तर हें असं असावं ! मला तुम्हां दोघीकडे पाहिलें म्हणजे गगनांत मावेना इतका आनंद होतो. मला एकादी बहिण असती तर किती चांगलं झालं असतं ! तुम्हीं दोघीं जन्मभर एकमेकींला सोडणार नाहीं ही मला खात्री आहे. खरं म्हटलं तर तसंच झालं पाहिजे नाहीं का ?"

हेंच एकट्या आईची व तिची केव्हां गांठ पडली म्हणजे बोलण्याचा ओघ मुद्दाम बदलून--वळवून ती म्हणायची, "तूं म्हणूनच बरं हें जिवंत पाप पदरीं बाळगलं आहेस ! आजकाल कोण ग बाई असं धाडस करणार ? पहा बाई, कधींकाळीं उपकाराची फेड अपकारानें तिनें न करो म्हणजे मिळवली. मला बाई भीति वाटते. तूं अशी सदाची अजारी. ती तरणी ताठी ! तेव्हां जरा काळजीच नाहीं कां ? पण मी हें तुला कशाला सांगायला हवं ! तुला तें कळत नाहीं का दिसत नाहीं ? त्यांतनं ती कितीतरी दिवसापासून तुझ्याच जवळ आहे. तेव्हां तिची खाली तुला असलीच पाहिजे ?" हीच बाई जेव्हां मावशीबाईशीं हितगुज करूं लागे, तेव्हां असे गरळ ओकी कीं बाई ! बाई ! बाई ! शर्थ झाली हं मावशी तुझ्या सोशिकपणापुढें ! इतका जाच सोसून बहिणीचीं वाटतील तितकीं घाणेरडीं उणीं उत्तरें सोसून कशी या घरांत दिवस काढीत असशील, तुझी तूंच जाणें ! इथं राहण्यांत नी नरकांत राहण्यांत काय फरक आहे ! बहिणीनं हिडीस करायचं, आपल्या उरावर नाचायला आली आहे म्हणायचं, माझ्या मरणाची ती वाट पाहाते

आहे असं तुझ्या संबंधानें आल्यागेल्या जवळ सांगत सुटायचं; याचा अर्थ काय ? अन् मी म्हणते लोकांना सांगून काय त्याचा उपयोग ? लोक का तुमच्या दोघींत पडणार आहेत ? असं घालूनपाडून बोलण्यापेक्षां, पाठीमागें तुझी कूट खाण्यापेक्षां तिला तुझ्या तोंडावर तुला सांगायला काय हरकत आहे म्हणतें मी ? जा म्हणावं घरांतून निघून. तूं काय इथून गेलीस तर उपाशी मरणार आहेस थोडीच ? मजूरीच्या चारपाश्या कुठंही टाकायच्या नी अग्नीला गोळा द्यायचा. मग नातेवाईकाच्याच तिथें जास्त काय आहे ? हीं असलीं नाजकीकुजकीं बोलणींच कां नाहीं ? शपथ सांगतें तुला मावशी, मी आलें त्या वेळीं तूं चांगली दिसलीस. आतां पण कशी झालीस पहा कीं ! नुसती चिपाड !"

यावरून बाबूरावची आई कुणालाही तोंड देखलं गोड बोलण्यांत कशी पटाईत होती, आणि त्याची पाठ वळताच त्याच बाईसंबंधानें गरळ ओकण्यांत किती तरबेज होती, हें कुणालाही दिसून येणार आहे. ही बाई आतां माझं लग्न झाल्यापासून आमच्या घराकडे वक्रदृष्टि करून होती. कांहीं ना कांहीं करून आमच्या शांततेच्या वातावरणांत बिघाड करायचा, हा तिचा हेतु होता. ती मावशीबाईला हातीं धरूं पाहात होती; तर कमळा वहिनींच्या कानातही कुजबुजण्याची संधी वायां दवडीत नव्हती ! मी तिच्या थाऱ्यालाच उभी राहात नसे; तर ती मला काय करणार ? माझी गांठ पडली तर ती जाती स्वभावाला अनुसरून अघळपघळ साखर पेरायला मुळींच कमी करीत नसे हो ! वहिनी तिच्या जाळ्यांत केव्हां व कशी अडकेल याचा नेम नव्हताच. पण तूर्त तरी तें शक्य नव्हतें. कारण अलीकडे मी आणि वहिनी—नव्यानवलाच्या मैत्रीमुळें म्हणा वाटेल तर—एकमेकांना विसंबत नव्हतों. वहिनी एकटी कधी नसायचीच; तर त्या बाईला तिच्या कानाचा चावा घ्यायला संधी सांपडावयाची केव्हां ?

भाबड्या दृष्टीनें जगाकडे पाहणाऱ्या मावशीबाईला ही बाई मात्र अतिशय सतावीत असे. तिच्याबद्दल मावशीबाईची वाईट अशी कल्पनाच नव्हती ! आंतबाहेर ती बाई सारखीच आहे, असें तिला वाटे. पण हें बिंग ज्यावेळीं मावशीबाईला कळलें, त्यावेळीं मावशीबाईच्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला ! पण हा प्रकाश पडायच्या वेळीं मावशीबाईच्या डोळ्यांतून

भरपूर पाणी गळलें. खूप डोकें दुखलें. फणफणून ताप भरला. आणि सणसणून ती आठदिवस आजारी मात्र पडली!

त्या बाईनें असे कुठें काय मावशीबाईसंबंधानें विषारी फूत्कार टाकलें कीं त्यामुळें आठ दिवसांत मावशीबाईच्या तापाला उतार पडूं नये? डोळ्यांतले पाणी खळूं नये? कीं पोटांत घोटभर पाणी किंवा घांसभर अन्नही जऊ नये?

हें त्यावेळीं कांहीं कळलें नाहीं. पण ज्या वेळीं कळलें तेव्हां त्या बाईचा खरा उद्देश मावशीबाईचा सत्यनाश करायचा नसून आमच्या घराण्याच्या अब्रूवर—बाबांच्या इभ्रतीवर रखरखलेले निखारे ठेवायचा त्या बाईचा उपद्याप होता, असें समजलें. आणि कारण काय तर मी! मी तिच्या शहाण्या बाबूरावाला लग्नाची माळ घातली नाहीं म्हणून!

बाबा आपल्या परि संसाराची धुरा मानेवर घेऊन, डोळे उघडे ठेऊन, कान तीक्ष्ण ठेवून दूर दृष्टी लावून, उदार मनानें, बळकट छातीनें जरी पुढें पुढें चालले होत, तरी त्यांचा पाडाव करण्याच्या दुष्ट इच्छेनें कित्येक कृमीकीटक अटोकाट प्रयत्न करीत असत, याची दाद तरी त्या वेळीं बाबांना होती का?



# प्रकरण ११ वें



## भय्याच्या पश्चात् !

भय्या विलायतेला जाण्याच्या धांदलींत असतां बऱ्याच गोष्टी घडल्या. वहिनीनें आपण बरोबर विलायतेला जाणार म्हणून बराच थैमान घातला. पण भय्यानें तिची बरीच समजूत घातली. 'तुम्ही पैसा खर्च करीत नसाल तर आपण माहेरच्या माणसांना पैसे खर्च करावयाला लावू. पण विलायतेला येऊं' असें देखील वहिनीनें म्हणायला कमी केलें नाहीं. त्यावेळीं बाबा तिला बरेच बोलले. "विलायतेला शिक्षण घ्यायला सर्वांनींच गेलें पाहिजे असें नाहीं कांहीं. जेवढ्या शिक्षणाचा इथं लाभ झाला आहे, तेवढ्या भांडवलावर मनांत आणल्यास इथल्याइथं मनासारख्या पुष्कळ चांगल्या गोष्टी करतां येतील. तेव्हां दोघांनीं विलायतेस जाण्याचें मुळींच कारण नाहीं." हें सामोपचाराचें भय्याचें सांगणें तिला पटो वा न पटो, पण तिनें तें ऐकलें व तूर्त तरी तिनें विलायतेला जाण्याचा बेत रहित केला ! तिला बाबांचें बोलणें मात्र मुळींच रुचलें नाहीं. ती मनांतल्या मनांत खूप जळफळली ! आपल्या विलायतेच्या चैनीच्या सफरीच्या आड हा थेरडा आला आणि भय्या आपल्या वडिलांना एकाद्या देवासारखा मान देत असल्यामुळें बापाच्या कलानें वागणाऱ्या भय्यानें आपल्याला कांहीं तरी गोष्टी सांगून बरोबर नेण्याची टाळाटाळी केली. असें कांहीं तरी वहिनीनें बाबूरावाच्या आईजवळ सांगितल्याचें आम्हांला समजलें.

भय्या एकटाच विलायतेला गेला. तिकडेही त्याच्याबरोबरच जायचं ठरलं होतं; पण तिथें ज्या कॉलेजांत प्रवेश व्हायला हवा होता; त्या कॉलेजांतल्या जागा इकडचा अर्ज जाईपर्यंत भरल्या असल्यामुळें; इकडचें जाणें पुढल्या वर्षा-पर्यंत तहकूब झालें होतें. तोंपर्यंत मुंबईसच एक वर्षभर नौकरी धरायची व रहायचं ठरलं. त्याप्रमाणें भय्या विलायतेला जायला बोटीवर चढल्यावर इकडे नौकरी मिळाली. आम्हीं स्वतंत्र बिऱ्हाड करून राहूं लागलों. मुंबईला

राह्यला जातांना मला जितकं बरं वाटलं तितकंच वाईटही वाटलं ! आजारी आईला सोडून मला जाववेना ! आईला देखील मला सोडवेना ! पण " कन्या धन अन्याचं ! " हें ठरलेलंच आहे. आईनं आपलं मन घट्ट करून मला मुंबईला जातांना मंगल आशीर्वाद देऊन जायला निरोप दिला. " मावशी घरीं आहे. ती माझी व्यवस्था चांगली ठेवते. तूं काळजी करूं नकोस ! मला वाटेल तेव्हां मी तुला बोलवीत जाईन. तुला यावसं वाटेल तेव्हां तूं येत जा. " असं आईनं मोठ्या धीरानें मला सांगितलं. मला त्या वेळीं आईची धन्यता वाटली ! एकीकडे ती स्वतः रडत होती व दुसरीकडे ती मला धीर देत होती. माझं समाधान करीत होती. माझे अश्रू पुशीत होती ! यालाच म्हणतात माउलीचा जीव !

भय्या विलायतेला गेला. मी सासरी गेलें. पण आईला दुःख सारखेंच ! आनंदही सारखाच ! तिची पिलं तिच्यापासून दूर झालीं; पांखरं दूर उडालीं. तीं दूर गेलीं; आपणांला त्यांचा सहवास दुरावला म्हणून दुःख तर आतां तीं मोठी होणार, स्वपराक्रमाला चढणार, त्यांच्या उपयुक्तेची जरूरी जगाला लागणार, याबद्दल आनंद, असा सुखदुःखांच्या संमिश्रतेचा अनुभव माता-पितरांइतका उत्कटतेनें जगांत दुसऱ्या कोणाला येणार !

भय्या ज्या वेळीं जायला निघाला, त्या वेळीं त्यानें आईच्या व बाबांच्या पायांवर डोकें ठेवलें आणि क्षणभर मुकाट्यानें त्यांच्या समोरच उभा राहिला. त्याच्यानें बोलवेना. आई काय बोलणार ? तिच्या मनाची अवस्था विलक्षणच झाली होती. " जपून जा. जिवाला जप ! खुशाली वरचेवर कळीव " असें कांहीं तरी बोलायचा तिचा विचार होता, पण तिच्या मुखांतून शब्द बाहेरच पडले नाहींत. बाबांच्या अंतरंगांत काय चाललें असेल कोण जाणें ! पण बाह्यतः ते हिमालयासारखे धीरगंभर दिसत होते; इतकेंच नव्हे तर त्यांच्या तोंडावर एका प्रकारचें तेज झळाळत होतें. 'आपण अत्यंत गरीबींत जन्मलों, आपल्याला लहानपणीं ॐभवती करून, वार लावून, दिवस काढावे लागले, आपल्याकरितां आपल्या आईला दुसऱ्याच्या घरीं स्वयंपाक करावा लागला, त्या आपणांला आपल्या मुलाला शिक्षणाकरितां स्वतःच्या सामर्थ्यावर विलायतेला धाडतां आलें, हा आपल्या आयुष्यांतील आपला गौरव आहे. ही आपल्यावर ईश्वरीकृपा आहे. त्या ईश्वरीकृपेस आपण पात्र आहोंत.

कर्तेपणाचं आयुष्य आज आपलं सार्थ होत आहे; या जाणीवेचा सात्त्विक अभिमान बाबांच्या मुखमंडळावर तळपत होता, असें म्हटलें तर त्यांत बावगें कांहींच होणार नाहीं.

त्या वेळीं बाबांनीं भय्याला उपदेशामृताच्या बाटल्याच्या बाटल्या कांहीं पाजल्या नाहींत. पण कांहीं थोडं जें सांगितलें, तें इतकं स्पष्ट, स्वच्छ, आणि अंतःकरणाच्या तळमळीपासून सांगितलें, कीं ते बाबांचे उद्गार म्हणजे बाबांच्या थोर अंतःकरणाच उत्कृष्ट प्रतिबिंब दाखविणारा तो आरसाच होता !

बाबा भय्याला म्हणाले, "भय्या, तूं आज विलायतेंत उच्च शिक्षण संपादन करण्याकरितां जात आहेस ! मीही मोठ्या हौसेनं आणि उमेदीनं तुला धाडीत आहे. माझ्या खर्चाचं आणि तुझ्या बुद्धिमत्तेचं चीज तूं करशील ही माझी खात्री आहे. आतां माझ्यावर तुझा जरी भरंवसा असला, तरी केवळ तुझ्या श्रमावर मीं अवलंबून आहे असं मात्र मुळींच नाहीं. तूं मिळविता हो. मोठा हो. तुला कीर्ति-संपत्ति-यश यांनीं माळ घालूं दे. तसें झालेलें मीं पाहिलें म्हणजे माझे डोळे निवतील. पण ध्यानांत ठेव. 'सब् से जीव प्यारा' आहे. तुझ्या प्रकृतीला मानवलं नाहीं, तर तिथं एक क्षणभर राहूं नकोस ! मिळेल ती पहिली बोट गांठ आणि घरचा रस्ता धर. जीवाच्या स्वास्थ्यासाठीं खर्च करायला कमी करूं नये. तुझ्या नशिबानें देव मला भरपूर देऊन चुकला आहे. खर्च करतांना संकोच मानण्याचं कारण नाहीं. जिवाला मारण्याची आवश्यकता नाहीं. तूं भलत्या मोहांत पडणार नाहींस, व्यसनासक्त होणार नाहींस ही माझी खात्री आहे. पण तरीही तुला एक सांगून ठेवतों, जेव्हां केव्हां मोहांत-व्यसनांत-संकटांत आपण सांपडणार असें वाटेल तेव्हां घरची आठवण करीत जा. तुझ्या आईची आठवण तुला झाली, ती अजारी आहे, तुझ्या वाटेकडे तिचे सदासर्वकाळ डोळे लागले आहेत, असें तुला आठवलें, म्हणजे तूं कसल्याही संकटाला जुमानणार नाहींस. कोणतींही व्यसनें तुला शिवणार नाहींत. तूं आपल्या आईच्या सुखाकरितां परत ये. देशाच्या सेवेकरितां तुझा जन्म आहे हें ध्यानांत घे; म्हणजे तूं इथून जसा निर्लेप जातो आहेस तसाच ईश्वर तुला निर्लेप परतही आणील. तूं आतां विवाहितही आहेस. तेव्हां त्या दृष्टीनें

तुझी जबाबदारी तुला समजावून सांगण्याची मला अधिक आवश्यकता वाटत नाहीं !”

भय्यानें बाबांचें बोलणें शांतपणानें ऐकून घेतलें. पुन्हां एकदां भक्तिभावानें मातापितरांना नमस्कार केला आणि मग तो गाडींत चढला.

मी मुंबईला जायला निघालें त्या वेळीं देखील बाबांनीं तिकडे उद्देशून म्हटलें, “ हें पहा, इतके दिवस ताई ही आमची होती. आमचा तिच्यावर हक्क होता. पण आतां ती तुमची असून तुमचा तिच्यावर हक्क आहे. तुम्हांला आज्ञा म्हणून कांहीं आम्हांला करतां येणार नाहीं. पण आपल्याला सांगतों, आपण स्वत: ताईला लवकर लवकर घेऊन येत चला किंवा तिला एकटीला पाठवून द्या. तिची आई नेहमींच तशी आजारी असते. दोघींचा दोघींना प्रथमपासूनच लळा असल्यामुळें दोघींना एकमेकींवांचून करमणार नाहीं. बरें वाटणार नाहीं. म्हणून तुम्हांला मुद्दाम हें सांगत आहें.”

अधिकाराचा पालट झाल्याबरोबर बोलण्या चालण्यांत देखील आपोआपच अंतर पडतें. तसेंच बाबांचें झालें. तिकडे अगोदर बाबा ‘ अरे-तुरे ’च करीत. सासरा-जांवई हीं नातीं जुळतांच बाबा तिकडे ‘ अहो-जाहो ’ असं संबोधायला लागले, नी तें त्यांना शोभायला देखील लागलें. तिकडच्या मनांत बाबा बोलूं लागले, ‘अहो-जाहो’ म्हणायला लागले म्हणजे काय येत असे देव जाणें ! अगदीं चमत्कारिक मात्र होत असे, एवढें मी पुष्कळ वेळां पाहिल्याचें मला आठवतें. आम्हीं बाबांना जितका मान देत असूं, जितका आदर बाळगीत असूं, तितकाच मान तिकडूनही दिला जात असे, तितकाच आदर बाळगला जात असे, इतकें मात्र खरें !

भय्याला बंदरावर पोंचवायाला आम्ही सारींच मंडळी गेलों होतों. आई, मावशी, बाई, वहिनी, मी, बाबा, असे घरांतील सर्व तर होतोंच. पण ऐत्यावेळीं परस्पर भय्याचे श्वशूर देखील धक्क्यावर दाखल झाले होते. तिकडे असायचं होतं. बाबूराव होता. तशीच आणखी किती भय्याची कॉलेजमधली मित्रमंडळी दाखल झालेली होती. आमचे पांडोबासुद्धां मुद्दाम आले होते. धक्क्यावरचा देखावा, त्यावेळच्या आमच्या सर्वांच्या विलक्षण मनोवृत्ति, आनंद, औत्सुक्य, भीति, हुरहुर, इत्यादींनीं किती तरी निरनिराळ्या विकारांनीं सर्वांच्या मनोवृत्तींत नुसता धुमाकूळ माजवून सोडला होता.

सगळ्या जगांतल्या निरनिराळ्या जातींचीं कितीं तरी माणसें तिथें जमलेलीं होतीं. आमच्यासारखींच आपल्या कोणा आप्तेष्टाला, सुहृदाला निरोप द्यायला मुंग्याच्या प्रमाणें गर्दी झालेली होती. डोळ्यांत असू नी तोंडावर हंसू हा मानवी स्वभावाचा विरोधाभासाचा खेळ त्या ठिकाणीं बहुतेकांच्या मुखश्रीवर विलसत असल्याचें पाहाणाराला आढळलें असतें!

भय्याचा उत्साह चांगलाच होता. त्याचें बाह्योपचार नेहमींप्रमाणेंच धीर गंभीर आणि किंचित् हंसतमुख वृत्तीनें चालले होते. त्याचें तशाही स्थितींत सर्वांशींच मित भाषण चाललें होतें. पण त्याच्या अंतःकरणांत केवढा खळबळाट माजून राहिला होता कोण जाणें! आम्हीं सारीं त्याचींच निकटचीं माणसें. त्यानें जास्ती कोणाशीं बोलायचें नी कमी कुणाला करायचें? आईला, मला, वहिनीला, कां मावशीला? बाबांशीं तो कधींच फारसा बोलत नसे, इतकेंच काय समोर उभा देखील रहात नसे; तर त्यांच्याविषयीं आतां बोलावयाचें कारणच नव्हतें. तरी तशाही स्थितींत भय्या सर्वांशीं व्यवस्थित रीतीनें मनाचा मोकळेपणा समतोलपणा ठेऊन बोलत होता, वागत होता! तो पांडोबांशीं किंवा बाबुरावांशींसुद्धां आस्थेनें विचारपूस करायला विसरला नाहीं कीं त्यांचा निरोप घ्यायला चुकला नाहीं.

बोट सुटायची वेळ झाली. एकच गडबड चहुंकडे उडाली. बोटीच्या कठड्याला टेकून प्रवाशी मंडळी निरोप द्यायला आलेल्या आप्तसुहृदांना हातांतील रूमाल हवेंत उडवून "या, या," अशा खुणा करूं लागली. तर उलट धक्क्यावरील लोकांकडून तशाच प्रवाशांना प्रति जबाब मिळूं लागला.

आम्हीं सर्व जरा वेळांनीं बिऱ्हाडाकडे परतलों. आईला जपून आणावयाचें होतें त्या धांदलींत; दिवसभर तेच तेच विचार येत होते; व तींच तींच बोलणीं पुन्हां पुन्हां होत होतीं. दुसरे दिवशीं आम्हीं पुण्याला आलों. एकटे तिकडेच मुंबईला रहायचं झालं. मीपण राहणारच होतें. पण आईला व्यवस्थित नेतां यायला एकटी मावशीबाई काय करणार? आणि वहिनी तर अजून सगळ्यांशींच परकीपणानें वागत होती, तर आईला तिचा तसा कसा उपयोग व्हावा, म्हणून मला पुण्याला येणें भाग पडलें. नंतर लगेच चारच दिवसांनीं मी मुंबईला परत गेलें. आई मला म्हणाली, " आठ पंधरा दिवस मावशीला बरोबर घेऊन जा. म्हणजे तितकं तुला बरं वाटेल.

सूनबाई आहेच घरीं आतां, माझं मी कसं तरी निभवीन." पण मी तें ऐकलं नाहीं. आईची गैरसोय करून, तिचे हाल करून, मला मावशीबाईला माझ्या सुखसोयीकरितां मुंबईला न्यावें असें वाटलें नाहीं. मी एकटीच गेलें. नंतर लवकरच आमचा दैनंदिन कार्यक्रम व्यवस्थितपणें सुरू झाला. विलायतेच्या प्रत्येक डाकेला बहुत करून सविस्तर हकीकतीचीं भय्याचीं पत्रें येऊं लागलीं. एक बाबांना, एक वहिनीला आणि एक मला अशीं तीन स्वतंत्र पत्रें त्याचीं यावयाचींच. आमचींही दर शुक्रवारच्या डाकेला पत्रें पोस्टांत पडायचींच. 'भय्याचं पत्र यायचं आहे. भय्याला पत्र धाडायचं आहे. अमूक जिन्नस त्यानें मागितला आहे; तो तयार करून पुढच्या शुक्रवारच्या डाकेला धाडायला तयार झालाच पाहिजे !' हा विचार त्या वेळीं सगळयांत प्रमूख असायचा. आणखी कोणी ओळखीचें विलायतेला निघालें आहे काय, कोणी इतक्यांत तिकडून येणार आहे काय ? अशा चौकशीचा त्यांतच आम्हांला नाद लागलेला असे. आमचा भय्या विलायतेला शिकायला गेला आहे; आतां लवकरच तिकडूनही जायचं व्हायचं आहे." असें नवीन कुणी ओळखीच्या बायका झाल्या म्हणजे त्यांना सांगण्यांत मला केवढं भूषण वाटायचं ! असो.

मी मुंबईला जाऊन राहिल्यावर महिन्यांतून एकदां तरी पुण्याला आईला भेटायला जातच असे. एकाददुसरा दिवस राही आणि परत येई. आईला तितकंच बरं वाटे. मलाही हायसं वाटे. दर आठवड्याला मी आईला लांबलचक पत्रें टाकीत असे. पण तिचीं पत्रें मात्र "पत्र पोंचलं. माझी प्रकृति बरी आहे. भय्याचं पत्र आलं होतं. सूनबाई अलिकडे बऱ्याच असंतुष्ट असतात. तिला इथं राहणं एकंदरींत आवडत नाहीं असें दिसतं. आपल्याशींच कुढत असते. आमची कुणाची पर्वा तिला वाटतच नाहीं. भय्याच्या प्रत्येक पत्रांत तिच्या संबंधानं विचारलेलं असतें. पण मी त्याला काय लिहिणार ? तिला माझ्या जवळ येऊन बसण्यांत सुद्धां कमीपणा वाटतो; तर ती माझी सेवा चाकरी काय करणार ? आणि मी अपेक्षा तरी काय करणार ? पण मी या पैकीं भय्याला कांहीं एक कळवित नाहीं हो ! त्याच्या जिवाला कशाला मी आणखी कांहीं तरी लिहून बेचैन करूं ? तूंही पण आपल्या वहिनीबद्दल तक्रार केल्यासारखं लिहित जाऊं

नकोस बरं का ? सध्यां तिच्या मैत्रिणी–ती–स्त्रियांच्या सभा आणि स्त्री-शिक्षणाच्या संस्था, यांतच तिचा सारा वेळ जातो. घरीं सुद्धां फारशी असत नाहीं म्हटलं तरी चालेल. आणखी तिच्याबद्दल किती तरी लिहिण्यासारखं ती वागूं लागलीं आहे, पण मी तें लिहीत नाहीं. तूं पुढच्या खेपेला येशील त्यावेळीं तुला समक्षच दिसेल. मला तर असं वाटूं लागलं आहे कीं सूनबाईचं वागणं दिवसेंदिवस बेताल होत जाणार ! तिला बोलायचं कोणी नी कसं, याचीच आम्हांला पंचाईत पडत चालली आहे. स्वतः तिला कधींच कांहीं बोलायचं होत नाहीं. ती माझ्या वाऱ्यालाही उभी राहात नाहीं. मावशी वेळीं प्रसंगीं बोलण्याचें अवसान आणते, पण तिच्या शब्दाला सुनबाई काडीची किंमत देत नाहीं. तिला मुळींच जुमानीत नाहीं. असे सध्यां झालं आहे ! सध्यां आमचा काळ फिरायचे दिवस आले आहेत कीं काय न कळे. सातासमुद्रांपलिकडे सोन्यासारखं पोर शिक्षणाकरितां देश डोक्यावर घेऊन दिवस काढीत आहे, तर इकडे सूनबाई दर दिवशीं बेफाट वागूं लागली आहे. हें मला पाहावत नाहीं नी बरंही वाटत नाहीं. भय्या विलायतेहून परत येईपर्यंत तिला इथं राह्यचं नसेल तर तिनें नये राहूं. माहेरीं गेली तरी चालेल. आमची कांहीं हरकत नाहीं. घरांतल्या माणसाशीं बेमुर्वतखोरपणानें वागून आपणही असंतुष्ट राह्यचं नी दुसऱ्या सगळयांनाहीं केरासारखं समजायचं, यांत काय अर्थ आहे ? सूनबाईला माहेरीं धाडून द्या म्हणून मी स्वतःला सांगणार आहें. एकदां वाटलं होतं कीं तूं इकडे आलीस म्हणजे तुझ्याकडूनच सूनबाईला सुचवावं कीं, भय्या विलायतेहून परत येईपर्यंत तुला इथं करमत नसलं तर तूं माहेरीं जा. पण कुणास माहित ती तुझं तरी एकेल कीं नाहीं तें ! ”

अशा सारखीं आईचीं पत्रें यायचीं. हीं पत्रं पाहिलीं म्हणजे मला अगदीं बेचैन व्हायचं ! ‘ काय करावं आमच्या वहिनीला ? तिनं असं कां वागावं ? अशानें तिला बरं वाटत असेल ? तिच्या पासून आईला सुख नाहीं, बाबानां संतोष नाहीं. हें कांहीं बरं नव्हे ! ’ असे विचार मला भंडावून सोडायचे ! मी आईला ताबडतोब सांत्वनपर पत्र टाकी. वहिनीला सुद्धां स्वतंत्र पत्र पाठवून तिला दोन उपदेशाच्या गोष्टी सांगाव्यात, असें वरचेवर मनांत येई. त्याप्रमाणें एकादेवेळीं अनावर विचार

येऊन त्या भरांत लिहायला बसे. कांहीं थोडे लिहून झाल्यावर लेखन थांबे. वहिनी आपलं ऐकणार नाहीं. " ही कोण मला उपदेश करणारी ? माझ्यापेक्षां हिला काय कळतंय ? " असें तिला वाटेल आणि आपल्या लिहिण्याचा कांहीं एक उपयोग न होतां, कदाचित् भलताच परिणाम व्हावयाचा; अशा विचारानें मी तो नाद सोडून देई. समक्षच जाईन तेव्हां वहिनीला गोड बोलून समजावून सांगितलेलं जास्त बरं, तेव्हां त्याच-वेळीं आपल्याला काय सांगायचं तें सांगू म्हणजे झालं. मग तिला ऐकायचं असेल तेव्हां ऐकेल, नसेल तर ऐकणार नाहीं. याउपर आपण तरी काय करणार ? ज्याचं करणं त्याच्या बरोबर ! अशी कशी तरी मी आपली समजूत घाली, व माझ्या दुसऱ्या उद्योगाला लागे.

त्याच सुमारास वरचेवर पुण्याहून बाबूराव कशालासा मुंबईला येत असे. आला कीं आमच्याकडे यायचाच. केव्हां आमच्याकडे जेवायला राह्यचा; केव्हां नाहीं. नेहमींची त्याचा ' डँडीशाही ' झोंक कायमचाच असायचा. माझ्या घरीं आला म्हणजे, तो माझ्याशीं बोलायचा. मी पण त्याची विचार-पूस करीत असे. मी विचारी म्हणजे माझ्या माहेरची हकीकत. दुसरें काय विचारणार ? तो मुंबईला कां येई ? त्याचें काम काय असे ? याची चौकशी मी कधींच केली नाहीं. तिकडून केव्हां तरी सहज विचारणं होई, तेव्हां " नौकरीच्या शोधाकरितां हेलपाटे घालावे लागत आहे, वडिलांची प्रकृती अधिकाधिक बिघडत चालली आहे. आतां मला कॉलेज नाइलाजानें सोडणें भाग झालें असून नौकरी पत्करलीच पाहिजे. इथें एका इंग्लीश फर्म-कडून कॉल आला होता म्हणून आलों होतों. " असें केव्हां सांगे तर केव्हां " अमक्या अमक्या खात्यांत एक चांगली पोस्ट आहे असं कळलं आहे; पण त्याकरितां चांगलासा वशीला पाहिजे आहे. हैकोर्टच्या चीफ जस्टीसची चिठ्ठी मिळाली तर ती पोस्ट मिळण्याची खात्री असून चिठ्ठी मिळावयास-ही अडथळा येणार नाहीं. आमचे बापूसाहेबांची आणि हल्लींच्या चीफ जस्टीस यांचा फार वर्षापूर्वींचा परिचय आहे, तेव्हां बापुसाहेबांचा मी मुलगा आहे हें त्यांना कळायचा अवकाश कीं माझं काम झालंच पाहिजे. याशिवाय जस्टीससाहेबांची बायको माझ्या आईची बालमैत्रिण आहे. तेव्हां तिलाही जाऊन भेटणार आहे. आईनं तिला भेट दिली आहे. ती तिला

प्रथम नेऊन द्यावयाची आहे. म्हणजे जस्टिससाहेबांकडून चिठ्ठी मिळेल का नाहीं, याबद्दल शंकाच नको! त्याचकरितां आज मुद्दाम आलों आहें!" असें कांहींतरी बाबूराव भरमसाट सांगत सुटे. तो आपल्याकडून शक्य तितकी बोलण्यांत सफाई आणी. खरें भासविण्याचा आटोकाट प्रयत्न करी. पण जरा सूक्ष्म रीतीनें ऐकणाराला बाबूरावाचें बोलणें केवळ थापाथापीचें आहे असें समजल्यावाचून रहायचें नाहीं. त्यांतून आमच्या तर तो पूर्वीपासूनच चांगला परिचयाचा. शिवाय त्यानें थापेबाजीचा आपल्या आईपासून चांगलाच गुण उचलेला आहे, हें मला पुरतें माहित होतें. मी त्याला बोलून दाखवीत नसे इतकेंच. पण मी त्याच्या कोणत्याच बोलण्यावर विश्वास मात्र ठेवीत नसे. जेवायला राहीला तर जेवायला घालायचें. नाहीं म्हणायचं नाहीं इतकंच! यापेक्षां त्याला विशेष सलगी करूं द्यावयाची नाहीं. आपणही करावयाची नाहीं हें माझं ठरलेलं होतं. तशीच तिकडूनही सूचना होती. तिकडे बाबूरावाचा स्वभाव मुळींच पसंत नव्हता. त्याचा विषय निघाला म्हणजे तिकडून म्हणायचं होई. "असली माणसं फार भयंकर असतात. केव्हां कोणाला कोणत्या संकटांत घालतील आणि आपणही खोड्यांत अडकतील याचा नेम नाहीं! यांचा संग जितका कमी तितका चांगला! हा लोकाचा बहुतेक 'रेस'ला येत असला पाहिजे! त्याच्याशिवाय याची 'डँडीगिरी' चालायची कशी? घरचा कुबेर लागून गेला आहे थोडाच! पण आपल्याला त्याच्याशीं काय करायच आहे? आला तर जेवायला घातला. सोडून दिलं. 'दुर्जनं प्रथमं वन्दे!' असल्यापैकीं यांची जात. म्हणूनच या लोकांना जेवायला तरी घालायचं, नाहीं तर या लोकांचं आम्हीं काय देणं लागतो?" असं सांगतांना मला देखील अशा वेळीं उद्देशून सांगायचं, "तुम्हीं त्या बाबूरावांजवळ आईला देण्याकरितां जिन्नस–पान्नस–पत्रबित्र देण्याच्या भानगडींत पडत जाऊं नका कीं कसला निरोप देखील सांगायचा नाहीं. हीं कुळं विश्वासाचीं नसतात! आपल्याला हवं तें धाडायला पोस्टाची सोय चांगली आहे."

त्यामुळें मी जपूनच असे. बाबूराव आला कीं, माझ्याशीं ऐसपैस बोलण्याचा प्रयत्न करी. पुण्याकडची हकीकत तिरवटमिठ लावून सांगे. आई असं म्हणत होती, मावशीबाई परगांवीं जाण्याच्या विचारांत होत्या.

तुझ्या बाबांची प्रकृती बिघडली आहे. या खेपेला मला तुला बरोबर घेऊन यायला बजावलें आहे." असें केव्हां तरी म्हणायचा. मी नाहीं म्हणत नसे. पण त्याच्याबरोबर जायचं नाहीं, असा माझा पक्का निश्चय असे. मीच जायची नाहीं तरी तिकडची परवानगी विचारतें नी मग सांगतें." असें सांगून रिकामी होत असे. मग तोही फारसा पुढें बोलत नसे.

पहिल्यांदा बाबूराव जेव्हां माझ्या मुंबईच्या बिऱ्हाडीं आला त्या वेळीं मी जरा घाबरलेंच! 'हा कशाला इथें?' असा प्रश्न मनांत उद्भवला. पण त्याच वेळीं काय, पण नंतर केव्हांही जरी आला, तरी त्यानें आपली माझ्या इथें आल्या वेळची वागणूकच अशी ठेवली कीं, माझी भीति निराधार असल्याचें मला आढळून आलें. मी घरीं एकटी असलें नी तो आला, म्हणजे हा कांहीं फाजीलपणा करतो कीं काय? असा संशय येई. पण त्या शंकेस फारसा वाव पुढें राहिला नाहीं. तो बेफाट नेहमींच बोले. पण त्याच्या त्या बेफाट बोलण्याचे विषय अवांतर असत. निर्विष असत. म्हणून तर त्याला येऊं देतां आलें. तो नेहमीं घरसोडीचें बोले. थापा देई. पण तें मला चटदिशी ओळखे व तें जाणूनच मी त्याच्याशीं वागे.

तो आला म्हणजे अगोदर माझ्या आई संबंधानें, नंतर मावशीसंबंधानेंच जास्त बोले. भय्यासंबंधानें मात्र स्तुतिपर ऐसपैस बोले. मीही त्या वेळीं त्या संबंधानें बरेंच बोले. त्याच्या त्या पुष्कळ बोलण्याचा हेतु मी इतकाच समजे कीं "त्याला मला असें दाखवावयाचें आहे कीं, मी त्याच्या मागच्या व्रात्यपणाच्या वागण्यावर विरजण घालावें. त्या गोष्टी मी विसरून जाव्या. व आपल्या घरीं त्याला निर्वेध येऊं द्यावें, त्याच्याकडून मला केव्हांही व कसलीही भीति नाहीं;" हा त्याचा माझ्याशीं वागणाचा उद्देश आहे!" मीही तें समजूनच त्याच्याशीं वागे व त्यालाही वागवी.

आम्हीं बाबूरावाशीं वागतांना अतिशय सावधगिरीनें, हुशारीनें, धोरणानें वागत होतों असें आम्हांला वाटत होतें; पण आमच्यापेक्षांही तो आमच्याशीं अधिक सावधगिरीनें, जास्त हुशारीनें आणि चतुर धोरणानें वागत असल्याचें आम्हांला पुढें कळून आलें. कारस्थानी, उपद्व्यापी माणसें बहुधा जगांत असेंच वागत असतात. बाबूराव आमच्याशीं इतका सरळ सज्जनपणानें कां वागत असे, याचें कोडें कित्येक दिवस आम्हांला उलगड-

लेंच नाहीं. पण तसें वागण्यांत त्याचा कांहीं तरी गूढ हेतु होता, यांत शंकाच नव्हती! तो आमच्या इथें आला म्हणजे भरमसाट थापा देई असें आम्हांला वाटे. पण त्याचा पडताळा मुद्दाम पहायला कोण जाणार! तरीहि आमची इच्छा नसतांना एक दिवस तसा पडताळा मला आला. त्यामुळें मला थोडी करमणूक झाली खरी पण करमणुकीपेक्षां कसल्या तरी भयद कल्पनेनेंच अधिक भेवडावलें. ती गोष्ट अशी झाली:---

बाबूराव मुंबईला आला म्हणजे सर्वांबद्दल कांहींना कांहीं माहिती सांगायचा आमच्या कमलावहिनींचें नांव आपल्या बोलण्यांत चुकूनही येऊं द्यावयाचा नाहीं. पण मीही तिच्याद्दबल त्याच्याजवळ कसलीच चौकशी करीत नसे. पण एकदां असें झालें कीं, दोन अडीच महिने मला पुण्याला जाताच आलें नव्हतें. नुसती पत्रोत्तरीं चालली होतीं. पत्रांतून नेहमींच्याच घरगुती गोष्टींचा ठराविक ठशांचा पाढा होता. आदले दिवशींच आईचें पाकिट आलें होतें; त्यांत वहिनींच्या वागणुकीविषयीं विशेषच लिहून आलें होतें. तेच सारे विचार डोक्यांत घोळत होते. त्याच्या दुसरेच दिवशीं बाबूराव सकाळच्या एक्सप्रेसनें मुंबईस आमच्या बिऱ्हाडीं येऊन दाखल झाला. त्या दिवशीं कसें कोण जाणें त्याच्या तोंडीं कमलावहिनींचें नांव आलें. मलाही रहावलें नाहीं. मी बाबूरावाजवळ वहिनीसंबंधीं किंचित् विचारपूस केली. त्या वेळीं त्यानें पण खूप साळसूदपणाचा आव आणून वहिनीबद्दल गुणवर्णन-पर माहिती दिली. तो म्हणाला:—

"बस्स! ताई, काय सांगूं तुला, भय्याला लाखांत बायको मिळायची नाहीं, अशी मिळाली आहे! ज्ञान काय, विनय काय, शालीनता काय, नम्रता काय! एकेक गुण कमलावहिनींचा अपूर्व आहे म्हणेनास! तुझी आई आमच्या आईजवळ तर नेहमीं कमळावहिनींच्या संबंधानें असे उद्गार काढते कीं आमच्या घराण्याच्या पूर्वपुण्याईनेंच ही देवता आमच्या घरीं आली आहे! हिच्याच पायगुणानें आमच्या घराण्याचा उत्कर्ष व्हायचा आहे. तुझी आई अशी स्तुति करते. मावशीबाईना तर कमळावहिनींना कुठें ठेऊं नी कुठें नको असं होऊन गेलं आहे! जेव्हां तेव्हां वहिनींचं गुणवर्णन चाललेलं असतं. आतांशा दुसरा विषय नाहीं तिला. इतकें कशाला? आमची आई कमळावहिनींचें किती गुण गातें! आमची आई उगीच

कुणाला हें म्हणायची नाहीं अं ? लक्षांत ठेव ! तुझ्या आईच्या ती अगदीं अर्ध्या वचनांत असतें ना ! कॉलेजांतली अल्लड मुलगी गृहिणीपदावर चढतांच तिच्यांत इतका फरक होईल असं कुणालाही वाटलं नव्हतं हो ! तुला कळलेंच असेल कीं कमलावहिनी आपल्या मावशीबाईंच्या मदतीनें आणि तुझ्या वडिलांच्या द्रव्यसाहाय्यानें लवकरच एक टोलेजंग ' स्त्रीशिक्षण-संस्था ' स्थापन करणार आहेत ! बाबासाहेबांची वहिनीला पूर्ण मदत आहे. त्यांचा चांगलाच पाठिंबा आहे ! त्या दोघी त्या तयारीलाही लागल्या आहेत. बाकी कळलं असेलच हें तुला पूर्वीच म्हणा, पण आणखी एक तुला सांगतों, कमळावहिनीनें त्या संस्था स्थापण्याच्या संबंधांत मलाही सह-भागी करायचें ठरविलें आहे. मी विचार करतों आहें त्यांना मिळावं कीं काय ! मी अजून त्यासंबंधानें नक्की मात्र कांहींच निश्चित केलं नाहीं. कदा-चित् त्यांच्या संस्थेला जाऊन मिळेनही ! कदाचित् मिळणारही नाहीं ! मात्र आजकाल ज्यांच्या त्यांच्या तोंडी कमलावहिनींचं नांव येत असून जो तो तिची यथास्थित स्तुतीच करतो आहे ! तिच्या घरीं तर अष्टौप्रहर तिच्या-वर सर्वांकडून स्तुतिकुसुमांचा एकसारखा वर्षावच होत असतो ! आम्हीं म्हणतों बस्स ! आतां अशा कमळावहिनींसारख्याच स्त्रिया निपजायला पाहिजेत हो ! नाहीं तर काय ? कमळा वहिनींचा उत्साह अपूर्व आहे. चिकाटी विलक्षण आहे. कंटाळा तर तिला माहितच नाहीं. कमळावहि-नीनं भय्याला पत्र पाठविलें, तर गेल्या डाकेला त्याचेंही अभिनंदनपर पत्रोत्तर आलें. वहिनींच्या कार्याला त्याची पूर्ण सहानुभूति आहे ! मी तर म्हणतों कमळावहिनी कोणी तरी शापभ्रष्ट देवताच जन्माला आली आहे. ती शीलाची सावित्री आहे. गुणाची गायत्री आहे. मांगल्याची मंगल-मूर्ती आहे. ती तर धन्य आहेच. पण भय्याचें भाग्य आहे कीं त्याला असली उद्धारकर्ती पत्नी लाभली आहे ! " बाबूराव सांगत होता. मी चकित होऊन ऐकत होतें. " होय का ? असं का ? " असं मी नकळत का होईना पण म्हणालें. तरी पण मी थोड्या वेळानें मनाला प्रश्न केलाच कीं हा बडबड्या बाबूराव बडबडला तें खरें कीं काल वहिनीसंबंधानें आईनें लिहिलें तें खरें ? " मी आपलें मनाशींच म्हटलें. हो, त्या बाबू-रावाला कशाला हें बोलूं !

प्रकरण बारावें



# संशयाला कारणें

बाबूरावानें बोलण्याच्या भरांत कमळावहिनींची भरमसाट स्तुति केली. तिला अगदीं देवतापदावर चढविलें. पण त्याच्या साऱ्या सांगण्यांत सत्याचा भाग किती होता आणि असत्याचा अंश केवढा होता, हें मला कळेना. काय ? वहिनी आणि मावशीबाई या बाबूरावाच्या सहाय्यानें स्त्रियांच्या शिक्षणाची संस्था स्थापन करताहेत ? मावशीबाई या कार्याला तयार झाल्या ? बाबांनीं सम्मति दिली ? द्रव्यसहाय्य देण्याचं वचन दिलं ? बाबूरावाला सहाय्यक म्हणून घ्यायला परवानगी दिली ? मंडळी कार्याला तयार देखील झाली ? अन् हें सारें झालं केव्हां ? कालच आईचं पत्र आलं त्यांत यासंबंधानं एक अक्षरदेखील कां नाहीं ? कां कालच्या पत्रांत जें वहिनीसंबंधानें आईनें मोघमच " सूनबाई दिवसेंदिवस बहकतच चालली आहे. तिच्या वागण्याचा ताळतंत्र सुटत चालला आहे " असं लिहिलं आहे, तें त्याच गोष्टीला उद्देशून ? नव्या प्रजेचे नवे उद्योग जुन्या पिढीला एकदम पसंत पडत नाहींत; तसाच प्रकार नसेल कशावरून ? पण तसें असतें तर आईनें तें सारं त्या तऱ्हेनें मला लिहून कळविलें असतं ! वहिनीनं पण कळवायला कमी केलं नसतं ! मग आहे काय हा प्रकार ! बाबा, आई, वहिनींची भरमसाट स्तुति करीत आहेत म्हटल्याचें मला मुळींच खरं वाटलं नाहीं. मावशीबाई तिच्या नादीं लागल्या आहेत, या गोष्टीवरही माझा विश्वास बसला नाहीं. पण बाबूरावाच्या आईनं वहिनीची वाखाणणी चालविली आहे या त्याच्या सांगण्यावर मात्र माझा चटदिशी विश्वास बसला. पण त्याबरोबरच त्या मंडळींनीं वहिनींची केलेली वाखाणणी मला कांहीं आवडली नाहीं. बाबूरावानं वहिनीबद्दल जितका आदर दाखविला, जितकी स्तुति केली, तिला देवता म्हटलं हें मला मुळींच खपलं नाहीं. त्या वेळीं माझ्या मनाला कसेसेंच वाटूं लागलें. बाबूरावानें आणि त्याच्या आईनें वहिनीची इतकी स्तुति कां करावी ! वहिनींच्या वर त्या

मंडळींची छाप पडली, ती त्यांच्या आहारी गेली हें कांहीं ठीक चिन्ह नव्हे ! वहिनींसंबंधानें बाबूरावानें सांगितलेल्या प्रत्येक गोष्टीचा अर्थ त्यानें सांगितल्याच्या उलट असला पाहिजे असेंच माझ्या मनानें घेतलें. खरा प्रकार काय आहे याबद्दल पत्रांतून विचारावें असें एकदां मनाला वाटलें. पण पुन्हां असें वाटलें कीं त्यापेक्षां आपण समक्ष पुण्यापर्यंत जावें व खरा प्रकार काय आहे तो डोळ्यांनीं प्रत्यक्ष पहावा.

बाबूरावाची आई आणि तो पूर्वीं आमच्यासंबंधीं कधीं बरें म्हणत नसत. आमची होईल तितकी निंदा करीत; उणीवा पहात; तीच मंडळी सर्रास आमच्याबद्दल चांगलेच उद्गार कशी काढायला लागली ? आमच्या-बद्दल त्यांना असा प्रेमाचा पान्हा कसा फुटला ? हें सारें खोटें नसेल कशा-वरून ? दुष्टांची जिव्हा गोडगोड बोलायला लागली म्हणजे ती लवकरच जलाल गरळ ओकणार आहे असें सुज्ञ समजतात. तशी तर तऱ्हा यांत नसेल ? नेहमींच्या अनुभवावरून बोलायचें तर तसेंच कांहीं तरी खरोखर असलें पाहिजे. पण त्याशिवाय ती मंडळी आमच्याशीं भलेपणानें वागणें शक्य आहे असं मनांत यायलाही एक कारण होतें. तें कारण भय्या विलायतेला जायच्या अगोदरच थोडे दिवस घडून आलेलें होतें. त्या मंड-ळींची आमची कांहीं भाऊबंदकी नव्हती कीं कसला हेवादावा नव्हता ! मी त्यांच्या घरीं पडायची ती पडलें नव्हतें आणि कदाचित् कमळावहिनी त्यांच्या घरीं पडायचा संभव होता, तोही निष्फळ झाला होता. आमच्या-बद्दल बाबूरावाचें घर विरुद्ध असेल तर याबद्दलच ! पण योगायोगाच्या गोष्टींना त्यांनीं किंवा आम्हीं तरी काय करावें ? तेव्हां त्या कारणानें उत्पन्न झालेला रागद्वेष फार काळ टिकेलच असें शक्य नव्हतें. तें वातावरण कालाच्या ओघाबरोबर निवळलें असलें पाहिजे ही एक कल्पना; आणि दुसरें एक ध्यानांत राहाण्यासारखें ठळक उदाहरण घडलें होतें तें असें:—

आमचा भय्या विलायतेला निघण्याच्या धांदलींत–घाईत होता. आम्हां सर्वांच्या पुढें तोच एक विषय असल्यामुळें इतर कसल्या गोष्टींचा विचार करायला किंवा कांहींकडे पाहायलाही फुरसत नव्हती. त्या सुमारास नेहमीं बाबूराव आमच्या घरीं येणारा पण तो चार आठ दिवसांत मुळींच आमच्या घरीं फिरकला नाहीं. आमच्या कोणाच्या तें ध्यानांतही आलें नाहीं.

सात आठ दिवसानंतर एक दिवस अशी दुपारच्या वेळीं बाबूरावाचा आई आमच्या घरीं भय्याची चवकशी करीत आली. मी भय्याच्याच खोलींत त्याच्या पुस्तकाच्या ट्रंका भरीत होतें. भय्या आपली पुस्तकें सामान वगैरे नीटनेटकें जुळवीत होता. तोंच ती बाई तिथें आली. एरव्हीं एकाद्या वाघिणीसारखी गर्जना करीत यायची, पण त्या दिवशीं तिच्या खड्या आवाजांत फरक झाला होता. स्वर किंचित् कापरा, कष्टी असा येत होता.

" भय्या—इथं आहेस का ? " दारांतूनच डोकावून तिनें म्हटलें. आम्हीं दोघांनीं एकदमच तिच्याकडे मान वर करून पाहिलें.

" काय काकू ? आणि अशा अवेळींच इकडे ? " भय्यानें चौकशी केली.

" कांहीं नाहीं. म्हटलें तुझें काय चाललें आहे पहावं—तूं आतां विलायतेला जाणार आहेस-तेव्हां—"

" तें झालं. पण तुम्हीं कांहीं तसंच काम असल्याशिवाय यायच्या नाहींत; हें मला माहीत आहे ! " भय्या तिला उद्देशून म्हणाला.

त्यावर तिनें एकवार माझ्याकडे किंचित् बारीक डोळे करून क्षणमात्र पाहिलें आणि मग ती भय्याकडे वळून कांहींशा हलक्या आवाजांत, थोडसं हंसरें तोंड करीत म्हणाली, " तूं कल्पना केलीस ती खरी आहे भय्या, कांहीं काम आहे म्हणूनच तुझ्याकडे आलें आहे ! अन् तूं तें काम केलेंच पाहिजे. तुझ्याच हातून होण्यासारखं आहे ! "

" काय ? माझ्याकडे काम आहे ? आणि माझ्याचकडून तें होण्यासारखें आहे ? " भय्यानें आश्चर्यानें विचारलें.

" होय रे म्हणून तर तुझ्याकडे आलें आहें. "

" काय काम आहे काकू ? "

" बाबूच्या गळयाला फांस लागयची वेळ आली आहे. आमच्या सगळ्यांच्या तोंडचं पाणी पळालें आहे ! दोन दिवसांत कुणाच्या पोटांत एक घांस गेलेला नाहीं ! " बाबूरावची आई गहिंवरून बोलूं लागली.

" म्हणजे ? झालं आहे तरी काय असें ? काय केलं बाबूरावानें ? "

भयचकित होऊन भय्यानें विचारलें. मी नुसती टकमका त्या बाईकडे पाहातच राहिलें.

" बाबूनें कांहीं एक केलं नाहीं. पण म्हणतात ना, तशांतली गत ! आमची वेळ सध्यां बऱ्यावर नाहीं; त्याला कोण काय करणार ? " ती बाई पदरानें डोळे पुशीत बोलू लागली, "घरीं मंडळी अंथरुणास खिळलेली. दुसरीं लहान लहान मुलं. बाहेरची मिळकत बंद झालेली. घरचें आहे नाहीं तें मोडून खाण्याची आमच्यावर सध्यां वेळ. अन् त्यांत हा असला प्रसंग"

" पण झालं आहे तरी काय ? तें सांगा ना ? " भय्यानें अधिरतेनें विचारलें.

" भय्या—नुसतं कुभाड बरं—नुसतं कुभांड आहे ! कांहीं एक न करतां सवरतां बाबूवर बालंट आलं आहे. आज त्याच्या साऱ्या आयुष्याची माती व्हायची वेळ आली आहे. कॉलेजच्या प्रिन्सिपॉलनीं त्याला कॉलेजांतून काढून टाकायचं ठरवलं असून कुठल्याही कॉलेजमध्यें त्याला शिरकाव मिळणार नाहीं असा प्रसंग त्याच्यावर आणला आहे ! काय करावं बरं भय्या, या वेळीं आम्हीं ? तूं नकोस का पहावयाला या प्रसंगाकडे ? काल घरीं हें सारं लिहून आलें आहे. त्याला आणखी दंड सुद्धां केला आहे म्हणे ! "

" असं ? मला हें कांहींच माहीत नाहीं ! केव्हां हें झालें ? बाबूराव मला बोलला कसा नाहीं हें ? " भय्या बोलला.

" तो इकडे चार दिवसांत आला आहे कुठें " त्याची आई पुढें बोलूं लागली, " तो करायला गेला एक नी झालं भलतंच ! भल्याची दुनिया नाहीं आज काल भय्या. बाबू थोडा बोलका आहे ना ? त्याला हौसेनें कुठल्याही कामांत पुढाकार घेऊन चार चौघांत मिसळायला पाहिजे ना ? त्याचं हें त्याला प्रायश्चित्त मिळतं आहे बरं का ? परवा तुमच्या कॉलेजचं गॅदरिंग का काय म्हणतात तें झालं ना ! त्यांत बाबूनें पुढाकार घेतला होता—सेक्रेटरी का काय झाला होता ना ? हं! मग झालं तर ! त्या वेळचं आहे तें सारें ! गॅदरिंगच्या कामाकरितां प्रिन्सिपॉलच्या बंगल्यावर वरचेवर बाबूला वेळीं अवेळीं जायचा प्रसंग येत होता. त्याच धांदलींत केव्हां कुणी तरी लफंग्यानें प्रिन्सिपालसाहेबांच्या खिशांतून पन्नास रुपयांच्या नोटा लांब-

विल्या म्हणे आणि तें आतां आलें आहे तुझ्या बाबूवर! पण तूंच सांग, बाबू असं करील का? तूं त्याला चांगलाच ओळखतोस. असा त्याचा स्वभाव तरी आहे काय? आतां त्याचा पहिल्यापासून हूड स्वभाव आहे! हूडपणा करतो तो. मी नाहीं म्हणत नाहीं. पण हूड मुलं चोरी का करीत असतात?"

"बाबूरावानें पन्नास रुपये घेतले? कशावरून?"

"कशावरून कसलं कपाळ!" बाई आवेशानें म्हणाली, "भित्यापाठीं ब्रह्मराक्षस! बाबू प्रिन्सिपॉलसाहेबांच्या दिवाणखान्यांत जिथं त्यांचा कोट होता तिथं उभा होता. दिवाणखान्यांत दुसरें कोणी त्यावेळीं नव्हतें! तो त्यांची वाट पहात होता. इतक्यांत प्रिन्सिपॉलसाहेबांची बायको तिथें कशा-लाशी आली. ती तिथें यायला नी बाबू तिथून हलायला एकच गांठ पडली. तेवढंच त्या बाईनं ध्यानांत राखलं. तिनं आपल्या यजमानांना सांगितलें; त्याच वेळीं त्यांना कळून आलें कीं आपल्या खिशांतील पन्नास रुपये नाहींसे झाले आहेत. झालें! बादरायणी संबंध लगेच जोडण्यांत येऊन त्याच क्षणीं बाबूला बोलावून नेलें नी त्याला दोषी ठरविलें. त्याचं बोलणंसुद्धां ऐकून कुणी घेईना. गॅदरिंगाच्या वेळीं प्रिन्सिपालसाहेबांच्या मर्जीविरुद्ध बाबू वागला होता, असा एक त्याच्यावर आरोप लादला. त्याचाही घुस्सा त्याच वेळीं त्यांना आला. हें असं सगळं होऊन राहिलं आहे. त्या वेळे-पासून घरीं मंडळींचा संताप झाला आहे. बाबूला शिव्यांची लाखोली चालली आहे. मीं पण त्याला बोलून बोलून पुरें करून सोडलं आहे. बाहेरचा त्रास, घरांतला त्रास. अशी त्याची अवस्था झाली आहे!" इतकें म्हणून ती थांबली. त्या वेळीं भय्यानें हलकेंच विचारलें; "बरं पण काकू, मी आतां काय करूं असं तुमचं म्हणणं?"

"काय करूं म्हणजे? हें काय तुझं विचारणं?" बाबूरावाची आई उसळून म्हणाली, "हाच तुझा भाऊ असता, त्याच्यावर असं बालंट आलं असतं तर तूं काय केलं असतंस! स्वस्थ बसला असतास का? काय करूं म्हणून दुसऱ्याला विचारलं असतंस का? त्या वेळीं जें केलें असतेंस ,तेंच आतां कर! मी जशी बाबूची आई तशीच तुझी

आहे. बाबू तुझा भाऊ आहे. त्याच्यावरचं संकट टाळायला तुला पुढें झालं पाहिजे. बाबूबद्दल तूं प्रिन्सिपालसाहेबांच्या जवळ रदबदली केलीस तर त्याच्यावरचं संकट टळेल असें बाबू म्हणतो. अन् तें खरें आहे. मंडळीच तुला घरीं बोलावून हें सांगणार होती. पण मीच इकडे आलें. मग ऐकणार ना हें? करणार ना एवढं काम? जा. बाबूला बरोबर घेऊन. त्याचं उजळ तोंड करून घेऊन परत ये. त्याच्यावर आतां लवकरच घर-प्रपंचाचा भार आहे हें तुला माहीत आहे! तो लवकर मिळवायला लागला नाहीं तर आमचं काय बरं होईल? म्हणून म्हणतें—"

पुढें बोलूं न देतां भय्या तिला म्हणाला, "काळजी करूं नका. काकू, मला जें करतां येणें शक्य आहे तें मी करीन. प्रिन्सिपालसाहेबांना आतांच जाऊन भेटतों. बाबूरावाला माझ्याकडे पाठवून द्या. समजलांत!"

म्हणून भय्यानें आपल्या अंगावर ती कामगिरी घेतली इतकेंच काय पण ती यशस्वीरीतीनें पारही पाडली. त्याच्याबरोबर बाबूराव बंगल्यावर गेला नाहींच. तो एकटाच गेला. प्रिन्सिपॉलसाहेबांना सगळी हकीकत सांगितली. त्यांची ऐकून घेतली. पण शेवटीं बाबूरावावरचें संकट भय्यानें टाळलें.

ही अशी कामगिरी बाबूरावांच्या बाबतींत भय्यानें विलायतेला जाण्यापूर्वी केली असल्यामुळें त्या मंडळींचें आमच्या विषयींचें मत बदललें असेल अशी माझी भावना होती. व त्याच दृष्टीनें आम्हीं त्यांच्याकडे पहात होतों. पण अनुभवांतीं तेंही लटकेंच ठरलें.

चांगलें झालें तर आपल्यामुळें व वाईट झालें तर तें दुसऱ्याच्या हलगर्जीपणामुळें असें समजण्याची कांहीं जणांची वृत्ति असते. तसाच प्रकार बाबूरावांच्या घरीं होता. संकट आलें त्या वेळीं जी बाई गयावया करीत भय्याकडे आली, मुलांचें नातें लावलें. तीच बाई वेळ जातांच तें सर्व विसरूनही गेली. बाबूरावाच्या तर तें गांवींही नव्हतें, असें दिसून आलें. कारण कांहीं दिवस जातांच त्यांच्या जातीस्वभावानें पुन्हां मस्तक वर काढलेंच. पुन्हां आमच्या घरचीं नालस्ती—निंदा त्या घरांतून सुरू झाली. भय्या विलायतला गेलेला. मी मुंबईला. आई आजारी. मावशीबाई घर-कामांत चूर. बाबा आपल्या बाहेरच्या कामांत दंग. त्यांचा वेळ अगदीं मंडालिकाप्रमाणें घड्याळाप्रमाणें बांधलेला. त्यांना एरव्हीं इकडे कीं तिकडे

पाहायाला मुळींच फुरसद नाहीं. आणि अशा स्थितींत कमलावहिनीला विलायतेला जायला मिळालें नसल्यामुळें तिची धुसपूस. ती घरीं कुणावरच प्रसन्न नसे. कुणाशीं बोलत देखील नसे. जेवायपुरतं खालीं यायचें. जेवली कीं माडीवरची तिची खोली आणि ती ! आंतून दार लावून घेऊन आंत एकटी काय करीत असे, कोण जाणें ! बरं तिला कुणी विचारायची सोय नाहीं. विचारलं तर सरळ उत्तर मिळायचं नाहीं. कुणाला कांहीं तरीच फटकन उत्तर द्यायची. म्हणून कुणी तिच्याशीं बोलण्याच्याच भरीला पडत नसे. संध्याकाळीं आपली उठायची नी बाबूरावाच्या घरीं जाऊन बसायची. बाबूरावाच्या आईचं नी तिचं चांगलंच हितगुज चालायचं ! घरीं असली म्हणजे तिच्या कपाळाला सदा आठया. तोंडावर तिरस्कार दिसायचा ! पण तीच बाबूरावाच्या घरीं गेली म्हणजे तिची कळी खुलायची. तिला कंठ फुटायचा. तिची सारी पुस्तकीविद्या तिथें प्रगट व्हायची ! बाबूरावाची आई पण 'होस–हो' देऊन वहिनीला सांथ द्यायची-तिला चढवायची.

दररोज कांहींना कांहीं घरच्या कागाळ्या वहिनीनें बाबूरावाच्या आईला सांगाव्यात. तिला तिनें दुजोरा द्यावा. "माझ्याशीं घरीं कुणी बोलत नाहींत. सर्रास माझ्याशीं अबोला धरण्यांत आला आहे. मी त्यांना आवडत नाहीं. माझ्या शिक्षणाची तेव्हां जेव्हां कुचेष्टा करतात. माझं बरं त्यांना पहावत नाहीं. मीं बटकीसारखं घरीं अष्टौप्रहर राबावं, गुलामाप्रमाणें वागावं, ज्यांच्या त्यांच्यापुढें बटकीसारखं वागावं, असं सगळयांना वाटत असतं. माझी योग्यता कुणालाच कळत नाहीं ! मला समाजांत शिरूं देत नाहींत. सार्वजनिक कार्यांत पडूं देत नाहींत. चारी बाजूंनीं माझा त्यांनीं कोंडमारा चालविला आहे. मी त्यांना प्रथमपासूनच नको होतें. ती आतां आलें तर माझा सूड उगवायचा चालविलं आहे सगळयांनीं ! मी पण सगळ्यांना ओळखून आहें. माझ्या खेटराची सर कुणाला नाहीं." असें तिनें म्हटलें म्हणजे त्या बोलण्याला बाबूरावाच्या आईनें सूर द्यावा आणि म्हणावें, "नाहीं तर काय ? तुझी योग्यता काय कळायची आहे त्या माकडांना ? आम्ही तें ओळखून आहोंत. तुला भय्याबरोबर विलायतेला न जाऊं देण्यांत तुझा सूड घ्यायचा, याशिवाय दुसरा कोणता

हेतु आहे ? तेंच आपल्या मुलीला कसं वागवतात बघ ! लग्न झालं कीं नवऱ्याबरोबर तिला धाडली. मुलीचं सुख त्यांना कळतं नी सुनेचं ? तें कशाला त्यांना दिसतंय ? सुनेचा सूड काढायचा होता ना त्यांना ? म्हणून तर त्यांनीं तुम्हां नवराबायकोंची अशी ताटातूट केली ! ज्या वयाचं त्या वयांत माणसाला सुख नसलं तर मग काय उपयोग ? हें का त्या माणसाला कळत कां नसेल ? पण मी सांगतें ना ? तूं म्हणतेस तेंच खरं ! भय्या बिचारा भोळा नी सरळ ! त्याला आपले आईबाप म्हणजे पार्वतीपरमेश्वराप्रमाणें वाटतात. पण त्यांच्या पोटांतला राक्षसीपणा त्याला कसा कळणार ? एकस्याला जायला सांगितलें. गेला आपला ! पुन्हां बाहेर फुशारकी मारायला आहेच यांची तयारी ' आमचा मुलगा किती कर्तव्यनिष्ठ आणि ध्येयवादी आहे पहा ' म्हणायला. लग्न झालं कीं मागें त्या पाशांत न गुंतता, विलायतेला चालता झाला. असेंच आजकालच्या तरुण-तरुणींनीं वागायला नको का ? पण मी म्हणतें बाई, हें खरें नव्हे नी बरें पण नव्हे ! भय्याचा तरी कुणी नेम सांगावा ? तुला विसरून जाऊन येतांना एकादी गोरी मडम त्यानें बायको करून तुझ्या उरावर नाचायला नाहीं आणली म्हणजे मिळविली ! हेंच तूं त्याच्याबरोबर गेली असतीस; म्हणजे तसली तरी कसली भीति नव्हती ! पण हें शहाणपणाचा टेंभा मिर-विणाऱ्या त्या तुझ्या सासुसासऱ्यांना नको होतं कां कळायला ? पण नव्हे ग बाई नव्हे ! त्यांना दुसऱ्याच्या सुखदुःखाची काय कल्पना असणार ? मी बाई त्यांच्या जागीं असतें तर नसतं असं कांहीं केलं. मी माझ्या मुलाची नी सुनेची ताटातूट करण्याचं पाप कधीं देखील केलं नसतं ! कमळ, तूं माझी सून व्हायला हवी होतीस ग ! म्हणजे मग माझं वागवणं तुला कळलं असतं. पण आतां नुसतं बोलून काय उपयोग आहे ? मला माहीत आहेत तीं सारीं माणसं ! म्हणून तर आमच्या पाठीशीं किती तरी तुझी सासू लागली होती आपल्या मुलीला माझ्या बाबूला करून घ्या म्हणून. अगदीं विलक्षण गळ घातली होती. पण मीच तें नाकारलें. मी निक्षून नाहीं म्हणून सांगितलें तेव्हां तुझ्या सासऱ्यानें मुंबईचा कुठला तरी पोरका पोर-सदाशिव आणला, नी त्याच्या गळ्यांत आपली मुलगी बांधून

मोकळे झाले ! अशीं आहेत तुझीं तीं माणसं ! तीं तुला कशीं सुख देणार नी बरं बघणार ? ”

असं बाबूरावाची आई मोठा कळवळा आणून बोलायची नी वहिनीला तें खरें वाटायचें. तिच्याबद्दल वहिनीला आपलेंपणा वाटायचा, नी आपल्या घरांतल्या माणसाबद्दल अधिकच तिट्कारा वाढायचा !

असेंच दिवसेंदिवस चाललें होतें. हेंच आईच्या पत्रांतून वरचेवर पर्यायानें लिहून येत असे. पण त्याचा अर्थ मी भलताच करीं. कुणाच्या तरी तोंडून मावशीबाईला बाबूरावची आई व वहिनी यांच्या मधलं हें ‘हितगुज’ इत्थंभूत कळे. ती आईच्या कानावर घाली. दोघी चिंता करीत बसत. यातलं होतां होईतों पर्यंत बाबांच्या कानांवर कोणी घालीत नसत ! असल्या नाजूकसाजूक गोष्टी बाबांच्या कानांवर कशा घालायच्या? आणि एकसारखा त्यांना कां ताप द्यायचा ?

मी मुंबईहून मुद्दाम आलें त्याच्या आदल्याच रात्रीं असला कांहीं तरी प्रकार झाला होता. मावशीबाईसंबंधानें बाबूरावाच्या आईनें वहिनीजवळ कांहीं तरी अभद्र सांगितलें होतें. तें मावशीबाईच्या कानांवर आलें होतें. मावशीबाई इतकी शांत गंभीर स्वभावाची पण तिला तें कळलें तेव्हां सहन झालं नाहीं. ती रड रड रडली. डोळे मुटक्यासारखे झाले. रात्रीं जेवली नाहीं. मी आल्यानंतर हें मला कळलें. मावशीबाई आतांपर्यंत कुणाशींच आईशीं देखील बोलली नव्हती.

मी आलें. टांग्यांतून उतरून आंत आलें. वहिनी कुठें बाहेर जायला निघाली होती. माझी तिची दृष्टादृष्ट झाली. मी हसलें, “ कां वहिनी ? कसं आहे ? ” असे शब्द तोंडावर आले होते. पण वहिनी हंसली नाहीं, प्रसन्नता दाखविली नाहीं. उलट कपाळाला आठ्या चढवून तशीच झणकाऱ्यानें माझ्याकडे दुर्लक्ष करून बाहेर चालती झाली. माझे शब्द तोंडांतल्या तोंडांतच विरले. मला कसेंसेंच झालें. पण त्या विचाराला थारा न देतां, “ असेल घाईत ! नवी संस्था काढण्याच्या घांदलींत; तिला फुरसद नसेल, म्हणून बोलली नसेल, असें मनाचें समाधान करून घेत मी अगोदर आईच्या खोलींत तशीच गेलें. मावशीबाई घरांत होती. बाबा बाहेरून यायचे होते. आईला मला पाहून बरें वाटलें. तिची कल्पना नव्हती मी अशी

अचानक येईन म्हणून. त्यामुळें जरा तिला आश्चर्यही वाटलें. " वाः ताई! पत्र नाहीं बित्र नाहीं नी अशी आकस्मिक कशी ? " आईनें माझा हात आपल्या क्षीण हातांत धरून हलकेंच विचारलें. मी " आलें झालें तुला पहावेंसें वाटलें म्हणून ! " म्हटलें. आईला बरें वाटलें. नंतर बरीच इकडली तिकडली बोलणीं झालीं. भय्याच्या पत्राबद्दल चौकशी झाली. मी आल्या-पासून आईच्या खोलींत मावशीबाई आली नाहीं, म्हणून मी आईजवळ विचारपूस केली तेव्हां ती म्हणाली " काय झालं आहे तिला कालपासून कोण जाणें ! डोकं दुखतंय म्हणते. रात्रीं जेवली सुद्धां नाहीं वाटतं. मग तिची नी सूनबाईची कांहीं बाचाबाची झाली कीं काय न कळे ! मीं तिच्याकडे पाहिलें तेव्हां ती खूप रडली असावी असं मला वाटलं. विचारलं तर कांहीं बोललीच नाहीं. कांहीं कळलेच नाहीं तर मी तिची समजूत तरी काय घालूं? मी अशी शरपंजरी पडलेली. माझंच सगळ्यांना करावं लागतं. तेव्हां मी कुणाला जास्तकमी काय बोलणार ? तूं मावशीला विचार. तिची समजूत घाल. ती तुला सांगेल. तुझं ऐकेल. "

मी तिला बरं आहे म्हटलं. " मावशी व वहिनी मिळून ' स्त्रीशिक्षण संस्था ' काढतां आहेत, या बाबूरावानें दिलेल्या माहितीची इथेंच वासलात लागली. नाहीं तर मी त्याबद्दल आईजवळ व मावशीजवळही विचारणार होतेंच. नंतर आईनें " तुझी वहिनी तुला भेटली का ? तुझ्याशीं कांहीं बोलली का ? " असें मला विचारलं. तेव्हां दारांत येतांच झालेला प्रकार तिला निवेदन केला. आई कांहीं त्यावर बोलली नाहीं. वर कडीपाटाकडे शून्य दृष्टीनें पाहात " हूंऽऽ " असा दीर्घ निश्वास सोडला. मला त्या तिच्या दीर्घ निश्वासाचा अर्थ जरी कळला नाहीं, तरी त्याबद्दल मला अतिशय वाईट मात्र वाटलें. त्यावर मी कांहींच बोललें नाहीं.

रात्रींचीं जेवणें खाणें झालीं. बाबा भेटल्यावर त्यांनीं माझी योग्य ती चौकशी केली. मग आपल्या नित्य व्यवसायाला लागले. रात्रीं निजायच्या अगोदर मी मावशीला गांठलें. झोंपायला मुद्दाम तिच्याच खोलींत गेलें. खोदखोदून तिला विचारलें. पहिल्यांदा तिनें कांहींच दाद दिली नाहीं. " नाहीं ग कांहीं ताई ! तूं वेडीच आहेस ! माणसाचं डोकं दुखूंच नये वाटतें ? नाहीं दोन दिवस जेवण गेलं तर त्याला काय करायचं ? असें

सांगून तिनें उडवाउडवीचा हवा तितका प्रयत्न केला. पण मी अगदीं तिचा पिच्छाच पुरवला. तिच्या कुशींत घुसलें. रडूं लागलें, तेव्हां मग तिनें नाइलाज होऊन सारी हकीकत सांगिली. त्यांत बाबूच्या आईचं नी वहिनीचं संगनमत कसं झालं आहे; तिथें काय काय बोलणीं चाललींत; आपल्याला तीं कशी कळतात; हें सर्व सांगितलें. वहिनी कशी वहावत आहे, ती घरीं कशी वागते, सगळ्यांचा पायलोपावलीं कसा पाणउतारा करते, किती बेफाट वागते; याचा समग्र पाढा माझ्यापुढें वाचला. ती घरी सगळ्यांना तुच्छ कशी लेखते; स्वतः उच्छृंखलपणानें कशी वागते; याबद्दल जसेंच्या तसें मावशीनें वर्णन केलें ! त्या सर्व बोलण्यांत “ स्त्रियांची शिक्षण संस्था ” मावशी व वहिनी मिळून काढणार आहेत, या कल्पनेचा मागमूस कुठेंच लागला नाहीं. मावशीला त्या कल्पनेची ओळखही देण्याच्या मी भानगडींत पडलें नाहीं. एक बाबूरावाच्या डोक्यांतील तो कल्पनेचा डोलारा असावा, व त्याला फार झालें तर वहिनींची संमती असावी; एवढें मनाशीं मीं पक्कें ओळखलें. मला बरें व खरें वाटावें म्हणूनच बाबा, आई, मावशी, यांचीं नांवें, सांगतांना बाबूरावानें गोवलीं असावींत, हें आतां सूर्यप्रकाशाइतकें स्वच्छ झालें !

तो विषय सोडला आणि मावशीला लागण्यासारखें वहिनी काय बोलली हें समजावून घेण्याकडे माझें मन लागलें. पुष्कळ जरी अवांतर गोष्टी मावशीनें सांगितल्या होत्या तरी मावशीला वाईट वाटावें; तिनें रडावें, जेऊं नये, असें कांहींच त्यांत मला आढळून आलें नाहीं म्हणून मी इतकेंच मावशीला म्हटलें; “ पण मावशी, याबद्दल तूं रागावून जेवली कां नाहींस? रडलीस का ? दुसऱ्याकरितां तूं कां त्रास करून घेतलास ? हें ग काय ? ” त्यावर मात्र मावशीनें सांगितलें, “ ताई, उगीचच्या उगीच रडायला नी न जेवायला इतकी कां मी लहान अज्ञान वेडी आहे ? मी दुसऱ्याचा राग माझ्यावर कशाला ओढून घेऊं ? पण तुझ्या शहाण्या वहिनीनें मला कलंक लावण्याचं धारिष्ट केलं ना ? मी तिला एक दिवस आपली सहज सांगायला गेलें कीं, ‘ अग, तूं शहाणी आहेस शिकलेली खरी. पण आतां तुला पहिल्यासारखं वागून चालायचं नाहीं. जिथल्यासारखं तिथं वागावं लागतं. तूं आतां शाळा कॉलेजांत जाणारी का आहेस ? शेजारच्या त्या बाबूच्या

घरीं वेळीं अवेळीं काय जातेस ? त्याच्याशीं गप्पागोष्टी काय करतेस ? हंसतेस खिदळतेस काय ? थोडेंसे वयाला आणि ज्ञानाला शोभेल असं वागणं नको का ? मी तिला बाबूच्या घरीं एका दिवस असं पाहिलं. मला वाईट दिसलें, म्हणून मी बोलायला गेलें. तर तिनें त्यावर किती तारांगण केलें म्हणतेस ! ती माझ्यावर उसळली काय ? नी बोलली किती ? मला म्हणाली, " तुम्हांला मला उपदेश करायचा अधिकार काय ? तुम्हांला काय कळतंय ? अशा काय तुम्ही शिकला आहांत ? नी जग तरी पाहिलं आहे ? नवं जग तुम्हीं काय पाहिलें आहे ? लोकांला ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगतांना तुम्ही आपल्याखालीं अंधेर आहे तो मात्र अजीबात विसरतां ! तुम्ही आपल्या बहिणीच्या मृत्यूची वाट पाहात आहांत; ती मरते केव्हां आणि तुम्ही पुनर्विवाह करून याच घरीं मालकीण म्हणून मिरवितां केव्हां ? असें तुम्हांला झालं आहे, असं उभा गांव म्हणत असतो; याची तुम्हांला दादच नसेल जशी कांहीं ? अन् यांत कांहीं तथ्य असल्याखेरीज का कोणी झालं तरी बोलेल ? तुमच्या या साखसुरत वर्तनाबद्दल मी जर बोललें तर तुम्हांला काय वाटेल ? आपल्या पायाखालीं काय जळतय तें पाहायं नी मग दुसऱ्याला बोलावं समजलं का ? "

असं तुझी वहिनी काय हवं तें मला बोलली ! मावशी हें सांगत असतांना संतापानें नुसती थरथर कांपत होती. तिच्या तोंडांतून धड शब्दसुद्धां येत नव्हता ! पवित्र चारित्र्याच्या मावशीबद्दल वहिनीसारख्या शहाण्यासुरत्या स्त्रीनें असले किळसवाणे उद्गार काढावेत नी तेही तिच्या तोंडावर; ही खरोखरच किती लज्जास्पद गोष्ट आहे. मला मावशीची दया आली. मीं तिला शांत केलें. तिच्या डोळ्यांतलें पाणी माझ्या हातांनीं पुसलें. मला त्या वेळीं मनांतल्यामनांत कमळावहिनीचा मनस्वी संताप आला होता. मावशीवर तिनं अशी आग कां पाखडावी ! हेंच कां तिचें शहाणपण ! हीच का घरांतल्या सगळ्या माणसांना सुख देणार ? ही भय्याला तरी कशी काय सुखी करील, ही शंकाच आहे. वहिनीचं लक्षण मला कांहीं ठीक दिसत नाहीं. वेळींच तिला जाणीव दिली पाहिजे. बाबांच्याकडून द्यावी कां आपण ? असाही विचार मनांत आला. शक्यतोंवर आपणच सामोपचारानें सांगावें व संधि कशी केव्हां आणि कुठें आणावी, याबद्दल विचार करूं लागलें.

भय्याला सुद्धां पर्यायानें लिहून चार चांगल्या गोष्टी तिला त्याच्याकडून सुचविण्याचा प्रयत्न करावा असें देखील माझ्या मनांत आलें.

वहिनी नुसतीच फटकळ आणि गर्विष्ठ आहे का? ती जाणून जगांत चालते का न जाणून? तिच्यावर शिक्षणाचा–ज्ञानाचा खरा संस्कार झाला आहे का साराच उथळपणा आहे? आपण तिला कांहीं सांगितलें तर ती ऐकेल का? हें तिचें वर्तन बाबांच्या कानावर घालावें कां? घातलें तर काय परिणाम होईल? लहानाची कळ थोरांत जाऊन कांहींतरी अनर्थ ओढवेल कीं काय? असे वहिनीसंबंधानें माझ्या मनांत नाना विचार येत होते. तिला कसं वागायला हवं आहे? घरांतली मंडळी तिच्याशीं कशी वागली म्हणजे तिला समाधान होईल? हें तिला विचारावें, तिला खरेंच कांहीं 'कार्य' करून दाखवावयाचें असल्यास त्याला कोठें अडथळा येत आहे तो पहावा? आई–बाबा आड येत असतील तर त्यांची आपणच वहिनीच्या वतीनें समजूत घालून वहिनीच्या सत्कार्याचा मार्ग मोकळा करून द्यावा, म्हणजे त्यांना व तिला कोणालाच असला त्रास होणार नाहीं, हें मी मनाशीं ठरवीत होतें. दुसरे दिवशीं वहिनींच्या खोलींत जाऊन तिची गांठ घ्यायची, तिच्याशीं बोलायचें, तिला बोलावयाचें; असा मीं संकल्पच केला होता.

पण त्याच्या अगोदरच मला वहिनी साधारण किती पुढें गेली आहे हें मला प्रत्यक्षच पाहायला मिळालें. तिनें कांहीं मला पाहिलं नाहीं. पण मी तिला मात्र पाहिलं. संध्याकाळीं घरांत कुणी गडीमाणूस नव्हतें, म्हणून आईकरितां थोडीशी फळं आणायला मी मंडईत गेलें असतांना, कुठल्याशा स्त्रियांच्या सभेला म्हणून गेलेली कमळावहिनी मंडईत फळांच्या स्टॉलसमोर उभी आहे; जवळ बाबूराव उभा असून दोघे मिळून फळांचा भाव करीत आहेत! "बाबूरावाबरोबर वहिनी?" मी आपल्याशींच उद्गारलें मला कसेसेंच झालें! मी त्या बाजूला गेलेंच नाहीं. तशींच मागें परतलें? मनांला एकच नवा विचार एकसारखा डिवचूं लागला होता; "या बाष्कळ बाबूरावाबरोबर वहिनी मंडईत का? अरेरे! काय, वहिनी इतकी पुढें गेली आहे!

---

# प्रकरण १३ वें



## संशय नव्हे, खरेंच !

वाईट बातमी सहसा खोटी ठरत नाहीं म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. वहिनींच्या विचित्र वागणुकीबद्दल मला कांहीं तरी चमत्कारिक शंका आली. वैऱ्याला सुचणार नाहींत तसले विचार मनाला सुचूं लागले. " छे: तसें नसेल. मन मूर्ख आहे; त्याला वेड्यावांकड्या कल्पना सुचावयाच्याच. त्या मनाला आपणच शहाणपण शिकवून त्याला चांगलं पाहावयाला लावलं पाहिजे. माहेरीं श्रीमंतींत वाढलेली; शाळा-कॉलेजांत स्वतंत्रपणानें वागलेली; तेव्हां तिच्यांत जरासा स्वच्छंदपणा दिसला तर त्याच्यावर आपण भलताच छाप मारणं अगदीं गैर. " असें मीं स्वतःलाच म्हणून पाहिलं. पण समाधान होईना. मी किती तऱ्हेनें विचार करून पाहिला. पण अंहं ! कशालाच कशाचा मेळ बसेना. शेवटीं कांहीं तरी मनापुढें वाईटच उभें राहूं लागलें.

दुसरे दिवशीं वहिनींच्या अंतरंगांत घुसायचं धाडस करायचं असं मीं ठरवलं. बायकांचं मन बायकांना जास्त लवकर आणि बरोबर कळतं. वहिनी माझ्याशीं बोलली तर आपण, तिच्या विचारांची दिशा हमखास ओळखूं. तिच्या अंतःकरणाचा ठाव खात्रीनें घेऊं शकूं, आणि नंतरच काय तें ठरवूं, असेंही वाटूं लागलें. एका क्षणीं असें वाटे, तर दुसऱ्या क्षणीं दुसरेंच मनांत येई. आपला प्रयत्न म्हणजे कोळसा उगाळीत बसण्यासारखंच नाहीं का होणार ? करायचं काय मग त्या पाठीं लागून ? कालक्षेप व्हायचा, व्यर्थ वैर पदरीं यायचं आणि मनाच्या समाधानाला कुठेंच जागा उरायची नाहीं; असें तरी कां करा ? दृष्टी आड सृष्टि आहे तेंच उत्तम ! संशयावरच मन हेलकावे खात आहे, हेंच बरें ! तेंच सत्य करून कशाला घ्यायला जा ?

आज वहिनी जें मनांत आणील तें चांगलें काम करील. तिला करतां येण्यासारखीं किती तरी कामं आहेत. तिचं शिक्षण झालं आहे. कसा तरी

कालक्षेप करीत बसण्यापेक्षां आणि स्वतःच्या वर्तनानें दुसऱ्याला संशयाला जागा करून देण्यापेक्षां वहिनीनें एखादें लोकोपयुक्त कार्य हातीं घ्यावं तिला पैशांची उणीव तिच्या माहेराकडून जशी पडणार नाहीं, तशी बाबांकडूनही कमी पडणार नाहीं! पण तिच्या हातून कांहीं होण्याचें दिसत मात्र नाहीं. तिच्यासंबंधानें जी माझ्याजवळ बाबूरावानें मुंबईस थाप झोकून दिली ती खरीच थाप. तिच्यांत कांहींच तथ्य नाहीं. हें माझ्या दृष्टोत्पत्तीस चांगलेंच आलें.

ज्यांना कांहीं जगांत करतां येण्यासारखं असतं, त्यांनीं केलें तर तें त्यांना शोभतं; त्यांच्या हातून होतंही. पण बहुधा तसं झालेलं आढळून मात्र येत नाहीं. ज्यांना कांहीं करावं अशी तळमळ असते, ज्यांची धडपड एकसारखी चाललेली असते, त्यांना अनुकूलता मात्र कसलीच नसते. त्यांची तळमळ–धडपड कित्येक वेळां मातीमोल होण्याचा प्रसंग येत असतो. जिथें दांत असतात तिथें चणे नसतात आणि चणे असतात तिथें दांत नसतात, तशांतलीच गत! वहिनीला सर्व प्रकारची अनुकूलता असतां तिला कांहीं चांगलीं कार्यें अंगावर घ्यावींत; त्यांत व्यापृत असावें, असं मनांतही येत नव्हतें, तशी तिला इच्छाच दिसत नव्हती, मी एकंदर मानानें पाहिलें, तेव्हां " खावें, प्यावें, मजा लुटावी, जबाबदारी कशाची नसावी आपली हुकमत दुसऱ्यावर चालावी, आपणावर कुणाचा दाब असूं नये; जग आपल्याकरितां आहे; जगाचें आपण कवडी–दमडी कांहीं लागत नाहीं. आपण ज्याला उत्तम म्हणूं तें उत्तम. आपण जें तुच्छ लेखूं तें तुच्छच!" ही वहिनीची वृत्ति असावी, असें मला वाटूं लागलं. तोच प्रत्यय आमच्या घरांतलि तिच्या वागणुकीनें हलकें हलकें येऊं लागला होता!

मीं वहिनीशीं एकदां दोनदां तसा मोकळेपणानें बोलण्याचा प्रयत्न केला. ती बोलली. पण त्या बोलण्यांत मनमोकळेपणा मुळींच नव्हता. अंतःकरण नव्हतं कीं आपलेपणाचा जिव्हाळा नव्हता! मीही फारशी खोलांत शिरलें नाहीं. काय ओळखायचें तें थोडक्यांत ओळखलें. ' सर घोड्या पाणी खोल म्हटलें; आणि मनाला दुसरीकडे वळविलें.

त्यानंतर् मी मुंबईला जायला निघाले त्या वेळीं वहिनीच्या बद्दल माझं जें कांहीं मत झालें, तें आईजवळ व्यवस्थितपणानें बोलून दाखविलें.

तिच्यापासून कोणत्याही प्रकारच्या सुखाची अपेक्षा किंवा आशा बाळगूं नका! त्यांतच तुम्हांला सुख लागेल; असें सांगायाला मुळींच मागेंपुढें पाहिलें नाहीं.

तसेंच मावशीलाही पण नीट समजावून सांगितलें. वहिनीच्या भानगडींत तूं मुळींच पडत जाऊं नकोस. तिचं नशीब न् ती; काय व्हायचें असेल तें होईल; असं तिला स्पष्ट बजावलं. मी पुण्याला चांगली चारपांच दिवस होतें; त्या अवधींत बाबूराव किंवा त्याची आई आमच्या घरीं मुळींच फिरकली नाहींत. मी घराच्या बाहेर पडलेंच नाहीं. मग मी इथें आलें हें त्यांना कळलं होतं कीं तरी नाहीं कोण जाणें! मी पण त्यांची कुणाची चौकशी केली नाहीं. करायचं काय चौकशी करून?

बाबांच्या जवळ वहिनींच्याबद्दल बोलावें असं मनांत आलं, पण धीरच होईना. बाबा आपण होऊन कांहीं तरी बोलतील असें वाटलें; पण तेंही लटकें ठरलें. बाबा कांहींच बोलले नाहींत. तरी ते सूनबाईच्या संबंधानें विशेष प्रसन्न असे मुळींच दिसले नाहींत. ते बहुतेक कार्यव्यापृत असत. पण तितक्यांतून त्यांची सूक्ष्म नजर चोंहीकडे असावयाचीच. त्याप्रमाणें वहिनींच्या वागण्यावरही असलीच पाहिजे. पण तशी पट्कन दिसून मात्र येत नसे. आई मधून मधून सूनबाईसंबंधी तक्रारी करी; पण बाबा तिलाच समजुतीच्या गोष्टी सांगून थांबवीत. सूनबाईच्या वाटेस जात नसत. असें आईकडून मला कळलें.

इतकें खरें कीं, भय्या विलायतेला गेल्यापासून घरांतलें वातावरण प्रसन्न नव्हतें. कुणाचीं अंतःकरणें प्रफुल्लीत नव्हतीं. कुणाला समाधान—सौख्य नव्हतें. " आपण मरायच्या आंत भय्या येऊन भेटला तर बरं. म्हणजे माझीं मागें आशा राहणार नाहीं; मग केव्हांही मृत्यु मला न्यायला येऊं दे. " असें वरचेवर म्हणत आई मृत्यूची वाट पाहात होती. मावशी घरांतल्या कामांत अष्टौप्रहर व्यापलेली होती. " आहे जिवात्म तोंवर केलं पाहिजे. कां लोकांकरितां करायचं आहे?" असं ती म्हणत असे. बाबा कांहीं बोलत नसत; पण एकंदरींत त्यांच्याकडे पाहिलें म्हणजे असें मनांत येत होतें कीं, " भय्या एकदां विलायतेहून आला म्हणजे हलके हलके प्रपंचभार त्याच्यावर टाकून आपण विश्रांति घ्यायला लागावें. आपल्याला

विश्रांतीची आतां अत्यंत आवश्यकता आहे!" म्हणून प्रति दिवशीं भय्याच्या वाटेकडे डोळे लावून आहेत; आणि वहिनी?—अलम् दुनिया वहिनीच्या खिजगणतींत नव्हती! सूर्य उगवतो आहे केव्हां आणि मावळत असतो केव्हां, हें तरी तिला कळत होतं कीं नाहीं तिचं तिला ठाऊक. दोन्ही वेळां मावशीनें तिचं जेवायचं ताट वाढलं म्हणजे कुणी तरी तिला हांक मारायची तेव्हां तिनें खालीं माडीवरून जेवणापुरतं यायचं. वाटेल तितका वेळ झोंपून रहायचं. किती वेळ लुगडीं पातळें बदलण्यांत, केसांचे सोपस्कार करण्यांत घालवायचा. जेव्हां पहावं तेव्हां आपल्या शरिराचे चोंजले, स्वतःचें कौतुक करण्यांत गुंतलेलं असायचं केव्हां पुस्तक घेऊन वाचीत पडायचं, तर कधीं उठून कुठें तरी बाहेर जायचं!

घरी बाबा असतील तेव्हां इकडून तिकडून इकडे उगीचच करीत असायचें. हेतु हाच कीं, बाबांना आपण कांहीं तरी कामांतच आहोंत असं दिसावं. अजूनपर्यंत बाह्यतः तरी बाबांच्या समोर वहिनी नरमाईनें वागतांना दिसत होती. मग त्याचं कारण कांहींही असो.

वहिनीचा सगळा रागरंग पाहिला. मनाशीं काय खूणगांठ बांधायची ती बांधली. देवा, माझ्या मनींचा दुष्ट संशय खोटा कर. माझ्या भय्याच्या संसारसुखाचा उन्हाळा करूं नकोस! असे अत्यंत विलक्षण प्रार्थनेचे उद्गार परमेश्वराला उद्देशून करावेसें वाटूं लागलें होतें. आईला पुन्हां पुनः समजावून सांगून मी मुंबईला गेलें.

त्यानंतर कांहीं आठवडे तसेच गेले. आईच्या पत्रांतून विशेष कांहीं येत नव्हतें. मींही त्याच त्याच गोष्टींची पृच्छा करीत नव्हतें. आईला बरें वाटेल अशाच गोष्टी लिही. तिला धीर देई. वहिनीच्याबद्दल कांहीं तरी भय्याला लिहावें, असें राहून राहून मनांत येई. पण लिहावयाला बसलें म्हणजे काय लिहूं आणि कसें लिहूं? असें होऊन जाई. अखेर दुसरेंच कांहीं तरी लिही. तो विषय तसाच मागें राही. पोस्टांत पत्र टाकल्यावर मग वाटे, "बरं झालं कांहीं नाहीं लिहिलें तें! तो तिकडे परदेशीं अभ्यासाला गेला आहे. त्याच्या मनाची स्वस्थता ढळायला, अभ्यासावरचं चित्त उडायला फुकट कारण व्हायचं. त्याचा तो आला म्हणजे चट् वहिनी ताळयावर येईल. त्याच्यापुढें काय करणार आहे ती? तेव्हां केलं हें ठीकच केलें." पण

केव्हां तरी वाटे, " नाहीं, पण लिहावयालाच पाहिजे. त्यानें तिकडून खरमरीत लिहिलं म्हणजे तरी वहिनी आजारी आईच्याकडे थोडी वळून पाहूं लागेल. नवऱ्याच्या शब्दाकरितां तरी आईच्या सेवेला लागेल. " पण तेंही शेवटीं तितकेंच राही !

अशाच स्थितींत दिवसामागून दिवस चालले होते. भय्या विलायतेहून परत यायचे दिवस जवळ जवळ येत चालले होते; तर इकडचे विलायतेला जायचे दिवस जवळ येत चालले होते. आमच्या त्या गोष्टी सुरू झाल्या म्हणजे त्याच व्हायाच्या ! भय्याचीं नेहमीं पत्रें यायचीं. त्यांत तिकडची पुष्कळशी माहिती असायची. दिनकर आणि शंकर क्षीरसागर, यांच्या संबंधानें पुष्कळ पुष्कळ मजकूर असायचा. भय्या ज्यांच्या घरीं राहिला होता; त्या घरच्या मंडळींची हकीकत, कुटुंबांतल्या लहानथोरांचीं वर्णनें, त्यांचे स्वभाव, ती मंडळी याच्याशीं कशी वागतात; हा त्यांच्याशीं कसा वागतो; पहिल्यांदा आपण गेलों तेव्हां पहिले कांहीं दिवस आपले कसे गेले ? तिकडची आठवण आपल्याला केव्हां केव्हां कशी होते; मी मूळचा न बोलका पण इथल्या मंडळींनीं आपल्याला कसें बोलकें बनविलें आहे, आपल्याला " Thinker " म्हणून त्या मंडळींनीं कशी, कां पदवी दिली आहे ? त्याबद्दल वारंवार ते माझी मस्करी आणि कौतुक कसें करीत असतात, आपल्याला त्यांनीं गंमतीनें ब्ल्याक ब्यूटी असें कसें नांव दिलें आहे. आपण आपलें दांत साध्या राखुंडीनें घासून स्वच्छ राखीत असतो, त्याचा त्या मंडळींना किती विलक्षण चमत्कार वाटत असतो; त्यांना राखुंडी म्हणजे अजब इन्व्हेन्शन कसें वाटत असते; ती मंडळी मोठ्या उत्साहानें, कळकळीनें, व निरभिमानानें आपल्याला शेणीच्या राखुंडीचा फॉर्म्युला विचारून घेतात; व त्याचा प्रयोग करून एकाद्या बालकापासून वृद्धापर्यंत टूथपॉवडर्स–ब्रश वगैरेंचा त्याग करून स्वतःच्या हातांनीं राखुंडीनें दांत घासण्याचा प्रचंड समारंभ कसा करीत असतात. तें पाहून आपल्याला किती मौज वाटते; त्या मंडळींत चांगलें काय आहे, आपल्यापेक्षां त्यांच्यांत अधिक काय दृष्टीस पडतें; आपल्याकडील त्यांच्यापेक्षां कोणतें श्रेष्ठ वैशिष्ट्य आहे; याबद्दलही भय्या लिहीत असे. मनुष्यस्वभाव कुठें झाला तरी एकच असतो, यांचें प्रत्यंतर त्याला पहायला

मिळालें तर लगेंच त्याच्या पत्रांत अगदीं विचारपूर्वक यायचें. भय्याचीं आतांपर्यंत किती तरी उत्तम उत्तम पत्रं आलीं होतीं. तीं एकत्र करून जरी छापलीं; तरी तें एक सुंदर वाचनीय पुस्तक होईल. मी अजूनही तीं पत्रें केव्हां तरी काढून वाचतें. स्वातंत्र्य आणि साम्राज्य यांचा उपभोग त्या लोकांना मिळत असल्यामुळें स्वाभाविकच ते लोक कसे बेगुमान, उल्हासी, उत्साही आहेत; त्यांच्यांतला सामान्यांतला सामान्य माणूस देखील फुकट कसा जात नाहीं; आणि अगदीं पारतंत्र्यांत-गुलामगिरींत रखडत असल्या-मुळें आमच्यांतले उत्तमोत्तम गुण, माणसें हीं कशीं वांया जाऊं शकतात; याची जाणीव भय्याला कशी होती; व तो त्याकडे कोणत्या दृष्टीनें पहात असे, हें त्याच्या त्या वेळच्या पत्रावरून दिसून येत असे.

पाश्चात्यांच्या कोणत्या गुणांचे आमच्याकडे अनुकरण केलें पाहिजे; आणि कोणत्या दुर्गुणांचा त्याग केला पाहिजे आणि आजकाल सर्रास त्याच्या उलट कसें होत आहे, आमच्याकडची मंडळी तिकडच्या भप-क्याला कशी दिपून जातात व त्यांचें वाईटही त्यांना कसें सोन्यासारखें दिसूं लागतें, त्यांचेंच तेवढें हटकून अनुकरण करून आपला नाश कर-ण्याची तयारी आपणच कशी करीत असतात; याबद्दलची भय्याला चांग-लीच जाणीव होती.

भय्याचें पत्र आलें म्हणजे आम्हीं दोघांनीं मिळून रात्रीं वाचावें. त्या-वर खूप चर्चा करावी. मजा लुटावी. केव्हां भय्याला अडाण्यांत तर केव्हां शहाण्यांत काढावें व आपला आनंद वाढीस लावावा. असो.

भय्या विलायतेंत इतक्या आनंदांत, मजेंत, सुखांत असतांना, त्याला इकडून कांहीं तरी लिहून त्याच्या मनाचा विरस कसा आणि कुणी करायचा? एकादें वेळीं हट्टानें मी कांहीं लिहायला प्रवृत्त झालें, तर तिकडून रागानें मला थांबवावयाचें होई ! अर्थातच मी स्वस्थ राहीं.

असें चालू असतां आतां आमचे भय्याच्या येण्याच्या वाटेकडे डोळे लागले होते. केव्हां तरी आईच्या पत्रांतही मधून येई कीं 'भय्या लव-करच येणार या कल्पनेनेंच मला थोडें थोडें बरें वाटूं लागलें आहे. चांगली हुशारी वाटूं लागली आहे. देव दया करील तर मी लवकरच पहिल्या-सारखी खडखडीत बरी होऊन तुम्हां मुलांत पुष्कळ दिवस राहीन ! अशा

वेळीं मला खूप आनंद होई. मी आनंदांत दिसलें म्हणजे मला म्हणायचें होई " कां ? आज आनंदांतशी दिसते आहेस ? भय्या येणार या कल्पनेचा आहे वाटतं ? "

" होयच मुळीं ! "

" अन् मी जाणार आहें त्याबद्दल ? "

" इश्श !– "

" इश्श काय ? मी विलायतेला जाणार म्हणून तुला दुःख होणार कां आनंद ? "

" हें काय विचारणं ! जायचं व्हायचं म्हणून आनंद होईल–यायचं त्यावेळीं येणार म्हणून आनंद होईल ! "

" अरे वा: ! बरीच कीं आहेस ! "

अशी कांहीं तरी बोलण्याची सुरवात होई. बोलण्यावरून बोलणें निघून आमच्या वहिनीबद्दल विषय निघे. मी कांहीं तरी बोललें म्हणजे तिकडे तसलं आवडतही नसे आणि खपतही नसे. म्हणायचं होई कीं " तूं आपल्या वहिनीला कांहीं बोल लावूं नकोस. भय्यानें तिला विलायतेला नेली नाहीं म्हणून ती रागावली–चमत्कारिक वागूं लागली. तर त्यांत बोल काय लावायचा ? माणसाच्या मनासारखं झालं नाहीं म्हणजे राग यायचाच ! उद्यां मी विलायतेला निघालों; त्यावेळीं तूं येणार म्हणालीस आणि मी तें नाकारलं, म्हणजे तूंही आपल्या वहिनीप्रमाणें रागावशील, तिच्याप्रमाणेंच तूंही चमत्कारिकरीतीनं वागशील कीं नाहीं बोल ? "

" इश्श ! कांहीं तरीच ! मी नाहीं रागावणार ! "

" कशावरून ? "

" अन् रागावलें तरी वहिनीसारखे वेडेचार नाहीं करीत सुटणार ! "

" तिनें काय केलें ? "

" घरच्या मंडळींशीं धुसपूस !–शेजाऱ्याशीं संगनमत-बाबूरावाशीं वहिनी बोलते, मला नाहीं आवडत !— "

" बाबूरावाशीं बोलते, त्यांत काय बिघडलें ? तो इथं येतो; त्याच्याशीं तूं नाहीं का बोलत ? तूं त्याच्याशीं बोललेलं बिघडत नाहीं आणि तुझी वहिनी बोलली तर मात्र बिघडतें, हें तुझें बोलणें मोठं और आहे ! "

" म्हणजे काय ?– माझी गोष्ट वेगळी ! आमचा लहानपणापासून परिचय आहे !—"

" तसाच त्या दोघांचाही कॉलेजांतला परिचय आहे ! दोघेही सोशल-रीतीनें वागतात. त्यांत तुला वाईट काय दिसतं कळत नाहीं मला ! "

" तें कांहीं असलें तरी " मी चिडल्यासारखी होऊन म्हणे "कांहीं म्हटलं तरी वहिनीचं वागणं मला तर आवडत नाहींच, पण भय्याला देखील मुळींच आवडायचं नाहीं, हें सांगतें ! "

" वा: ! भय्याला तर सगळयापेक्षां जास्त आवडेल. तुला माहीत नाहीं म्हणूनच तुला अडाणी-अर्धवट-म्हणायचं तें ! भय्या आतां विलायतेहून तिथल्या सुधारणा घेऊन येणार–तिथं स्त्री-पुरुषांनीं समानतेनं मिळून मिसळून वागावं हें तर अगदीं सर्वसामान्य होऊन बसलं आहे ! तें भय्याला कसं आवडणार नाहीं ! यापेक्षां तुमची तयारी जास्त नाहीं; तुम्ही अजून इतके मागासलेले पाहून मात्र त्याला आवडणार नाहीं ! "

मग मात्र माझा निरुपाय होई. मला पटत नसलें तरी मी गप्प मात्र बसें.

असें आमचें नेहमीं चाले. वहिनींचा विषय निघाला कीं, वहिनींचा कड तिकडून घ्यायचा. बाबूरावाबद्दल बोलणं निघालं तर त्याच्या वतीनें कधी फारसं बोलायचं नाहीं, तरी त्याच्या विरुद्धही कधीं बोलायचं नाहीं; असें तिकडे नेहमीं बोलायचं धोरण असायचं.

सुमार सुटून मी वहिनीबद्दल एखादे वेळीं फारच बोलूं लागलें म्हणजे मला निरुत्तर करण्याकरितां म्हणायचं; " पुरे कर ! जगांत कोणती नणंद आपल्या भावजईबद्दल बरं बोलली आहे. तर तूंच आपल्या भावजयीबद्दल बोलशील ? असं कांहीं भय्याजवळ बोलायला लागलीस तर भय्या तुझ्या वहिनीला बोलायच्या ऐवजीं तुझाच राग-राग करायला लागेल, हें ध्यानांत ठेवा ! "

मग त्यावर मी काय बोलणार ?

मी मुंबईला आल्यास बरेच दिवस होऊन गेले होते. या अवकशांत

बाबूराव कांहा आमच्याकडे आला नव्हता. मग काय झालें होतें कुणास ठाऊक !

मध्यंतरीं एक दिवस तिकडून संध्याकाळीं घरीं यायचं झालं. नी मला विचारलं—

" बाबूराव काल आज इतक्यांत घरीं आला होता का ? "

" नाहीं ! कां ? इथं आला आहे कीं काय ?–"

" होय ! कालही त्याला मीं पाहिला. आजही दिसला ! "

" केव्हां ? कुठें ?–"

" काल मोटारींत कोणी तरी बोहरी व्यापारी बरोबर होता–आणि आज–आतां संध्याकाळीं मी ममधून येत असतांना–" बोलणं तितकंच मध्यें थांबलं—

" त्या वेळीं बाबूराव कुठें दिसला ? इकडेच येत होता का ? " मीं विचारलें.

" कांहीं माहीत नाहीं. पण इकडे तो न येईल तर बरें ! " स्वतःशींच अर्धवट पुटपुटणं झालं !

" म्हणजे ?–"

" मधाशीं 'लंडन हॉटेलां'तून राजरोस बाहेर पडतांना तो मला दिसला. लेकाचा रेसही खेळतो, दारूही पितो, आणखी काय काय करतो आणि काय काय नाहीं, देव जाणें ! पण लेकाचा इतके ढंग करायला पैसा तरी कुठला आणतो ? त्याच्या घरीं तर–" पण पुढें कांहींच बोलायचं झालं नाहीं. कपडे काढून बाहेर गॅलरींत जाऊन उगीच उभं राह्यचं झालं !

त्याच वेळीं " अन् माझ्या कमळावहिनींनं असल्या भंपकाशीं सोशलपणा दाखवावा, हें बरं वाटतं का ? " असं विचारायचं माझ्या मनांत आलं. पण मी चटूदिशीं आपली जीभ चावली. मनांत आलेले विचार मनांतच दाबले !

मी पण त्या संबंधानें तिकडच्या जवळ मुळींच कांहीं बोललें नाहीं. त्यांतल्यात्यांत बाबूराव आमच्या घरीं आपोआप यायचा बंद झाला हें मला बरेंच वाटलें. औषधावांचून खोकला गेला असेंच मला वाटलें !

त्याच एका महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत पुण्यास बाबांच्या घरीं अत्यंत अनिष्ट, किळसवाणी गोष्ट घडून आली ! त्या गोष्टीवरून तो संशय नव्हता—तें खरेंच होतें, असें ठरलें. मी ती गोष्ट कशी लिहून दाखवूं अशी मला पंचाईत पडली आहे.

एक दिवस बाबा ऑफिसांतून मध्येंच दुपारीं अचानक घरीं आले. वाटेल तेव्हां बाबा घरीं कधींच यायचे नाहींत. त्यांचा दिवसाचा सारा वेळ अगदीं बांधलेला. उठायचें केव्हां, स्नान, संध्या, जेवण, ईश्वराराधन, कपडे करायचा वेळ, ऑफिसला जायचें केव्हां, परत केव्हां यायचं, आईची चौकशी केव्हां करायची, बाहेर केव्हां पडायच, हें सर्व ठरून गेलेलें असे. त्यांत विशेष कारणाशिवाय उगाचच बदल कधीं व्हायचा नाहीं, हें घरां-तील सर्व मंडळींना पूर्ण माहीत असे. बाबा एखादे वेळीं अभिमानानें मित्रा-दिकांजवळ म्हणत, " मी या वयांत इतका उद्योग कसा करतो आणि अशी तब्बेत कशी राहिली आहे, याबद्दल तुम्हां लोकांना आश्चर्य वाटतें. पण हें सर्व माझ्या नियमीतपणाचें गोड फळ मी चाखतों आहें. "

आईला औषध घेतल्यामुळें नुकतीच गुंगी आली होती. मावशी घरां-तलं कामधाम आटपून, उष्टींखरकटीं उरकून, झांकापाक आवरून, स्वयं-पाकघरांतच खिडक्या लावून जरासा काळोख करून लुगड्याच्या चौघडी-वर गारशा लवंडल्या होत्या. त्यांचाही डोळा लागला होता. बहुतेक दररोज असेंच असे. या वेळींच बाबा ऑफिसांतून आले. त्यांचें ऑफिसांत एका-एकीं विलक्षण डोकें दुखायला लागलें. आंगांत सडकून ताप भरला. म्हणून तसेच उठून टांगा करून घरीं आले. घरीं कोणालाच कल्पना नव्हती.

घरीं आले त्या वेळीं माडीवर हार्मोनियम वाजत होती. गाणें चालू होतें; हार्मोनियम कोण वाजवीत आहे ? गात कोण आहे ? आणि अशा भलत्या वेळीं ? माडीवर हा धुडगूस कोण घालीत आहे ? अगोदर बाबांचं डोकं दुखत होतें—ताप फणफणलेला होता—त्यांत हा ताप ! मनाच्या—इच्छेच्या—जनरीतीच्या विरुद्ध ! बाबांना त्याचा फारच त्रास आला. ते अधिकच संतापले. बंद करायला सांगायला वर जा म्हणून सांगायलाही जवळपास कुणी नव्हतें. बाबांनीं आंगांतले कपडे कसेबसे काढले. सोप्या-वरच्या बाजूच्या त्यांच्या खोलींत गेले. पलंगावरची चादर आपणच तशा

स्थितींत झटकली. तिथें तसेच ते आडवे व्हायचे. पण वरची हार्मोनियम किंवा गाणें यापैकीं कांहींच बंद होईना. तें आणखी किती वेळ चालणार होतें; हें तरी कुणाला माहीत? आणि तें थांबल्याशिवाय तर सोयच नव्हती. म्हणून बाबा उठले, तसेच स्वत: माडीवर गेले.

वर जाऊन पहातात तों वहिनीच्या खोलीचें दार लावलेलें आणि आंत वादन–गायनाचा जलसा चाललेला!

बाबा दाराजवळ गेले. त्यांनीं दारावर थाप मारली.

आंत त्यांची थाप कुणालाच ऐकायला गेली नाहीं. गाण्याच्या आणि वादनाच्या भरांत–नादांत दारावरची हलक्यानें मारलेली थाप कुणाला ऐकायला जाणार?––

आंत गायन–वादन चालूच होतें!

बाबांनीं आणखी पहिल्यापेक्षां जोरानें दार ठोठावलें. कुणी तरी दार ठोठावीत असल्याची जाणीव आंत झाली. हार्मोनियम आणि गाणीं थांबलीं.

"कोण आहे बाहेर?" आंतून शब्द आले.

बाबा बोलले नाहींत. नुसतेच त्यांनीं दारावर टक् टक् केलें!

"कोण आहे! बोलतां येत नाहीं का?" वहिनींचा तो आवाज होता.

बाबांना त्या स्थितींत बोलवत नव्हतें म्हणा किंवा संतापानें त्यांना बोलण्याची इच्छा नव्हती म्हणून म्हणा, याही वेळीं बाबा बोलले नाहींत. आणखी दारावर जोरानें–संतापानें त्यांनीं आपल्या हाताचीं बोटें वाजविलीं.

"काय त्रास आहे हा!"

"कोण पाजीपणा करतय बाहेर?

"शूः! चीप!"

"कां?"

"मावशीबाई आहे वाटतं?–मग आतां?–"

"चीप म्हणून सांगितलं ना?"

"ती कशी आली या वेळींच वर?"

"चूप बसायला काय घ्याल?–मी लावतें सरळ वाटेला–"

"तसंच झालं पाहिजे–नाहींतर—"

" कोण आहे बाहेर ? मावशीबाई, काय काम आहे !–बाहेरून सांगा! मला ऐकायला येतंय !—"

दारावर टक्टक् !

" शर्थ झाली बाई ! थोडा वेळ मनासारखं वागूं द्यायचं नाहीं म्हणजे काय ? आणखी बोललं तर चरफड येते मग !"

तरी दारावर थापच !

" सांगेनं ना, काय काम आहे तें सांगितल्याखेरीज दार उघडीत नाहीं म्हणून ?" वहिनी आंतून खेंकसली !

बाबांच्या शांतपणाची सीमा सुटली. आंतलीं प्रश्नोत्तरें त्यांना स्पष्ट–स्पष्ट ऐकायला आलीं होतीं. आतां बोलल्याशिवाय सोयच नाहीं असें दिसून आल्यावर–

" दार उघडल्यावर आपोआपच कळेल काय आहे तें !" दारावरच्या टक्टक्च्या ऐवजीं बाबांचें कठोर वाक्य वहिनींच्या कानीं घुसलें !–

" अगबाई ! मामंजी ग बाई मामंजी !" भयचकित उद्गार वहिनींच्या तोंडातून एकदम बाहेर आला ! आंत क्षणमात्र विलक्षण स्तब्धता पसरली. पण आतां दार उघडल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें !

बाबांना आपल्या सूनबाईला एवढेंच सांगावयाचें होतें कीं, " ही वेळ गाण्याची–वाजविण्याची नव्हे. त्यांत आपली प्रकृती या वेळीं नीट नाहीं. आपल्याला कसलाही गोंगाट–त्रास नको आहे ! बाकी कांहीं ते विशेष बोलणार नव्हते.

वहिनीनें खोलीच्या दाराची कापऱ्या हातानें कशी तरी कडी काढली. दार उघडलें गेलें. बाबांना आंत काय दिसलें ?

बाबांची कल्पना होती कीं सूनबाई आपल्या मैत्रीणींना आणून धांगडधींगा घालीत असतील. पण तसें नव्हतें. खरा प्रकार निराळा होता !

वहिनी आणि तिच्या खोलींत पेटी वाजवून तिच्या गाण्याची साथ करणारा आमचा शेजारी–कर्मचांडाळ–तो भंपक बाबूराव होता !

बाबांचे शब्द त्याच्या कानीं जातांच तो अगोदरच गलित झाला होता. त्याला जागचे हालतांच येत नव्हतें ! अंगांतला पातळ-शुभ्र मलमलीचा सद्रा अंगाला दरदरून घाम येऊन ओलाचिंब होऊन अंगाला चिकटून

बसला होता. बाबांना समोर पहातांच त्याचें तोंड काळेंठिक्कर पडलें. दृष्टि खाली वळली ! पापाला शक्ति नसते. बळ नसतें म्हणतात, तें असेंच ! वहिनींचीही अवस्था जवळ जवळ तशीच झाली. ती अधोमूख झाली. तिचें तोंड खरकन उतरलें ! नूर उतरला. ती दाराला कशी तरी टेकून उभी राहिली होती ! तिघांची नजरानजर झाली ! बाबांच्या अंगाचा तिळपापड उडाला ! त्यांच्या संतापाचा अतिरेक झाला ! क्षणभर आपण कुठें आहोंत, आणि काय समोर पाहात आहोंत, याची देखील विस्मृति पडल्यासारखें त्यांना झालें ! त्यांना तें सहन झालें नाहीं. तितक्यांत त्यांना मूर्च्छा आली. कसेंबसें त्यांनीं जवळच्या भींतिवर डोकें टेकलें. पण त्यांनीं विलक्षण आत्मसंयमन करून स्वतःला सावरलें. त्यांनीं पुन्हां बाबूरावाकडे पाहिलें—

" मी–मी–च–प–त " बोबडी वळत बाबूराव मूर्खासारखें समर्थन करूं पाहात होता. बाबांनीं त्याला बोलूं दिलें नाहीं. आपणही बोलले नाहींत. मुकाट्यानें पण डोळे रोखून त्याच्याकडे पहात त्यांनीं त्याला जिन्याकडे बोट केलें ! एखाद्या निर्जीव बाहुल्याप्रमाणें तो उठून जिन्याकडे वळला–तेथून–वाड्यांतून बाहेर पडला.

बाबांना सूनबाईकडे पाहाण्याचें धाडस झालें नाहीं !

हॉर्मोनियम व गाणें बंद करा. हें सांगण्याची गरजच उरली नव्हती ! बाबांच्या हृदयावर या दृश्याचा भयंकर धक्का बसला !

हें असें किती दिवस चाललें होतें कुणास ठाऊक. केवढा अधःपात ! बाबांना वाटलें असेल " भय्याच्या संसारसुखाची ही राखरांगोळी आहे ! त्याच्या प्रेमजीवनाला आग लागली आहे ! ब्रह्मांड पेटलें आहे ! आतां माझ्या भय्याच्या आयुष्याचें कसें होणार !–" एक का दोन, का हजार, का लाख, किती विचार बाबांच्या मनांत आले असतील. त्यांनीं ते सहन कसे केले असतील ? त्यांच्या डोळ्यापुढें सर्व अंधारच–अंधार झाला ! ते तशा अवस्थेंत आपल्या बिछान्यावर कसे येऊन पडले, हें त्यांनाही कळलें नव्हतें !

पण बोलायचें कोणाजवळ ? भर दिवसां-दुपारीं परकी पुरुष खोलींत. आंतून कडी लावलेली हें वहिनीला माहीत–बाबांना माहीत कीं बाबूरा-

वाला माहित ! झांकली मूठ सव्वा लाखाची ! जन्मांत कधीं माहित नव्हत्या, अशा अनंत मानसिक वेदना बाबा सहन करीत होते. आंतल्या आंत कढत होते. आपल्या घराण्याच्या अब्रूवर पांघरूण घालीत होते—

---

## प्रकरण १४ वें.



### बाबूरावचें काय झालें !

महासागराच्या उदरीं वडवानल असतो, परंतु त्याचें जगाला शांत स्वरूप दिसत असतें; तशीच गोष्ट आमच्या बाबांची होती. आपल्या घरीं काय झालें आहे आणि काय नाहीं, याची वाच्यता कुणाजवळच त्यांनीं चुकूनदेखील केली नाहीं. आईजवळदेखील त्यांनीं त्या गोष्टीची परिस्फुटता केली नाहीं. करून उपयोग काय ? उलट आईच्या प्रकृतीवर विपरीतच परिणाम व्हायचा ! बाबूरावला त्या परिस्थितींत बाबांना चार श्रीमुखांत भडकवितां आलें असतें. त्याला सरकारी कचाट्यांत अडकावून दिला असतां, त्याला मरेपर्यंत मारही देतां आला असता. काय वाटेल तें करतां आलें असतें; असा तो गुन्हेगार म्हणूनच बाबांना मिळाला होता. पण कांहीं केलें असतें तरी त्याचा परिणाम आपल्या घराण्याच्या अब्रूचा डंका जगांत वाजण्यांतच त्याचें पर्यवसान झालें असतें. त्या कारणानें त्याला तसेंच सोडून दिलें. पुन्हां घराचा उंबरा चढण्याची त्याची प्राज्ञा नव्हती. त्याला तसें बजावण्याचें प्रयोजनही नव्हतें. तशी कोणाला न सांगतां—कळवतां त्याच्या रावत्यावर त्यांनीं सक्त नजरही ठेविली होती.

वहिनींच्या बाबतींत ताबडतोब काय करावें, याबद्दल त्यांना विचारच

पडला होता. ते वहिनीला कांहीं बोलले नाहींत, आणि बोलण्याची तरी काय गरज राहिली होती ? शहाण्याला शब्दाचा मार म्हणतात. पण तोही बाबांनीं दिला नाहीं. बाबांच्या मुक्या मारानेंच वहिनीवर अधिक परिणाम होणार होता. तूर्तास वहिनी आपल्या डोळ्यासमोर, आपल्या घरांत, गांवांत देखील नको, असें बाबांना वाटणें अगदीं साहजिक होतें. काय करावें, असा विचार त्यांच्या मनांत चालू होता, तोंच अगदीं सांगून पाठविल्या-प्रमाणेंच एक दिवस वहिनीच्या माहेरचें बोलावणें वहिनीला आलें. एरव्हीं अशा साध्या बोलावण्यानें कदाचित् पाठविलें असतें कीं नाहीं याची शंकाच आहे; आणि वहिनीही गेली नसती. पण ही वेळच अशी चम-त्कारिक होती. साध्या बोलावण्याला मान्यता मिळाली. वहिनीच्या माहेरचें नुसतें पत्रच आलें होतें. तेवढ्यावर तिला माहेरीं पाठवायचें ठरलें. तीही निमूट तयार झाली. दुसऱ्याच दिवशींच्या मेलनें वहिनी माहेरीं गेली.

त्यांतल्या त्यांत बाबांना हायसें झालें. वहिनीला वाटेल तितके बाबा बोलले असते, तिच्या अंगाची चामडी लोळवली असती, तिला उपाशी तापाशी ठेवून तिचे हालहाल केले असते, तर त्यांना कोण बोललें असतें ? त्यांना कोणी दोष दिला असता ? इतका अक्षम्य तिचा अपराध होता, तो बाबांच्या दृष्टोत्पत्तीस आला होता ! बाबांच्या डोक्याला भिरभिरी आली नसेल असें नाहीं; वहिनीला काय करूं आणि काय नको असें त्यांना झालें नसेल असेंही नाहीं; पण बाबांनीं त्यांपैकीं कांहीं एक केलें नाहीं. एकाद्या महान तपस्व्याप्रमाणें आपलें अत्यंत प्रयासानें मन:संयमन केलें. वहिनीला क्षमाच दाखविली. जगांत प्रत्येक अपराधाला शासन हें आहेच ! प्रत्येक रोगाला औषध हें आहेच. सर्वाला औषध असतें पण स्वभावाला औषध नसतें म्हणतात. पण विचार केला तर त्यालाही औषध सांपडल्या-शिवाय राहणार नाहींच !

बाबांनीं वहिनीच्या अपराधाला क्षमेचं शासन केलं. तिच्या त्या स्वभा-वाच्या रोगाला क्षमेचं औषध वापरलं होतं !

मनुष्य शिक्षण घेतो पण प्रसंगानेंच त्याला खरें ज्ञान प्राप्त होतें. प्रसंग हाच मनुष्यमात्राचा खरा गुरु आहे. वहिनीला दैवानं त्या प्रसंगांत घातलें. ती शिकलेली होती; पण तिला प्रत्यक्ष ज्ञान देणारा प्रसंग तिच्यावर

गुदरला होता. बाबांनीं आपल्या कल्पनेप्रमाणें क्षमेची मात्रा उगाळली होती. ते त्या दिवसापासून नित्य प्रार्थनेच्या वेळीं आपल्या सुनेला पश्चात्ताप होऊं दे. ती ताळ्यावर येऊं दे. तिचा आणि तिच्या पतीचा संसार सुखाचा करण्याची तिच्यांत नवी शक्ति निर्माण कर! अशीच परमेश्वराजवळ याचना करीत होते!

त्या प्रसंगाचा परिणाम वहिनीवरही झाला नव्हता असें नाही. पाप कां कुठें लपून राहात असतं? तें केव्हां ना केव्हां तरी बाहेर पडतेंच. काळ प्रत्येकाला मनुष्याचीं बरींवाईट कृत्यें हस्तें परहस्तें त्याच्यासमोर आणून ठेवण्याचें कार्य करीत असतो. त्यापासून बऱ्यावाईटाचे धडे घ्यायला सांगतच असतो. कुणी त्याचा उपयोग करून घेतात. कुणी घेत नाहींत! वहिनी माहेरीं गेली खरी! पण तिच्या जिवाला चैन होतें काय? कुठून असणार? तिचे अपराध तिला एकसारखे सतावीत होते. तिच्या मनाचें सुख संपलं होतं. चित्ताची शांतता ढळली होती. ती जितका विचार करीत होती, तितका तितका तिच्यापुढें भावी भेसूर काळच विक्राळ स्वरूप घेऊन उभा राहात होता! "भय्याला हें कळलें तर परिणाम काय होईल?" हा सात शब्दांच्या नांवाचा सैतान माहेरीं वहिनीला एकसारखा सळो कीं पळो करून सोडीत नसेल काय?

"आपलें दुर्वर्तन विलायतेहून आल्यावर आपल्या पतीला कळेल काय? मामंजी कळवितील काय? मग काय होईल? मला छळायचं होईल, मला टाकायचं होईल; दुसरं लगीन करून नवा संसार थाटायचं होईल? मी नाथ असून अनाथ होईन! मला जगांत उजळ माथ्यानें हिंडतां येणार नाहीं! मला कुणी जवळ येऊं देणार नाहीं. मग माझें काय होईल? मी शरण गेलें तर? माझा अपराध कबूल केला तर? अपराध कबूल करायचा? अन् तें माझ्याकडून कसें होईल? अपराध कबूल करणं सोपी का गोष्ट आहे? पण अपराध कबूल केला तरी पतीनं क्षमा केली पाहिजे ना? त्यांना पर्वा वाटली पाहिजे ना? त्यांना दया आली पाहिजे ना? नाहीं—नाहीं—नाहीं. मला क्षमा व्हायची नाहीं; पर्वा वाटायची नाहीं; दया मिळायची नाहीं! पण त्यांनीं क्षमा कां करावी? पर्वा कां बाळगावी? दया कां दाखवावी?—मंग माझं व्हायचं कसं? मी काय करूं? कोणत्या तोंडानं

त्यांच्यासमोर जाऊं ?...हे असे विचार वहिनींना सतावीत असतील; तिला पश्चात्ताप करायला लावीत असतील; पवित्र-शुद्ध व्हायचा मार्ग सुचवीत असतील का दुसरे कसले येत असतील ! पण हे तिच्याशिवाय दुसऱ्या कोणाला कसे कळणार ?

वहिनी माहेरीं गेली इतकं बरीक खरं !

बाबांचे गंभीरपणानें नित्याचे उद्योग चालू झाले !

आम्हांला यापैकीं कांहीं कळलें नव्हतें. कळणें शक्यच नव्हतें. आठवड्याला आईचें पत्र यायचें; त्या एका पत्रांत आलें कीं, "सूनबाईला तिच्या माहेरचं बोलावणं आलं. ती माहेरीं गेली आहे. भय्या यायच्या सुमाराला परत येईल." तेव्हां तेवढें कळलं कीं वहिनी माहेरीं निघून गेली. पण कां गेली, कशी गेली, कोणत्या परिस्थितींत गेली; यापैकीं कांहींच पत्रांत नव्हतें. मलाही त्याची चौकशी करण्याची आवश्यकता नव्हती.

मी देहानें मुंबईस असलें तरी मनानें पुण्यास माझ्या माहेरींच बहुतेक असे. शरीर मुंबईस हिंडे फिरे. मन पुण्यास माहेरीं हिंडे फिरे. मला वाटतं सगळ्या सासुरवाशिनींचें बहुतेक असेंच असेल. माहेरची आठवण निघाली कीं आनंद व्हावा. तिथलीं मायेचीं माणसं आठवावीत; त्यांच्याशीं आपण बोलतों आहोंत. तीं आपल्याशीं बोलताहेत; एकमेकांची थट्टामस्करी चालली आहे, असा भास व्हावा. कल्पनेचीं किती हीं सुखं असतात ! वहिनी आपल्या माहेरच्या माणसांत दंग झाली असेल असें कल्पनाचित्र डोळ्यापुढें उभं राहिलं. त्याचबरोबर मी मनानें माहेरीं दाखल झालें. बाबा ऑफिसांत जायच्या तयारींत असतील. आई जेवून बसली असेल किंवा जेवत असेल. मावशी आपलें वाढून घेण्याच्या उद्योगांत असेल—वहिनी माहेरीं गेली—आणि—आणि--बाबूराव—

आवडणाऱ्या गोष्टींबरोबर नावडणाऱ्या गोष्टीही मनाला आठवूं लागतात. वहिनींची आठवण होण्याबरोबर त्या आठवणीलाच चिकटून बाबूरावाची आठवण झाली. बाबूराव आणि वहिनी मंडईंत फळांच्या स्टॉलवर फळें घेण्यांत गुंतल्याचें चित्रही डोळ्यापुढें आलें. मनाला कसेंसेंच झालें. मी डोळे मिटण्याचा प्रयत्न केला. विचार बदलण्याची शिकस्त केली. पण यश येईना. तींच तींच चित्रें डोळ्यापुढें नाचूं लागलीं. त्याच त्याच कल्पना

आठवूं लागल्या. वहिनी तशीच वहावत चालली असेल का ? त्या मांगाला अजून तिनें ओळखलें नसेल का ? वहिनीला कुणाची भीति वाटत नसेल का ? जगाची नाहीं तर मनाची, मनाची नाहीं तर जनाची कदर वहिनीला वाटत नसेल का ? बाबूराव आतांशा इकडे कां येत नाहीं ? माझ्यापेक्षां वहिनीचं ढिसूळ मन बाबूरावाला आढळल्यामुळेंच बाबूरावाचा माझ्या मागचा ससेमिरा कमी झाला असेल काय ? मग बाबूराव त्यानंतर इकडे कसा येत होता ? आतां कां येत नाहीं ? आतां तो काय करीत असेल ! न जाणों, बाबांच्या नजरेला जर त्यांचे चाळे आले तर--तर- काय होईल !-- मला कांहीं कल्पनाच होत नसे. माझे विचार तिथेंच थांबत, मन गांगरून जाई.

असेंच एक दिवस कशावरून तरी बाबूरावची आठवण झाली होती. वहिनी माहेरीं गेली आहे. तेव्हां अनायासेंच अहित परिणामी वहिनीच्या वर्तनाला आतां निराळें वळण लागायला हें एक बरें झालें; असेंच मनांत येऊन जरा बरें वाटलें. सापाचें नांव निघालें कीं तो कुठेंतरी जवळपास निघालेला असतो, असें कांहींजण म्हणतात, तसेंच आज झालें. बाबूरावासंबंधानें माझ्या मनांत विचार यायला आणि बाहेरून येऊन स्वारीनें माझ्यापुढें दोनतीन पत्रें आणून टाकायला एक गांठ पडली:—

मीं स्वयंपाकांत होतें. समोर टाकलेलीं पत्रें पाहून मीं किंचित् हंसून म्हटलें:—“ हें काय ? हीं दोनतीन पत्रें कुणाचीं ? ”

“ तुझ्या माहेरचींच आहेत तीं ! ”

“ तीनही ? ”

“ हो ! ”

“ इश्श ! तीन पत्रें माहेरचीं कशीं असतील ? कांहीं तरीच !—”

“ पहा म्हणजे समजेल ! ”

मीं जरा घाईनंच पत्रें उचलून घेतलीं. एक नेहमींप्रमाणें आईचं पत्र होतं. दुसरं विलायतचं भय्याचं टपाल. तिसरें पाकीटच होतं. अक्षर अनोळखी म्हणून विशेष उत्सुकतेनं उघडून तें पहिल्यांदा पाहिलं. मला वाटलं होतं तें वहिनीचं पत्र असेल. माहेरला जाऊन राहिल्यावर तिला मला पत्र टाकण्याची सहज लहर लागली असेल. म्हणून टाकलं असेल. तिचं पत्र

म्हणजे माझ्या माहेरचंच पत्र! म्हणून जास्त उत्कंठेनं आईच्या-किंवा भय्याच्या पत्रांच्या अगोदर तें पत्र हातीं घेतलें. आईच्या किंवा भय्याच्या-पेक्षां त्या पत्राबद्दल जास्त प्रेम वाटलं म्हणून नव्हे तर केवळ नवलाईमुळें तें पत्र हातीं घेऊन फोडलें. पण माझी निराशा झाली. पत्र वहिनीचं नसून तें बाबूरावाचें पत्र होतें! खालची सही पाहिली. मी जरा दचकलेंच! पहिलें औत्सुक्य मावळलें. आतां बावरल्यासारखं झालं! मी चमकून वर पाहिलें. स्वारी स्थिर दृष्टीनें माझ्याचकडे पहात होती.

" बाबूरावाचं हें पत्र आहे!—"

" हो—म्हणजे तुझ्या माहेरकडचं ना?"

" वाचायचं का?—"

" आम्हीं वाचलं!—"

" काय आहे त्यांत?—"

" तूं वाच म्हणजे समजेल काय आहे ते!" सांगणें झालें.

खरेंच त्या पत्रांत काय होतें? पत्र तिकडच्या नांवावर होतं. तिकडेच उद्देशून होतं. इकडे पत्र पाठवावयाचें बाबूरावाला कारण काय? इतकं लांब-लचक पत्र पाठविण्याइतका त्याचा इकडच्याशीं लागाबांधा तरी कुठला? एका पळांत हजार विचार मनांत येऊन गेले. धास्तावल्या मनानें मी तें पत्र हातीं घेऊन त्यावरून डोळे फिरवूं लागलें. पत्र पुढीलप्रमाणें होतें:—

श्रीशं वन्दे।

मु॥ ×××××—

ता.—माहे—सन—

" प्रिय मित्र सदाशिवराव, यांसी:—

कृ. शि. सा. न. वि. वि.:—

या पूर्वी कधींच नाहीं, आणि आजच हें माझें अनपेक्षित पत्र पाहून आपणांस बरेंच आश्चर्य वाटेल. परंतु सध्यां माझ्या आयुष्यांत आश्चर्यकारक—त्याही संकटांच्या बाबतींत—अशा बऱ्याच

गोष्टी घडल्या आहेत–घडत आहेत. तेव्हां आपण तितकें आश्चर्य वाटूं देऊं नये.

मी बरेच महिन्यांत भेटलों नाहीं. मुंबईसच आलों नाहीं; तर भेटणार कुठून ? घरच्या परिस्थितीमुळें मी नौकरीच्या शोधांत होतों; हें आपणांस माहीत आहेच. शोधांतों वरील मुक्कामीं एका युरोपियन कॉन्ट्रॅक्टरच्या फर्ममध्यें थोड्या महिन्यांपूर्वी अचानक मला नोकरी मिळाली. माझी छाप फार लवकर येथील मुख्य साहेबावर पडली. माझ्या विलक्षण हुशारीमुळें आणि तरतरीमुळें अत्यल्प काळांत साहेब माझ्यावर महत्त्वाची–जबाबदारीचीं कामें सोपवूं लागला. मलाही यक्षिणीची कांडी फिरल्यासारखें वाटलें. कल्पवृक्ष लाभल्याप्रमाणें वाटूं लागलां. पण सदाशिवराव, कल्पवृक्ष ज्याला लाभेल त्याचें तो चांगलेंही करतो आणि वाईटही करतो; तसेंच प्रस्तुत माझ्या बाबतींत झालें आहे. यक्षिणीची कांडी फिरून मला बरी स्थिती येणार असें वाटतें न वाटतें तोंच वाटलें कीं हा कल्पवृक्ष एखादे वेळीं माझ्यावर संकट तरी कसलं आणणार नाहीं ? दुर्दैवाची आठवण व्हावी आणि तें दत्त म्हणून समोर येऊन उभं रहावं; तसें झालें आहे. आमच्या फर्मचा मुख्य साहेब एकदम विलायतेला गेला. त्याच्या जागीं दुसरा आला. त्यानें आपल्या ऑफिसची तपासणी केली. त्यांत त्याला हिशेबांत–कागदोपत्रीं पैशांचा घोंटाळा दिसून आला. कांहीं रक्कम अफरातफर झाली असावी अशी त्याची समजूत झाली. माझ्या पूर्वीच्या माझ्या जागेवरच्या हॅन्डने काय गफलत केली समजत नाहीं. पूर्वीच्या साहेबांच्या मेहेरबानीनें मला ती जागा मिळाली. मी हिशेबठिशेबाला नवखा माणूस. मी मागीलप्रमाणेंच पुढें काम करीत गेलों. पण तें आलें माझ्या नरड्याशीं. मीच रकमेची अफरातफर केली असावी, अशी नव्या साहेबाची समजूत झाली असून त्यानें माझ्यावर तसा चार्ज ठेवून, माझ्यावर केस देखील दाखल केली आहे. सध्यां मी जामिनावर मोकळा आहें. अफरातफरेची रक्कम कांहीं फारशी नाहीं. पण ती अगोदर भरली पाहिजे. मग

चौकशींत काय निष्पन्न होईल तें निराळें. मी निर्दोषी ठरेन ही माझी खात्री आहे. पण तोंपर्यंत रकमेचा भरणा केलाच पाहिजे. हा माझ्या अब्रूचा-आयुष्याच्या भल्याबुऱ्याचा प्रश्न आहे. पण इतकी रक्कम मी कशी उभी करणार! घरीं कळवलं आहे. माझ्या सर्व स्नेह्यासोबत्यांना लिहिलं आहे. त्याप्रमाणेंच तुम्हांसही अगदीं आपले-पणानें पत्र टाकलें आहे. ही तार समजा व तारेनेंच उलट याव-च्छक्य–जितकी परमेश्वर बुद्धि व सवड देईल तितकी रक्कम–माझ्या वरील वेळेला पाठवा. सध्यां भय्या येथें नाहीं. नाहींतर दुसऱ्या कोणाजवळ–तुमच्याजवळ देखील मागण्याची पाळी आली नसती. त्या एकट्या बहाद्दरानें माझी ही अनीनीची वेळ भागविली असती. सध्यां मी त्याच्याजागीं तुम्हांला समजतों. म्हणूनच तसा विशेषसा संबंध नसतांही हें उघड्या दिलानें पत्र पाठवून तुमच्याकडे मागणी करण्याचें धैर्य केलें आहे. तुम्हीं जाणते आहांत, सूज्ञ आहांत. माझी घरची परिस्थिति तुम्हांला विशेषतः आमच्या सौ. ताईला माहिती आहे. आमचे बापुसाहेब अर्धांगवातानें घरीं पंगु होऊन पडले आहेत. आई,–दोन धाकटीं भावंडं; त्या सर्वांची जबाबदारी माझ्या-वर आहे. आणि दुर्दैवानें वरील प्रसंग आला आहे. सध्यां रक्कम भरल्याखेरीज आमचा साहेब एक अक्षर बोलायला राजी नाहीं. सर्व मित्रांकडून भराभर रकमा यायला लागतील. पण तुम्हीही पाठवा. हयगय करूं नका. मी तुम्हांला माझ्या पाठच्या भावासारखे समजतों. माझ्या असहाय कुटुंबाचा भार मी माझ्यावर नसून तुमच्यावरच आहे असें समजतों. यांत काय तें समजा. सूज्ञास जास्त काय लिहूं? आपल्या येणाऱ्या तारेच्या मनिऑर्डरीची चातकासारखी वाट पहात आहे. ईश्वर तुम्हांला सद्बुद्धि देवो. सौ. ताईस अनेकोत्तम आशीरवाद. आपणां सर्वांकडून योग्य वेळीं जर मदत झाली नाहीं, तर युरोपिअन फर्मेशीं प्रसंग आहे. पुढें माझ्यावर कोणता दुर्धर प्रसंग 'आ' वासून उभा आहे हें आपल्याला सांगावयाला नकोच आहे. तो भयंकर भावी प्रसंगच आपला अल्पपरिचय असतांही आपला अधिक

फायदा घे असें लिहावयाला भाग पाडीत आहे. आपले उपकार मी फेडीन, आजन्म विसरणार नाहीं, असें लिहिणें देखील औपचारिक ठरेल. म्हणून तसें करीत नाहीं. कळावें लोभ पूर्ण करावा व संकटां-तून सोडवावें हीच विनंती.

आपला,

बी. बी. डी. "

पत्र वाचून मीं खालीं ठेवलें. तोंवर इकडे उभेंच असायचं होतं. विचारलं " वाचलंस पत्र ! "

" हं ! "

" मग काय करायचें ? "

" कशाचें काय करायचें ? "

" बाबूरावाला कांहीं मदत करायला हवी ना ? "

" तें मी काय सांगूं ! "

" मग कोण सांगणार ? तुझ्यामुळें मला हें पत्र आलें आहे ! "

" खरेंच ! "

" मग ? "

" काय एक एक त्रास आहे मेला ! हे भंपक असं कांहीं तरी करतात आणि आपल्या आणखी आपल्याबरोबर दुसऱ्याच्याही गळयाला असा फांस आणतात ! याला आतां आम्ही काय मदत करायची ? "

" भय्या इथें असता तर त्यानें बाबूरावाला मदत केली असती कीं नाहीं ? "

काय केलें असतें भय्यानें ? मला तर प्रश्न पडला ! बाबूराव—आपल्या बायकोशीं फाजीलपणा करण्याकरितां लगट करणारा बाबूराव हें कळल्या-वर भय्यानें त्याला मदत दिली असती का ? भय्याला विचार सुचला असतां. मी त्याची बहीण खरी; पण मला कांहीं सुचेना. माझं मन सुष्ट होईना दुष्टही होईना. मी समोरच्या पत्राकडे पहात नुसतीच स्वस्थ बसलें. मला कांहींच पुढें बोलतां येईना हें पाहून तिकडे जरा वेळ थांबून मग हसून म्हणायचं झालं " मला मुळीं हें पत्र खरं आहे का खोटं आहे हेंच

समजत नाहीं. गृहस्थ म्हणतो मी मुंबईला अलिकडे आलोंच नाहीं. मी तर त्याला एकदोन वेळां माझ्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिला. हें जर तो धडधडीत खोटं लिहितो आहे तर बाकीचं पत्र—त्याच्यावरील कठीण वेळेचं वर्णन हें तरी खरं कसं समजायचं ?"

"होय ! मलाही तसंच वाटतंय !" मला तिकडची कल्पना पटली. खरी वाटली. मी आनंदून जाऊन लगेच म्हटलें "अगदीं साफ खोटं असलं पाहिजे हें पत्र. जुवेबाज नी दारूबाज जवळचे पैसे संपले नी त्याची जरूरी लागली म्हणजे असल्या युक्त्याप्रयुक्त्या करायला मुळींच कमी करायचे नाहींत. त्यांतलाच हा बाबूरावाचा तरी मला प्रकार दिसतोय ! काय घायकुतीला येऊन पत्र लिहिलें आहे पण ! वाचल्याबरोबर एकाद्या फत्तरहृदयाच्या माणसालाही पाझर फुटायचा नी त्यानें आपल्या जवळचें चटसारें असेल नसेल तें याच्या हवालीं करावें !"

"बाकी पत्र किती सुन्दर आणि लाघवी लिहिलं आहे नाहीं ?"

"नाहीं तर काय ? त्याला बोलायची जशी तशीच असं लिहायचीही कला साधलेली दिसते ! कुणालाही चटदिशीं भुरळ पडावी—" म्हणाले.

पत्रच मुळी विश्वासनीय कीं अविश्वसनीय असा मुद्दा निघाला, तिथें बाकींचे प्रश्नच मिटले. बाबूराव असे लबाड खोटे लिहिणार नाहीं, असें कोणालाच म्हणवेना. शेवटीं त्याच्या प्रश्नासंबंधानें असें ठरलें कीं पुण्यास गेल्यावर बाबूरावच्या घरीं प्रत्यक्षच त्याच्या संबंधानें चौकशी करावी आणि मग काय करायचें तें करावें.

आईच्या पत्रांत आम्हांदोघांनाही एकदां पुण्याला येऊन जाण्याबद्दल लिहिलं होतें. भय्याच्या पत्रांत आणखी तीन आठवड्यांनीं तो इकडे येण्याकरितां बोटीवर चढणार असा मजकूर होता. भय्याचें यायचें नक्की झालें हें वाचून मला अत्यंत आनंद झाला. क्षणभरापूर्वींच्या सगळ्या गोष्टी मी विसरून गेलें. पत्र वाचतांच मी उद्गारलें "अगबाई ! भय्या बरोबर आज तीन आठवड्यांनींच इकडे यायला निघणार !"

"होय ! आणि तीनच आठवड्यांनीं मी विलायतेला जाण्याकरितां इथें बोटीवर चढणार !" तिकडून सांगणें झालें !

" म्हणजे ?—" मी विलक्षण आश्चर्यचकित झालें व म्हटलें "खरेंच ? हें कसें काय ?"

" खरेंच ! आणि हे केवळ योगायोग आहेत ! भय्याचा आणि माझा हा प्रवासाचा आट्यापाट्याचा खेळच होणार आहे ! आमचे बोटीवरूनच परस्परांचे नमस्कार चमत्कार व्हायचे आहेत !"

भय्या येणार म्हणून हर्ष तर तिकडे त्याच वेळेला जायचं व्हायचं म्हणून हर्षमिश्र हुरहूर मला वाटायला लागली !

आईचें पत्र आलें म्हणूनच नव्हे तर आतां लवकरच विलायतेला जायला निघावं लागणार म्हणून आम्हां दोघांना पुण्याला जाणें जरूरच झालें. त्याच आठवड्यांत आम्ही पुण्याला निघून आलों. पुण्याला आलें त्या वेळीं भय्याचं आगमन आणि तिकडचें गमन याच दोन गोष्टी मनांत घोळत होत्या. त्याचबद्दल आईजवळ--मावशीजवळ माझीं एकसारखीं बोलणीं चालायचीं ! त्या धांदलींत वहिनीचा विषय आम्हांला फारसा आठवला नाहीं नी कुणी काढलाही नाहीं. मग इतर विषय कुणाला सुचताहेत कशाला ? जसें भय्याचें माझ्याकडे पत्र आलें होतें; तसेंच घरीं पुण्यालाही आलेंच होतें. तेव्हां मी पुण्याला ती बातमी नवी म्हणून सांगणार नव्हतेंच. मी सांगण्यापूर्वीच आईनेंच मला सांगितलें. " ताई आपला भय्या लवकरच परत येणार अं !"

द्रव्याच्या दृष्टीनें तिकडचें जाणें बरेंचसें बाबांच्यावर अवलंबून असल्यामुळें त्यांना भेटून त्यांच्या कानांवर सगळ्या गोष्टी घालून, कसं ठरलं, काय ठरलें, त्याच बोटीनें कां जायला हवें ? त्यावेळीं बरोबरची सोबत कुणाची आहे; तिथल्या कॉलेजांत केव्हां जाऊन दाखल व्हायला हवें आहे; हें सर्व बाबांना सांगणें अगत्याचेंच होतें. म्हणून स्वारी मजबरोबरच पुण्याला आली. आल्यापासून बहुतेक बाबांच्याबरोबरच असायचें असे. जेव्हां पहावें तेव्हां त्या दोघांचं त्याच संबंधानें एकसारखें बोलणें चाललेलं असायचं. बहुतेक तिकडेच सारा बोलायचा मक्ता होता. बाबा लक्षपूर्वक ऐकत असत. बाबा मध्येंच एकादा कांहींतरी सूचक प्रश्न विचारीत. असं चाले.

दुसऱ्या दिवशीं मुंबईला एकट्यालाच जाऊन यायचं होतं. त्याच्या

अगोदर पुण्यांतल्या तिकडच्या एका स्नेह्यानें तिकडे चहाला निमंत्रण दिलं होतं. बरोबर मलाही जायचं होतं. ठरल्या वेळीं आम्ही तिकडे गेलों. जातांना आमच्या किरकोळच कसल्या तरी गोष्टी चालल्या होत्या. बोलण्याच्या नादांतच घाईघाईनें घरांतून निघाल्यामुळें कोणत्या रस्त्यानें गेलों, जातांना आपल्याकडे कुणी ओळखीची अनोळखीची मंडळी पहात होती काय? कुणी कौतुक करीत होतें कीं कुणी कुत्सित टीका करीत होतें; याकडे आमचें लक्षही नव्हतें. जातांना हें झालें; पण परत येतांना तसें झालें नाहीं. परत बोलत बोलत जे आलों ते नेमके बाबूरावाच्या घरावरून. अगदीं जवळ येईपर्यंत आमच्या ध्यानांत देखाल नव्हतें आणि खरें म्हटलें तर त्या नादांत आलेंही नसतें. पण बाबूरावच्या घराच्या समोर आलों त्याच वेळीं बाबूरावाची आई कशालाशी दारांत आली होती. तिनें आम्हांला पाहिलें. अगदीं जवळ जाईपर्यंत ती तशीच उभी राहिली. जवळ येतांच तिनें हांकच मारली—" ताई—"

मीं चमकून पाहिलं; तर बाबूरावची आई! आम्ही दोघेंही थांबलों! 'बाबूरावाचें हें घर ही चटदिशी जाणीव झाली. मीं काकूकडे हंसून पाहिलं. नंतर आम्हीं एकमेकांकडे पाहिलें. त्याच क्षणीं आम्हां दोघांच्या मनांत विजेसारखी एकच कल्पना चमकन् चमकली!

"कां ग ताई," मी थांबतांच बाबूरावाची आई म्हणाली, "अगदीं तशीच चाललीसशीं? ये कीं जरा! जाशील बसून जरा! कां आहे कीं नाहीं वेळ? आलीस केव्हां? आम्हांला दादपत्त सुद्धां नाहीं. आणि खुशाल दारावरनं पुढंच चालली होतीस ती? आमचं इथं घर आहे हें देखील विसरली होतास वाटतं?–ये–ये–कांहीं हरकत नाहीं आमच्या घरीं आलीस तर हो!–" बाबूच्या आईच्या तोंडाचा पट्टा तो! मला आतां तसें पुढें जाणें शक्यच नव्हतें. मी पुन्हां स्वारीकडे वळून पाहिलं. स्वारी पुढें चालू लागली. मी काकूंच्या घरीं शिरलें.

काकूंनीं मला या वेळीं चांगलं आतिथ्य दाखविलं. मी त्या घरांत शिरतांना ऊर किंचित धडधडला. कससंच झालं. अंगाला, कपाळावर घाम आल्यासारखं सुद्धां वाटलं. काकूंच्या तोंडाच्या तोफेच्या माऱ्यांतून सहिसलामत सुटते कशी याचीच धास्ती मला वाटली. पण

मात्र निराळा आला. या खेपेला काकूंचे बोलण्यांत नेहमींचें चढाईचें धोरण नव्हतें. फौजदारशाही कडकडाट नव्हता! इतकेंच नव्हे, तर उलट तोंडावर चिंतेची छाया पसरली होती. आवाजही बराच मवाळला होता. हें असें कां? याचें चटकन् कारण मला ताडता आलें नाहीं मी गेलें. बसलें. काकूंनीं औपचारिक प्रश्न विचारले. मीं पण सांगितले आणि मींही आपली रीत म्हणून त्यांच्याकडची पूसतपास केली. तेव्हां बाबूरावची आई कांहीं-शा उद्वेगाच्या आवाजानें म्हणाली:—" कसलं चांगलं नी कसलं वाईट आतां ताई आमचं? झालं. गेलं. संपलं आमचं आयुष्य नी त्याबरोबर सुखही! माझी उमेदही खचली. अहंकार गेला. चट सारं गेलं......"

"पण काकू झालं काय असं?" मी अशा अर्थाची नुसती मुद्राच केली. ही एवढी जहांबाज बाई आज अशी गोगलगायीसारखी काय बोलते हे कळेच ना मला!

" काय सागूं ताई, तुला आतां? मान सांगावा जनाला, अपमान सांगावा मनाला. पण आतां मला मान काय नी अपमान काय दोन्हीं सारखींच! आणि तुझ्याजवळ कसला आला आहे अपमान न् मान? म्हणून तुला सांगतें—" इतक्यांत मध्येंच कुणी एक काकूच्याच वयाची बाई तिथें आली. तिला 'या—बसा' काकूनें म्हटलें. ती बसली. तिनें आम्हां दोघींकडेही एकदां पाहिलें; काकू मजकडे पुढें सागण्याकरितां वळल्या. त्या वेळीं बाई काकूला म्हणाली—

" काय चाललें आहे तुझं काकू?—"

" आपली बाबूची गोष्ट—" काकू उत्तरल्या.

" त्याचं काय सांगणार? काल मला सांगितलेंस तेंच ना? पण त्याला तूं काय करणार? मी काय करणार नी आणखी कोण तरी काय करणार? अलीकडचीं पोरं हीं अशींच! बाई, मी सांगतें ना मुलाबाळांचं सुख आईबापांना भाग्यानंच घ्यावं लागतं! तुला वाटलं होतं पुष्कळ कीं तुझा बाबू तुला सुख देईल म्हणून; पण तो असा निघायचा होता ना?—बरं पुढें कांहीं कळलं का त्याच्यासंबंधानें?—" त्या बाई मध्येंच तोंड खुपसून बोलल्या. काकूंनीं तिच्याकडे पाहून नकारार्थी मान हलविली नी मजकडे वळून बोलूं लागल्या—" माझा बाबू असं करील असं कांहीं कधीं मला

वाटलं नव्हतं ! लहानपणापासून उनाड खरा तो ! पण इतका वहावेल असं मनालाच शिवलं नाहीं माझ्या. मी त्याच्याकरितां लहानपणापासून घरचीं किती बोलणीं खाल्लीं आहेत. कित्येकदां तर मारदेखील घेतला आहे. घरीं माझ्यावर संतापावं, "तूं पोरट्याचे लाड करतेस, त्याला बिघडवतेस, त्याचा घात तूं करतेस असं म्हणावं. पण मी तें सारें पाठीशीं टाकावं. आज असा असला तरी तो उद्यां शुद्धीवर येईल; असं आईच्या वेड्या मायेला वाटे ! खोटं बोलायचं, थापा मारायच्या, घरीं मला छळायचं, कुठं तरी पळून जायचं; शाळेंत मारामाऱ्या करायच्या; कलागती आणायच्या; हें नी तें-किती बाबूचें मी सोसून घेतलय आजवर ! तुम्हांला सांगितलं तर खरंसुद्धां वाटायचं नाहीं ! पण इतकं करून त्याचा शेवट शेवटीं त्यानं असा केला !......"

मुंबईस आम्हांला आलेल्या बाबूरावाच्या पत्राची मला आठवण झाली. त्याचसंबंधानें काकू कांहीं तरी सांगणार असें वाटलें. मी लक्षपूर्वक ऐकूं लागलें. बाबूराव स्वतः संकटांत पडला आहे आणि त्याचं घरही त्यानं संकटांत घांतलं आहे हें तर आतां उघडच झालं !

"ताई, आपलेच दांत नी आपलेच ओंठ ! मुलाबद्दलच विरुद्ध बोलायची पाळी आईवर आली आहे बरें ! पण तूंच सांग बाबूनें या फळाला गोष्टी आणाव्यात म्हणून कां मीं त्याला तसं वागविलं ? त्याचे अपराध झाकले. घरचा छळ मी सोसला. त्याला वांचवलं ? आतां घरांत मला उभं वारं सुटलं आहे. बाबूचें काय झालें आहे नी काय नाहीं ? का तुरुंगांत आहे, का राहिला आहे कुठें तरी जाऊन, कळतच नाहीं. परवा तीन महिन्याच्या मागें घरांतून कुठें कुणालाच न विचारतां चालतां झाला आहे. त्याचा पत्ता नाहीं. मीं त्याला केव्हां तरी रागानें बोलायची; घरांतून त्याला शिव्याची लाखोली सदाच मिळायची. मी म्हणे नोकरी कर. तो म्हणायचा "नाहीं. मी व्यापार करणार ! भांडवल दे ! कॉलेज सोडलं. म्हटलं सोडूं दे ! पण भांडवल कुठलं द्यायचें ? दांत का पाडून द्यायचे होते ?—पण आतां ते सुद्धां द्यावे लागले आहेत ! ताई, मी तुला सांगतें, परवां बाबूचें कुठून कीं पत्र आलें; त्यांत लिहिलें कीं, मी असा अडचणींत पडलों आहें. चार हजार रुपये भरले नाहींत,

तर तुरुंगांत जावें लागेल. मुलाची गरज आणि घराण्याची अब्रू संभाळायची असेल तर पैसे पाठवाल. नाहीं तर जातोंच आहे तुरुंगांत! —असें पत्र आलें त्याचं! आतां सांग काय करायचं? घरीं कळालं! चांगलीच आग भडकली. "मरू दे. जाऊं दे तुरुंगांत. आपल्याला एक कवडी मिळायची नाहीं. मेला तरी मला सुतक यायचं. नाहीं. तुरुंगांत गेला तरी माझी जाईल अब्रू—जाऊं दे. मला त्याची परवा नाहीं!" असं एकसारखं घरचं बडबडणें चालू झालं. पण आईच्या जिवाला लाज नाहीं. माझ्या अंगावरचं किडूकमिडूक होतं—घरांत होतं नव्हतं तें सोनंनाणं गोळा केलं—उद्यां मुलाबाळांना घेऊन भिक्षा मागायचं ठरवलं—तिकडे कळूं न देतां तें मोडलं नी बाबूकडे जमलें तें पाठवून दिलें. सारे-दीडहजार रुपये पाठविले. पण तेवढ्यानें काय होणार? मिळालें तें पाठविलें नी आतां आणखी काय होतय म्हणून बसलें आहे वाट बघत!"

नंतर काकू जरा थांबल्या. त्यांना बोलवेनाच. त्यांचा ऊर भरून आला. डोळयांत पाणी आलें. त्यांनीं पदरानें डोळे पुसले. त्यांचे गाल, नाकाचा शेंडा हीं लालभडक झालीं होतीं. त्या आणखी म्हणाल्या "काय सांगायची ताई तुला आमची कर्मकहाणी! 'पाठीं येऊन छळीन, पोटीं येऊन छळीन' तसं केलंन् बघ बाबूनं. बाहेर कुठं जायला तोंड नाहीं, बोलायला जागा नाहीं! इतकं करून लोक म्हणणारच "मुलगा बिघडला तो आईच्या लाडानं! लोक कशाला, सध्यां घरीं तेंच चाललय ना?—सगळं घर धुवून पाठविलं बाबूकडे. पण आमचं उद्यां कसं होणार याची त्याला कांहीं काळजी आहे का?—त्यांतल्या त्यांत हें एक बरेंच म्हणतें कीं, त्याचं अजून लगीन तरी नाहीं झालं! नाहीं तर तो एक दुसऱ्याच्या पोरीच्या गळयाला आणखी एक फांस लागला असता!—"

असें हें काकू किती तरी आणि किती तरी वेळ सांगत बसल्या होत्या. मला वाईट वाटलें. काय ही त्यांची स्थिति. अशीं जर मुलं उनाड निघालीं तर त्या आईबापांनीं करायचं तरी काय? मी काकूंची समजूत तरी काय घालणार?—आपली हूं हूं म्हणून ऐकत होतें. सुस्कारे सोडीत होतें.

पुष्कळ वेळानें जायला उठलें. काकूंनीं कुंकू लावलें. पुन्हां ये म्हणून सांगितलें, मी घरीं निघालें.

वाटेंत बाबूरावाबद्दलच विचार येत होते. एकूण त्यानं पत्र लिहिलं होतं तें खरेंच होतें तर! झालें हें बरें कीं वाईट? आतां त्याचें, या त्याच्या घराचें पुढें कसें होणार? बाबूराव उनाड–भंपक निघाला असं हें व्हायचंच! त्याच्या वडिलांचा यांत काय दोष? काकूंनीं त्याच्यावर माया केली यांत त्यांचा कोणता अपराध? घरोघरीं अशीं मुलं होऊं लागलीं तर व्हायचं कसं? बाबूराव–या भानगडींत खरेंच तुरुंगांत गेला तर–तर–माझ्यासारखीच्या–वहिनीसारखीच्या पाठीची पीडा गेली म्हणून बरं–पण त्याच्या घरच्या माणसांनीं काय करावं? त्यांच्या दृष्टीनीं तें किती वाईट? तो दिवस व ती सारी रात्र त्याच एका विचारांत गेली. रात्रीं स्वप्नांत तेच देखावे दिसत होते.

पहाटेच्या वेळीं मला स्वप्न पडलं. स्वप्नांत सारे देखावे काकूंनीं सांगितले तेच! बाबूरावाला वर्षाची सक्त मजुरी झाल्याचें दिसलें. पहाटेचीं स्वप्नें खरीं होतात. सकाळीं उठल्यावर भीतभीत इतरांकरवीं चौकशी करविली. तों खरेंच काकूंना नुकतेंच कळलें होतें. 'बाबूरावाला शिक्षा झाली आहे.' काकू रडत होत्या. बापूसाहेबांची शुद्धि नष्ट झाली होती. बाबूरावांचीं लहान दोन भावंडें दीन वदनानें आईजवळ बसलीं होतीं.

---

## प्रकरण १५ वें

## आनंदी आनंद गडे!

आनंदी आनंद गडे। इकडे तिकडे चोंहिकडे। याचा अनुभव पुरेपूर आज आम्हांला येत होता. घरांत आनंद, दारांत आनंद, जनांत आनंद, मनांत आनंद, आकाशांत, प्रकाशांत, झाडावर, फुलांवर, पानावर, पक्ष्यांच्या किलबिलाटांत, गाई-गुरांच्या हंबरण्यांत, पाण्याच्या खळखळण्यांत, देवळांच्या शिखरांवरील पताकांच्या फडफडण्यांत–येणाऱ्या जाणाऱ्यांच्या घाई गर्दीत आनंद नुसता थयथय नाचत होता!

आईच्या डोळ्यांत आनंदाचा अभिषेक करण्याकरितां अश्रु सांचले होते. मावशीच्या स्वयंपाकाचा स्वाद आनंदाचेंच रूप घेत होता. वहिनीच्या हिंडण्या-

फिरण्याबरोबर आनंदही विहरत होता ! बाबांचे आज कित्येक दिवसांत दिसलें नव्हतें असें प्रसन्नमुखमण्डल आनंदाच्या सान्निध्यानेंच प्रफुल्ल झालें होतें ! माझा आनंद तर मनांत मावत नव्हता, हृदयांत ठरत नव्हता !

जिकडे तिकडे उल्हास उसळत होता; उत्साह बागडत होता. फुलं हंसत होतीं, वेली डोलत होत्या. वायु देखील उत्सुकतेनें कांहीं कांहीं स्वागतपरसंगीत गुणगुणत होता; असें व्हायचें कारण सांगितलेंच पाहिजे का ? भय्या—माझा भाऊराया विलायतेहून आज घरीं येऊन पोंचला होता. मग असा आनंद दशदिशांत कोंदल्या खेरीज कसा राहिल ? काल दुपारीं विलायतेच्या बोटींतून भय्या उतरल्यापासूनच आनंदाचं वातावरण निर्माण झालें होतें. बाबा, मी, वहिनी, वहिनींचे वडिल—इतकीजणें मुंबईला भय्याला उतरून घ्यायला धक्क्यावर गेलों होतों. मुंबईची आणि पुण्याची भय्याची मित्रमंडळी—ज्यांना कळलें होतें व ज्यांना धक्क्यावर यायला सवड होती; ते त्याच्या स्वागताकरितां हार—तुऱ्यानिशीं हजर राहिले होतेच ! धक्क्यावर भय्या उतरतांच त्याच्या स्वागताला आरंभ झाला ! आम्हां सर्वांची त्या वेळीं केवढी उत्सुकता वाढली होती ! भय्या आम्हांला दिसतो केव्हां असं आम्हांला होऊन गेलं होतं ! त्यालाही तसेंच झालें होतें ! आम्हांला त्यानें पाहिलें; त्याला आम्हीं पाहिलें. त्याच्या तोंडावर किंचित् स्मित चमकलें ! त्या स्मितांत केवढा विश्वव्यापी आनंद सामावून राहिला होता ! जवळ येतांच भय्यानें बाबांना आणि नंतर आपल्या श्वशुरांना पायावर डोई ठेऊन प्रमाण केला ! आम्हीं त्याच्या भोंवतीं गोळा झालों ! मी हंसलें. वहिनींनेंहि लाजून, पदर सावरून, गालांतल्यागालांत हंसून भय्याचें स्वागत केलें ! तेथें आलेल्या त्याच्या मित्रांनीं त्याच्या गळ्यांत हार घातले ! आनंदानें जयघोष केला !

भय्या कोणी तसा प्रसिद्ध पुरुष नव्हता. दे. भ. नव्हता, पण व्हायचा होता. आम्हीं घरचीं नात्याचीं—स्नेह्यांतलींच कायतीं माणसं त्याला उतरून घ्यायला गेलों होतों. पण तेवढेंच भय्याचं जग जिव्हाळयाचं-खरखुरं जिव्हाळयाचं जग होतें. त्यांत त्याची तृप्ती होती. आमची तृप्ती होती ! आनंदाला—उल्हासाला कुठल्याच प्रकारानें कमतरता नव्हती ! आई आणि मावशी मुंबईला आल्या नव्हता. आईची प्रकृती इतका त्रास सोसण्याइतकी धड राहिली

नव्हती म्हणून आम्हीं तिला मुंबईला नेलें नाहीं. मावशी तिच्याकरितांच म्हणून आली नाहीं. म्हणून कांहीं मंडळींची इच्छा भय्यानें एकदोन दिवस तरी मुंबईला रहावें अशी असतांनाही आम्हीं कुणी तिथें राहिलों नाहीं. भय्यालाही रहावेंसें वाटलें नाहीं. त्यानें अगोदर आईच्या प्रकृतीची चौकशी केली होती. कां आली नाहीं म्हणून विचारलें होतें. ती येऊं शकली नाहीं; त्याकरितां भय्याला पुण्याला केव्हां जाईन आणि आईला केव्हां भेटेन असें त्याला होऊन गेलें होतें. मग तो आपल्या मित्रांच्या आग्रहाला कसा बळी पडणार ? जितक्या आस्थेनें–आग्रहानें त्याच्या मित्र-मंडळींनीं त्याला राहवून घेण्याचा प्रयत्न केला–तितक्याच तळमळीनें-- जिव्हाळ्यानें त्यानें अतिशय गोड बोलून --परत आठ दिवसांत आठपंधरा दिवस तुमच्यांत राहावयालाच येतों असें अभिवचन देऊन तो पुण्याला निसटला होता !

दूर प्रांतीं आपल्या मायेच्या माणसांना सोडून कित्येक महिने राहून भय्या आज परत आला होता. आईबापांच्या कृपाछत्राखालचें, प्रीतीच्या सहचारिणीच्या मधुर प्रेमाचें, एकुलत्या एक भगिनीप्रेमाचें सौख्य भय्या आज एकसमयावच्छेदेंकरून अनुभवीत होता. त्याच्याइतकें सुखी–आनंदी–उल्हासी आज कोण होतें ! त्याचं कोडकौतुक करावं तितकं प्रत्ये-काला थोडंच वाटत होतं ! अशा स्थितींत भय्यासमोर जर एकाद्यानें येऊन श्रीसमर्थांचा " जगीं सर्व सूखी असा कोण आहे ? " असा सवाल टाकला असतां, तर भय्यानें आपल्या छातीवर अभिमानानें हात ठेवून त्याला " मी जगांत सर्व सुखी आहें ! " असा प्रांजल जबाब दिला असता ! आई त्याला जवळ घेऊन प्रेमभरानें कुरवाळीत होती आणि ' माझा बाळ शहाणा झाला; यशवन्त झाला. माझे दृष्टीडोळे निवाले बरें ! " असें म्हणून आपल्या जीवाची त्याच्यावरून कुरवंडी करीत होती. तर बाबा आपल्या विजयी, यशस्वी चिरंजीवाला कुठें ठेऊं आणि कुठें नको; अशा रीतीनें वागवीत होते. ' भय्याला अमुक पदार्थ मनापासून आवडतो; तें तमुक केलें तर चालायचं नाहीं त्याला कधीं; तेव्हां आज हें केलं पाहिजे, उद्यां तें केलं पाहिजे. सगळ्यापेक्षां त्याच्या आवडी नावडी काय आहेत हें मला माहीत आहें." असें मावशी जेव्हां तेव्हां आणि ज्याच्या त्याच्या जवळ म्हणत असे

आणि भय्याला आवडणारे जिन्नस पकविण्यांत गुंतलेली असे. तर वहिनीही अष्टौप्रहर त्याच्या सहवासांत राहून अर्धांगी हें उपपद सार्थ करीत असे. मी जेव्हां संधि मिळेल तेव्हां थट्टामस्करी करून त्याच्या आनंदसागराला भरती आणण्यांत मुळींच कसूर करीत नव्हतें! इष्टमित्र येत-जात होते. थट्टामस्करी चालत होती. मग भय्या पूर्णसुखी कसा नसेल?

भय्याचे श्वशूर यापूर्वी आमच्याकडे फारसे कधीं आले नव्हते आणि आले तर कधीं राहिले नव्हते. पण या खेपेला तेही आपल्या जावई-मुलीचे सुखसोहळे पाहाण्याँकरितां मुद्दाम राहिले होते. तशी ते सवडच काढून आले होते. ते मध्येंच जातो म्हणाले तर त्यांना बाबांनीं आग्रह केला. भय्यानेंही ' रहावें ' अशी इच्छा प्रकट केली. म्हणून ते राहिले. भय्याचा जेव्हां तेव्हां आणि जिथें तिथें एकसारखा ' उदोउदो 'च चाललेला होता. ते देखावे प्रत्यक्ष पाहाण्यांत आणि गुणवर्णनें ऐकण्यांत सर्वांचा काळ किती तरी जात होता. भय्याच्या श्वशुरांना मग राहावेंसें कां वाटणार नाहीं?

विलायतेहून सुखरूप आल्याबद्दल, यशस्वी झाल्याबद्दल, आणि यानंतर भय्यानं ' लोकसेवेचं कंकण हातीं बांधून आपल्या ज्ञानाचा, आयुष्याचा, फायदा जनताजनार्दनाला द्यावा ' म्हणून कित्येकांकडून अभिनंदनपर, अभीष्टचिंतनपर, पत्रें, तारा, संदेश वगैरेंचा त्याच्यावर नुसता पाऊस पडत होता!

कित्येक ठिकाणीं जाहिर, तर कित्येक जागीं खाजगी भय्याच्या स्वागताकरितां सभा होत होत्या. मेजवान्या झडत होत्या. सभेच्या किंवा मेजवानीच्या वेळीं प्रसंग साधून खाजगी चारचौघांतही भय्याला पुढें काय करणार? नौकरी, का स्वतंत्र उद्योग, का देशसेवा?" असे प्रश्न विचारीत त्यानें काय करावें आपणच परस्पर ठरवीत आणि त्याच्यावर कोणी कोणी लादीत असत.

खाजगी बैठकींत भय्याला उद्देशून चेष्टेनें-थट्टेनें असें पुष्कळ वेळां म्हटल्याचें मला आठवतें:—

"भय्या, तुझ्या वडिलांनीं तुझ्याकरितां आजवर पाण्यासारखा पैसा खर्च केला आहे. त्याचें चीज करून दाखविलें पाहिजे आतां!"

"तें त्याला नको सांगायला. स्वारी तशी खंबीर आहे. तो उद्यां पहा

आपल्याला इम्पीरीयल सर्व्हिसमध्यें शिरलेला दिसेल. मग काय हो ? वडिलांनीं खर्च केलेली रक्कम तो त्यांची त्यांना देइलच. पण आणखीही मूळच्याच संपत्तींत भर टाकल्याशिवाय राहणार नाहीं ! ”

“ पण त्यानें असें करूंच नये. नौकऱ्या करण्याची—परकीयांची गुलामगिरी पत्करण्याची भय्याला किळस आली पाहिजे. त्यानें आतां देशसेवाच केली पाहिजे. त्याच्या वडिलांनीं कर्तव्य केलं. यानं आपलं कर्तव्य देश काल-परिथति ओळखून बदललं पाहिजे. तें केलं पाहिजे. पैशाकडे यानं मुळींच पहातां नये ! ”

“ पण याचे बाबा याला असले भलते चार मुळींच करूं देणार नाहींत. ते याला अमुकच केलें पाहिजेस असें सांगणार आणि हा तेंच निमूटपणें करणार ! ”

“ पण यानें वडिलांचें वाटेल तें बोलणें ऐकूंच नये ! ”

“ तें याच्या हातून घडणें नाहीं ! याचा नूरच तें सांगतो आहे ना ? जसा लेकाचा बावळटासारखा गेला तसाच बावळटाप्रमाणें आला आहे. याच्या वृत्तींत कांहींएक फरक झालेला नाहीं ! कांहीं शिकला. परीक्षा दिली आणि ती यशस्वी झाली यापेक्षां लेकानं कांहीं अधिक केलेलं दिसत नाहीं. अरे, परवां धक्क्यावर उतरला तेव्हां वडिलांच्या आणि श्वशुरांच्या इकडच्या गांवढळ पद्धतीप्रमाणें यानें पायावर डोकं ठेवलं !—”

“ हो बुवा ! मला वाटलें होतें, विलायती वेडेपणा शिकून आला आहे, तेव्हां बरोबरच्या नात्यानें त्या दोन वयोवृद्धांच्या पाठीवर हात मारून, आणि हातांत हात घालून “ हॅलो, हाडूडूडू ओल्ड फॉक्स ? ” म्हणत शेकहॅन्ड करील ! पण नाहीं ! ”

“ माझी कल्पना तर होती, हा येतांना एकादी विलायती बेटरहाफ् आणील. त्या दृष्टीनें मी त्याच्याकडे पाहात होतों; पण ह्यानें तसें कांहींच केलं नाहीं ! आपला गेला तसाच आला ! वडिलांची भीति ना ?—”

“ मग बरोबर आहे; याचे वडील सांगतील तेंच हा करणार !—”

“ काय रे भय्या, इथल्यासारखाच बावळटासारखा तिथें वागत होतास का रे ?—खाद्यपेयांचं तरी मग कसं केलंस ? एकादशीसारखो उपाससुद्धां

तिथं देवाला स्मरून केला असशील ना ? पण तिथें भुईमुगाचे दाणे—साबूदाण्याची लापशी हीं तिथें कशीं मिळाली ? ”

“ जाऊं दे रे ! हें काय भलतंच त्याला बोलतां आणि विचारतां ? त्याच्या खाजगी गोष्टींशीं आपल्याला काय करायचं आहे ? तो आपल्या भावी आयुष्याचा जगाला काय उपयोग करून देणार आहे हें त्याच्याकडून आपल्याला कळलें म्हणजे झालें. त्याच्या इतर गोष्टींशीं आपल्याला काय करायचें ?—”

“ होय ! तेंही खरेंच ! बोल, बाबा भय्या, पुढें तूं काय करायचं ठरवलं आहेस ? कां लागली फक्त विलायतेच्या सफरीची चटक ! एकदां जाऊन, राहून पाहून आला आहेस. आतां पुन्हां जावसं, तिथंच रहावंस वाटणारच तुला ! चार आठ दिवस राहशील. लंब्या चवड्या गप्पा मारशील आणि एक दिवस आपल्या अर्धांगीसह विलायतेला चालता होशील ! तुला वाटेल इथें राहण्यांत राम नाहीं ! नाहींना असे कांहीं करणार ! काय तें खरं सांग, असं करणार असशील, तर अगोदर सांग; म्हणजे सध्यां तुझ्या ‘ जयजयकारा ’चे चालू असलेले जाहिर समारंभ आम्ही एकदम थांबवूं ! ”

याप्रमाणें ज्याला जसें वाटेल तसें तो भय्याला बोलत असे; व त्याचें अंतःकरण उघड करण्याचा प्रयत्न करीत असे. भय्याही शक्य तितक्या रीतीनें आपले हेतु, महत्वाकांक्षा, यांची पुनः पुन्हां खुल्या दिलानें उजळणी करीत होता. सभेंत किंवा मेजवानींत भय्या आपली मतें व विचार प्रांजलपणानें बोलून दाखवीत असल्यामुळें लोकांना त्याबद्दल फारच आदर वाटत होता !

कुणी बाबांच्या बरोबरचे स्नेहीसोबती बाबांनाही विचारीत कीं, “ काय हो, तुमचे चिरंजीव पुढें काय करणार आहेत ? तुम्ही त्याला काय करावयाला लावणार आहांत ? ” तेव्हां बाबा त्यांना आपले विचार सांगतः—
“ हें पहा; आमच्या भय्यानें आतां काय करावें, हें ठरविणें माझ्याकडे नाहीं. त्याला शिक्षण देणें त्याचें संगोपन करणें; उत्तम नागरिक, उपयुक्त मनुष्य करणें त्याच्यासंबंधानें पिता या नात्यानें माझं कर्तव्य होतं; तें मी माझ्या समजुतीनें आतांपर्यंत यथायोग्य बजावलें आहे. आतां त्याचा मार्ग

त्यानें ठरवावयाचा आहे. त्यानें सल्ला विचारल्यास आपल्याला योग्य वाटेल तसा सल्ला देणं एवढंच आतां माझं काम आहे. आणि तेवढेंच मी करणार! भय्याला अमुकच कर आणि तमुक करूं नकोस; अशी मी त्यावर कधींही जुलूम जबरदस्ती करणार नाहीं! आतां भय्या भावी आयुष्यांत तो वागेल तो योग्यच प्रकारें वागेल. अशी माझी पूर्ण खात्री आहे!"

अशा प्रकारें बाबा मित्रादिकांत भय्याविषयीं बोलत असतांना पूर्ण आवेशांत येत. पुत्राबद्दलची योग्य जबाबदारी आपण पाळली आहे. ही समाधानाची जाणीव त्यांच्या मुखश्रीवर खेळतांना दिसे. त्यांनीं पिता या नात्याची उत्कृष्ट जबाबदारी आपल्या परिस्थितीला अनुसरून पार पाडली होती; आणि पुत्रानें आपलें कर्तव्य करावयाचें व पितृऋणांतून मुक्त होण्याचा प्रामाणिक प्रयत्न करावा अशी अपेक्षा व आशा बाळगावयाची; एवढेंच बाबांच्याकडे होतें; व ते तेवढीच अपेक्षा व आशा बाळगून राहिले आहेत, असें दिसून येत होतें!

भय्यानें घरीं पाऊल ठेवल्यापासून त्याच्या स्वागताच्या भरणाऱ्या सभांचा आणि त्याच्याकरितां होणाऱ्या मेजवान्यांचा धूमधडाका उडाला होता. सकाळीं सभा, दुपारीं सभा. दुपारीं कुठें तरी मेजवानी, रात्रीं कुठें तरी उपाहाराचा थाट! भय्याला घटकेची फुरसद नव्हती; कीं आईजवळ क्षणभर बसेन म्हटलं तर त्याला वेळ मिळत नव्हता! आम्ही त्याच्याबरोबर मेजवान्यांना कांहीं कुठें जात नव्हतों. पण ठिकठिकाणच्या सगळ्या सभा मात्र मी आणि वहिनी मुळींच चुकवीत नव्हतों. भय्याचें जाहिर गुणवर्णन ऐकायला, त्याच्या गळ्यांत हार घालतांना पाहायला; त्याचें भाषण ऐकायला आम्हीं दोघी हटकून हजर असायच्याच! त्या वेळीं आमच्या अंगावर क्षणाक्षणाला आनंदाचे रोमांच उभे राहात! मनाला कोण कुतुहल, मौज वाटे! धन्य! धन्य आमचा भय्या! असें घडीघडी शब्द जिभेवर नाचायला येत! ज्यावेळीं सभेंत भय्या हसत हंसत बोलावयाला उभा राही, तेव्हां खरोखरच आमचे देहाचे कान होत. मनाचें भान होई आणि आम्ही शब्दन् शब्द ऐकत असूं! भय्या नम्र—आवाजांत पण निश्चयाच्या शब्दांत सांगत असे:—

"मला माझ्या पूज्य पित्यांनीं जें शिक्षणामृत पाजलें, वत्सलतेनं वाढ-

विलं, प्रेमानें पालनपोषण केलें; अलोट संपत्ति वेंचली, त्याचं योग्य चीज करून दाखविणें माझें कर्तव्य आहे आणि तें मी कोणत्याही रीतीची कसूर न करतां पार पाडीन, असा निश्चय केला आहे! मातृसेवा करणं, देशाची सेवा करणें, आप्तेष्टांचं होईल तितकं कल्याण करणं, सर्वांची सुख-सोय पहाणं, स्वतःच्या क्षुद्र वा मोठ्या सुखाचा, परोपकारार्थ, देशाच्या, धर्माच्या, देवाच्या, घराच्या सेवेकरितां त्याग करणें, हेंच मी आपलं पवित्रतम कर्तव्य समजतों व त्यांतच माझ्या आयुष्याचें, ज्ञानाचें आणि माणुसकीचं खरंखुर चीज आहे असं मानतों! मी इतउत्तर तेंच करीत राहणार! देशाला ज्या क्षणीं माझी गरज लागेल; देशाची ज्या पळाला मला हांक ऐकायला येईल, त्याक्षणीं---त्या पळाला मी कसलाही दुसरा विचार न करतां, कोणतीही लंगडी सबब पुढें न आणतां स्वसुखाचा त्याग करून स्वदेशाच्या कार्यासाठीं पुढें येईन!—"

भय्या हें असें बोलूं लागला, म्हणजे सभाजनांत प्रचंड टाळ्यांचा कडकडाट होई! तें भय्याचें जंगी स्वागत पाहिलें, ऐकलं म्हणजे आमचा जीव कसा फुलून जाई? भय्यावरून पंचप्राणांची कुरवंडी करून ओवाळावी, असें घडीघडी मनांत येई!

भय्या आल्या दिवसापासून सतत एक आठवडाभर असा प्रकार चालला होता! समुद्राच्या भरतीसारखी दररोज प्रोग्रामाला भरतीच येत होती.

भय्याचे श्वशूर दोनतीन दिवस राहिले. जातांना आपल्याकडे चार दिवस जांवयाला बरोबर घेऊन जावं, अशी त्यांची फार फार इच्छा दिसली. त्यांनीं बाबांच्या जवळ गोष्ट काढली. भय्यालाही विचारलें. बाबांचा किंवा भय्याचा नकार असायचें कारणच नव्हतें. पण इथेंच असे प्रोग्रामवर प्रोग्राम चालले असतांना त्यांतून सुटका झाल्याशिवाय भय्या हलणार कसा? भय्याला तसा सोडणार कोण? भय्याचे श्वशूर उघड्या डोळ्यांनीं पाहातच होते. त्यांना आपली इच्छा चार आठ दिवस दाबून ठेवावी लागली. ते अगोदर एकटेच पुढें गेले. जातांना त्यांनीं मात्र आर्जवून सांगितलें "पुण्याचे प्रोग्राम आवरूं देत पण इथले आटोपले म्हणजे अगोदर आमच्याकडे येऊं दे. मुंबईची मित्रमंडळी बोलावताहेत, हें मला माहीत आहे. मुंबईला नंतर—आमच्याकडून आल्यावर जावें."

त्यांचें हें म्हणणें मात्र मान्य झालें. पुण्याचे प्रोग्राम आटोपतांच भय्या आणि वहिनी–वहिनीच्या माहेरी जायचें निश्चित झालें. भय्याचे श्वशूर निघून गेल.

भय्या आतां त्यांतल्यात्यांत आईजवळ होईल तितका जास्त वेळ बसूं लागला. तिच्याशीं बोलण्यांत, तिचे पाय चेपण्यांत, वेळ घालविण्यांत त्याला अधिक बरें वाटे. तो आईजवळ असा बसला असतां जर कुणी त्याला "चला; आपलं व्याख्यान ठरवलं आहे. लोक जमले आहत. आपली वाट पाहात आहेत. उशीरही झाला आहे." असें सांगत आला; तर तो आतां भय्याला जुलूम असें वाटूं लागलें, हे आपले सोपस्कार किती करून करावयाचे ? व्याख्यानांत–नुमता बोलघेवडेपणा करण्यांत विशेष मतलब काय आहे ? त्यापेक्षां प्रत्यक्ष अशी मातेची सेवाशुश्रुषा घडली तर तें अधिक चांगलें नव्हे का ? असें तो म्हणू लागला, म्हणे, पण नाइलाजानें बाहेर व्याख्यानाला वगैरे त्याला जावेंच लागे !

भय्यासारखं पुत्र-रत्न देशाला दिलं; म्हणून बाबांचाही प्रसंगीं गौरव होई ! त्यांना धन्यवाद मिळत !

बापसे बेटा सवाई होणार ! जे वडिलांच्या हातूनही घडलें नाहीं; तें भय्या करून दाखविणार ! भय्या आपल्या घराचें, देशाचें, राष्ट्राचें भूषण होऊन राहणार ! असें भय्यासंबंधानें सर्वच लोक बोलत ! त्याचा जयजयकार करीत होते !

इह जन्मांतलें आपण सुखाचें शिखर गांठलें आहे, असें क्षणभर बाबांना वाटलें तर त्यांत कांहीं वावगें होतें का ? बाबांना कुणी त्याबद्दल दोष दिला असता का ? आपलीं मुलें वागविण्यांत भय्याच्या वडिलांचा कित्ता गिरवावा, असें आणि भय्याप्रमाणें प्रत्येक पुत्रानें आपल्या वडिलांच्या श्रमाचें, पैशांचें, आस्थेचें चीज करून दाखवावें, असें सध्यां ज्याच्या त्याच्या तोंडीं येत होतें !

अशी बाबांनीं आपल्या ऐहिकसुखाची परिसीमा गांठली होती–आतां भय्याच्या भावी–भव्य कर्तबगारीकडे बाबांची दृष्टि स्थिर होण्याचा यत्न करीत होती !—

आठ दहा दिवस कसे आणि केव्हां हां हां म्हणतां गेले हें आम्हां कोणाला

कळलेंही नाहीं! दोन तीन दिवसांनीं भय्या आपल्या सौभाग्यवती-(कमळावहिनी) सह जायचें ठरलें.

आम्हांला आतां घरांत बसायला, एकमेकांशीं बोलायला, हंसायला, थट्टाविनोद करायला, इकडच्या तिकडच्या गोष्टी करायला जरा जास्त वेळ मिळूं लागला. बाहेरच्या सभा–मेजवान्यांची गर्दी किंचित् कमी झाली!

भय्या इथें यायचा नक्की दिवस कळल्यापासून तिकडे विलायतेला जाण्याकरितां बोटीवर बसेपर्यंत माझे दिवस गडबडीचेच गेले. त्यानंतर मात्र तितकेंसें करमलें नाहीं. मुंबईचें बिऱ्हाड मोडून मी पुण्याला आलें. मग एकच व्यवधान. भय्या येण्याचा दिवस उगवतो आहे केव्हां? ते मधले दिवस भारीच कंटाळवाणे गेले एवढें खरें! सूर्य नेहमींसारखाच आपलें कार्य करीत होता. पण आमची उत्कंठा? तीच आम्हांला कंटाळा आणीत होती! तिच्या धावेला कोण टिकणार? कोण किंमत देणार?

पण ते दिवस कसेबसे घालविले. भय्या यायच्या पूर्वी चारपांच दिवसच वहिनी माहेराहून आली होती. ती आल्यापासून बरीक मला बरेंच करमायला लागलें. इतकेंच नव्हे तर घरीं बरेंच चैतन्य उत्पन्न झाल्यासारखें झालें! वहिनी आज आली. चार दिवसांनी भय्या येणार! हें सर्वांच्या तोंडांत होतें; हें खरेंच. पण वहिनीचें या खेपेचं वर्तन देखील किती सुधारलं होतं! तिच्या वागणुकींत जमीन-अस्मानचा फरक येतांक्षणीं सगळ्यांना दिसला. मागल्या खेपेची ही वहिनी नव्हे असें मला वाटलं. तसाच अनुभव आईला आला; तेंच मावशीला पण आढळून आलें!

वहिनी आल्यावर पुस्तकें घेऊन एकसारखी आपल्या खोलींत मुळींच बसली नाहीं. स्वयंपाकाच्या वेळीं आपणहोऊन स्वयंपाक घरांत जाऊन मावशीला "मी काय करूं?" नाहींतर "हें मी करतें" असें विचारून–बोलून दिसेल तें व करतां येण्यासारखें असेल तें काम चट्कर करूं लागली. आईजवळ वेळोवेळीं जाऊन, तिच्या प्रकृतीबद्दल विचारून "मी औषध देतें; थर्मामिटर मी लावतें." असें म्हणून ती प्रत्यक्ष तें करायला लागली. मिळूनमिसळून वागायला लागली. माझ्याशीं अगदीं मायेनें बोलायला लागली. आमचं मेतकूट चांगलंच जमलं! आतां माझी वहिनी प्रेमळ

आनंदी-मनमिळावू झाली. त्यामुळें ती आतां मला किति किती आवडायला लागली! मावशी प्रशंसा करूं लागली. आईला बरं वाटूं लागलं !

हें कसं काय झालें होतें, देव जाणें! सुशिक्षित काय नी अशिक्षित काय ? जुन्या रीतीची काय नी नव्या चालीची काय ? सूनबाई सासरीं मिळूमिसळूं लागली, बोलूं वागूं लागली म्हणजे सासरच्या माणसांना बरं वाटायचंच !--

आमच्या कुणाच्या लक्षांत आलं नाहीं. पण वहिनीच्या या खेपेला एक झालं होतं. तिऱ्हाईतनजरेला किंवा तितकेंच सूक्ष्म पाहाणाराला तें समजलं असतं; बाबांनीं सूनबाईंना कधीं हांक मारली नाहीं; कसलं काम सांगितलं नाहीं; कीं कांहीं विचारलं नाहीं. त्याप्रमाणेंच वहिनी बाबांच्या पुढें गेली नाहीं. त्यांना वाढायला आली नाहीं कीं त्यांच्या ताऱ्याला उभी राहिली नाहीं ! बाबा जेवायला आले कीं ही बाहेर. बाबा बाहेर आले म्हणजे वहिनी आंत. असें चाललेलं असे. पण हें कोणाच्या कसें लक्षांत येणार ? बाब अगदीं क्षुल्लक ! त्यांतून लक्षांत यायचं पण लगेच दोन दिवसांनीं आम्हीं मुंबईला भय्याला उतरून घ्यायला गेलों. भय्या आला. आनंदाचा प्रचंड पूर लोटला. त्या एवढ्या मोठ्या आनंदाच्या पुरांत बारीकसारीक गोष्टी केव्हांच चट् साऱ्या वाहून गेल्या. त्या राहाणार कशा ?--

दुसरे दिवशीं सकाळीं भय्या आपल्या सासुरवाडीला जायला निघायचा होता, तर त्याच्या आदल्या रात्रींची हकीकत आहे. आम्हीं सर्वजण आईच्या खोलींत जमलों होतों. सूर्य मावळायला चालला होता. त्याचे किरण पश्चिमेच्या खिडकींतून घुसून आईला त्रास देत होते; म्हणून हिरव्या कापडाचा पडदा खिडकीवर सरकविला होता. आई उशाला डोकें टेकून स्वस्थ पडली होती. तिच्या पायथ्याशीं भय्या बसून तिचे पाय हलके हलके दाबीत होता. जवळच मावशी पलीकडे डोळ्यावर चष्मा चढवून माझी चोळी बेतण्यांत गढली होती. मी पलीकडच्या एका खोलगट खुर्चीत स्वतःला कोंबून बेऊन भय्यानें विलायतेंत जमविलेल्या असंख्य चित्रांचें आल्बन आणलें होतें, तें चाळीत राहिलें होतें. वहिनी आईच्या उशागतीच होती. तिनें नुकतांच आईला औषधाचा डोस दिला होता. औषधा-

मुळें बेचव झालेल्या तोंडांत टाकण्यासाठीं वहिनी आईकरितां सोलून देण्यांत गढली होती.

बोलण्यासारखा विषय कसलाच निघाला नव्हता. कुणी कांहीं तरी बोलायला सुरुवात करायची म्हणूनच कीं काय कोण जाणें, मावशी सहज म्हणूनच भय्याला उद्देशून म्हणाली, "ऐकलंस कांरे भय्या, ही तुझी बायको आतांशीं कुठं आम्हां माणसांत येते आहे बरं कां !–आतां कशी छान वागते––"

"म्हणजे पूर्वी मग कशी वागत होती ?" भय्यानें थट्टेच्याच आवाजांत विचारलें––

"पूर्वी पण चांगलीच वागत होती. पण तिचं वागणं आम्हांला कळत नव्हतं. तिन कसं वागावं हें आम्हाला सांगता येत नव्हतं ! त्या कारणानं सगळा घोटाळा उडून जाई !"

"असें का ?" भय्या एवढेंच म्हणाला. आई व मी मावशीकडे जराशा ध्यानंच पाहूं लागलों. आमची फटकळ मावशी आतां कुठपर्यंत तारंगण लावणार ? अशी मला शंका आली. मी तिला डोळ्यानं दाबणार होतें. पण मावशीकडे पाहिलें तों मावशी वर कशाला पहाते आहे ? तिचे डोळे हातांतल्या कामावर खिळलेले ! माझा नाइलाज झाला. मावशीचें पुढें चालू होतें:––"बाकी भय्या, मी नाही रे बाबा, तुझी बायको शिकलेलीन सवरलेली म्हणून तिची कधीं मुरवत ठेविली ! चुकलेलं दिसलं कीं चांगली ठणकावून बोलत होतें. म्हणे, येऊन जाऊन होईल काय ? ही आपल्या नवऱ्याला सांगेल–तुला सांगितलं तर तूं काय करणार आहेस माझं ? उन्हांत घर बांधणार आहेस थोडंच ! मीं हिला एकदां स्वच्छ सांगून टाकलं होतं कीं, तुलाही भीत नाहीं नी तुझ्या नवऱ्याला पण भीत नाहीं. मला दिसेल तें मी बोलणार ! मग माझं कोण काय करणार असतील तें करूं देत !—"

"पण मावशी, तूं बोललीस म्हणून बिघडलं कुठं त्यांत ? तुमचा बोलण्याचा अधिकारच असतो !" भय्यानें मावशीला असें उत्तर देऊन जणूं काय तिला बोलायला उत्तेजनच दिलें.

" तसं नव्हे रे ! अलिकडच्या या शिकलेल्या मुलींना बोललेलं खपलं पाहिजे ना ! तुझी बायको तरी माझं ऐकून घेत होती म्हणतोस कीं काय ? अरे, मुळींच नाहीं. मी बडबडे, बडबडे ! पण हिचं ऐकतय कोण ! सगळं वाळूंत पाणी ओतल्यासारखं करायची बरं का ? आपलें ते खरें हिचें ! मी म्हणे, आमचा भय्या गेलाय सातासमुद्राच्यापलिकडे ! तो परत येईपर्यंत आम्हाला बोलायचं तें आम्हीं बोलूं तुला वागायचं तस तूं वाग. तो आला म्हणजे तो आहे न् तूं आहेस. हवं तसं वागा मग दोघही ! मग कांहीं मी बोलायची नाहीं कीं, दांता आड जीभ घालायची नाहीं. ब्र उच्चारीन तर मग बोल मला !—असं सांगितलं होतं तिला. अगदीं आज तुझ्या-समक्ष सांगतें आहें हें चोरून सांगत नाहीं, कीं एकाचं दोन करून सांगत नाहीं !—आतां तूं आला आहेस. पाहून घ्या परस्पर ! अन् तुला मला बर-वाईट म्हणायचंय तें खुशाल म्हण. समजलास ?—" पुन्हां मावशी थांबल्या. भय्या, आम्हीं ऐकतच होतों. वहिनीसुद्धां मधें अवाक्षर बोलल्या नाहींत. मधून मधून मावशीकडे व भय्याकडे सर्वे सोलींत असतां पहात होत्या. त्यांच्या तोंडावर मावशीच्या बोलण्यानें कांहीं फरक होत होता कीं नाहीं; हें कांहीं कळलें नाहीं. आई तिला ' नको होय ' म्हणण्याच्या विचारांत होती, पण मावशीचें लक्ष आपल्या हातांतल्या कामांत आणि बोलण्यांतच होतें. जरा वेळ मावशी सुईंत दोरा ओंवण्याकरितांच थांबली होती—थांबून पुढें म्हणालीच, " आतां तूं म्हणशील भय्या, कीं हें इतकं सांगायचं कारण काय ? मी काय तुला त्याबद्दल बोलतेय कीं काय ?—तें मला कबूल आहे ! पण त्याचं असं आहे, तूं आणि ती उद्यां तिच्या माहेरीं जातां आहांत. आतांपर्यंत तुला तिला बोलायला झालं नाहीं. वाटेंत तू तिला विचारणार, ती तुला सांगणार. मग तूं जें कांही तरी डोक्यांत माझ्याविषयीं वेड घ्याय-चंस. तें तसं होऊं नये म्हणून मी आतांच सारं सांगून टाकलं. बाबा, बाय-कोचं नवऱ्याला सगळ्या जगापेक्षां जास्त खरं वाटत असतं. म्हणून तर इतकं हें ! आम्हीं तिला वाटेल तितके बोललों—हवें तशीं बोललों; ती वाटेल तशी वागली, हवी तशी वागली. पण झालं तें गेलं. गंगेला मिळालं. आता कांहीं एक राहिलं नाहीं !— त्या वेळेला थिल्लरासारखी वागायची—तुझ्यान् तिच्यासमोर सांगायला मला कांहीं आतां हरकत नाही म्हणा, तर

त्या वेळेला तिच्या तरी अंगाला लागत होतं म्हणशील ? अरे छेः नाहीं ! कशी तरीच दिसत होतीन् झाली होती !--तीच आतां बघ ! आतां वागतीय चांगली नी दिसतीय पण कशी गौरीसारखी ! दृष्ट लागण्यासारखी दिसतेय ! माणूस सुधारलं म्हणजे वागतंय चांगलं आणखी दिसतंय पण चांगलं बरं का ? " पुन्हां मावशी थाबली ! भय्या मावशीचं बोलणं कौतकानें ऐकत होता आणि खो खो करून हंसत होता त्याला त्या बोलण्याची मौज वाटत होती. मावशीच्या सोज्वल अंतःकरणाची साक्ष तिच्या शब्दाशब्दांत त्याला मिळत होती. त्याला सात्विक आनंद होत होता. तो मधूनच हंसत माझ्याकडे, वहिनीकडे आणि मावशीकडे पहात असे. मावशी बोलत असतां वहिनीचा जीव मात्र टांगल्यागत होत होता कीं काय कोण जाणें !

पुढें मावशी फारसें बोलली नाहीं. एवढंच म्हणाली, " हें बघ भय्या, आतां तुझ्या बायकोनं कांहीं सांगितलं नी तू तिचा कैवार घेऊन बोललास तरी मला कांहीं वाटायचं नाहीं हो ! तिचें ऐकून आम्हांला बोलणार नाहींस किंवा आमचें हें ऐकून तिलाही छेडणार नाहींस असें आम्हांला वाटतं. अन् तसं करूं नयेस हेंच बरं ! समजलास ? बाकी असं करणार नाहींस म्हणा. कारण तूं आतां विलायतेला जाऊन आला आहेस ! शहाणा झाला आहेस. मोठा झाला आहेस ! शहाणी माणसं वेड्यासारखी—अडाण्यासारखी कशी वागतील —कां ग आक्का ?—होय कीं नाहीं ग ताई ? " असा मला व आईला मावशीने प्रश्न केला. तीच मनापासून हंसली. तिच्या कल्पनेप्रमाणें तिनें भय्याचा तो सात्वीक विनोदच केला होता ! आणि तें खरेंच नव्हतें का ?

बोलतां बोलतां आईचा किंचित् डोळा लागला. मावशीचेंही बोलणें थांबलें भय्याला चहा घ्यायची हुक्की आली, त्यानें मजकडे वळून म्हटलें, " ताई, चहा करतेस ? "

" कां ? " मी हंसत व जागेवरून उठत म्हटलें, " वहिनीला सांगायला लाज वाटते वाटतं ? चल वहिनी, देऊं या बाई चहा करून याला. नाहीं तर विलायतेच्या माणसाची मर्जी मोडायची न् लगेच डोक्यांत राख घालायला व्हायचें. " आम्ही चहाकरितां आंत गेलों. मावशीही दुसऱ्या

कसल्याशा उद्योगाला लागली. आमच्या कल्पनेप्रमाणें तेवढा वेळसुद्धां चांगला हंसत खेळत आनंदांतच गेला होता.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच स्टेशनवर जाण्याकरितां भय्या वहिनी दोघेही टांग्यांत चढले. टांग्यांत बसलेला पतिपत्नीचा जोडा कसा लक्ष्मीनारायणासारखा साजून दिसत होता. दोघांनींही हंसून 'येतों' अशी मान हलविली मीही मानेनेंच होय म्हटलें. किंचित् हंसलें! मला वाटलें--कदाचित् प्रेमातिशयानें असेल--माझ्या भाऊभावजयीला माझीच एकादे वेळीं दृष्ट लागायची! मनांत आलें नी टांगा दृष्टिआड व्हावयाच्या आंतच मी घरांत झटकलें! पण मला कुणी तरी विचारतयसं वाटलं, "मायेच्याच माणसांची दृष्टि लागते हो!" मी दचकलें! 'काय, माझ्या भाऊरायाला आणि त्याच्या बायकोला माझी दृष्ट लागली असेल?'

---

## प्रकरण १६ वें



## चलबिचल

"अरे, पांडोबा हा! आणि अशा उन्हातान्हाचेच!—पांडोबा, तुम्हांला कांहीं ऊन्हबीन आहे का नाहीं? बाकी तुम्हां शेकऱ्याला काय म्हणा? तुमचा जन्मच ऊन्हापावसांतला! जसें जसें ऊन्ह पडत जाईल तसतसा तुम्हांला नुसत्या वाट चालीला, ऊन्हाच्या कहरांत काम करायला, हुरूप यायचा. ते तुम्हांला हें ऊन्ह काय करणार!—नाहीं हो?—या, वर या असे. तिथेंच उभे कां असे?"

दुपारची वेळ. जेवण करून बाहेर जाण्याकरितां कपडे करण्याच्या

नादांत बाहेरच ओटीवरच्या इझिचेअरवर बाबा बसले होते. इतक्यांत पांडोबा दरवाज्याच्या आंत आले. उन्हानें त्यांचा चेहरा काळवंडला होता. घाम डबडबला होता. डोईचें मुंडासें आणि अंगांतलें खादीचें कुडतें मलीन झालें होतें. पायांतल्या दोन कानाच्या खेडवळ जोड्यावर वाटेंतील धूळ खंडीभर बसली होती. गुढघ्यापर्यंत पायदेखील मातीनें माखले होते. पांडोबाची आंत येण्याची गति अत्यंत मंद होती.

बाबांनीं " पांडोबा " म्हटल्यासारखा भास झाला म्हणून मी माजघरांतून आईच्या खोलीकडे जातां जातां सहज दारांतून डोकावून पाहिलें. तेव्हां पांडोबा शांतपणें सोप्यांत येऊन बसत होते. त्यांचें तोंड काळवंडलें होतें. कापाळावर, तोंडावर, डोक्यावरील मुंडाशाखालून घामाचे ओघळ घरंगळत होते ! पांडोबा प्रसन्नमुख, हंसत, असे कांहीं दिसले नाहीं. कां बरें ? उन्हांतून आले म्हणून कां त्याखेरीज आणखी कसलें दुसरें कारण असेल ?

" बसा पांडोबा, " बाबा त्यांना उद्देशून म्हणाले व सहज दाराकडे वळून पाहिलें तों त्यांना मी दिसलें; लगेंच मला सांगितलें, " ताई, आपले पांडोबा आले आहेत. त्यांना अगोदर पाण्याचा तांब्या आणून दे आणि त्यांचं पान वाढ बरं ! पांडोबा, अगोदर आतां जेऊन घे. मग सावकाश बोलत बसूं. आम्ही परवां तुझी वाट फार पाहिली. तुला निरोप पोंचला होता ना आमचा ?—"

" न्हाई बा ! कवा ?" असें कायसेसें तो आपल्या तोंडावरील निथळत असलेला घाम पुशीत पुटपुटला.

" नाहीं कां ? असं-असं ! " बाबा म्हणाले, " मग तुला आपला भय्या विलायतेहून आला आहे तें माहीत नाहींच तर ! "

" काय ? आपल भय्यासाब इलायत करून आल ? अन् कवा ? " हें पांडोबांनीं संतोषपूर्वक कौतुकानें आणि आनंदानें विचारलें ! " बेस झालं ! आनंद झाला ! भगवान् त्यास्नी उंदड आउख देऊ ! पर भय्यासाब आल कवा ?—"

" पंधरा दिवस झाले ना ? त्याच वेळीं तुला शेतावर निरोप धाडला

होता. म्हणूनच विचारलं कीं निरोप मिळाला कीं नाहीं; मिळाला असतां तर तूं आलाच असतास !—"

"जी !" पांडोबा मध्येंच उद्गारले. त्यांनीं अत्यंत औत्सुक्यानें इकडे तिकडे पाहिलें.

"भय्या गेला आहे पांडोबा, आपल्या सासुरवाडीला—"

"असं व्हय ? म्यां म्हटलं भय्यासाब आजून आंमदी कां करत्याती इक्ता वख्त ?"

"पण पांडोबा, मग तूं आज तरी कसा आलास ? शेतावरचं दुसरं कांहीं काम घेऊन आलास कीं काय ?"

त्याच वेळीं मीं स्वतांच पांडोबाकरितां पाण्याचा तांब्या त्याच्यापुढें आणून ठेवला. बाबांनीं आपलें बोलणें तितकेंच थांबविलें. पांडोबा मुंडासें व पंजी भिंतीशीं गोळा करून पायतोंड धुवावयाला उठले. मीं त्याचें पान मांडून बाहेर आणलें. पांडोबा आमच्या इथें आले म्हणजे त्यांची जेवायाला बसायची जागा अगदीं ठरलेली असायची. त्या जागेशिवाय कुठें दुसरे ठिकाणीं बसायचे नाहींत.

पांडोबा जेवायला बसले. जेवतांना शेतावरील गोष्टी निघाल्या. बाबा कांहीं कांहीं विचारीत होते. तेव्हां बाबांच्या प्रश्नांचीं तुटक तुटक उत्तरें देत होते. या खेपेला त्यांना बाबांच्या प्रश्नांचीं उत्तरें देणें जड जात होतें. त्यांना बरें वाटत नव्हतें; असें मला वाटलें. भय्याचं नांव निघाल्या वेळीं पांडोबाचा चेहरा मध्येंच जसा आनंदानें फुलून आलासा वाटला होता, तेंही आतां राहिलें नाहीं. आले त्या वेळी ते जितके उदास, दुःखी दिसले तसेंच जेवतांना त्यांचें झालें. पण बाबांचें अजून त्यांच्याकडे लक्षच गेलें नव्हतें. माझ्या मनांत एकदां दोनदां त्यांना विचारावें असें आलें; पण म्हटलं "काय आहे कोण जाणें ? जेवतांनाच कशाला विचारावं ? मग सावकाश विचारलेलंच बरं !" म्हणून मींही कांहीं विचारलं नाहीं.

पांडोबांचं जेवण झालं. बाबा बाहेर कामाला गेले होते, तेव्हां ते बोलणार कुणाशीं ? दमलेही होते. म्हणून जेवल्यानंतर थोड्या वेळानें, मुंडाशे, घोंगडी, पंजी वगैरे उशाशीं घेऊन, पाय पोटाशी आणून जेथ ते बसले होते त्याच कोपऱ्यांत नंतर कलंडले. त्यांना चगली झोप लागली.

झोंपून उठल्यावर त्यांनीं आईची चौकशी केली. तिच्यासमोर येऊन बसून बरेच कांहीं कांहीं बोलले. त्या बोलण्यांत भय्याची एकसारखी ते वाखाणणी करीत होते. तुम्हांला ते चांगले सुख देतील, असें सांगत होते. पण "जें सुख तुमच्या नशिबीं आहे, तें माझ्या नशिबीं अशा म्हातारपणीं नाहीं. परसूनें आपल्या व माझ्या सुखाला कोलीत लाविलें आहे;" असें कांहीं तरी ते सांगत बसले होते. त्यांची हकीकत ऐकून आईलाही हळहळ वाटत होती.

जें आईजवळ झालें, तेंच बाबांच्याजवळ संध्याकाळीं झालें. संध्याकाळीं बाबा बाहेरून आले. शांतपणानें ते आपल्या आरामखुर्चीवर बसले होते. पांडोबाही येऊन त्यांच्यापासून थोड्या अंतरावर मोठ्या अदबीनें बसले होते. त्यांचें बोलणें चाललें होतें. त्याच वेळीं पांडोबांच्या औदासिन्याचें कारण बाबांना कळलें. त्यांना अत्यंत वाईट वाटलें. तो दिवस, ती वेळ, तें पांडोबांनें आणि बाबांचें एकंदर बोलणें, या सर्वांचा परिणाम बाबांच्या मनावर कांहीं तरी चमत्कारिकच झाल्याखेरीज राहिला नाहीं. रात्रीच्या जेवणाच्या वेळीं बाबा कांहींसें आपल्याशींच कांहीं नाहीं तरी चार दोन वेळां तरी उद्गारले कीं, "काय या आमच्या पांडोबांच्या खडतर नशिबाला करावं ? काय करावं आतां त्यानें ! कसा जन्म काढावा ? आणि कशांत समाधान मानावं ? आनंद कसा वाटावा त्याला ?" आणखीही असेच कांहीं कांहीं बाबा आपल्याशींच बोलत होते. काय असेल तें असो; पण पांडोबाची हकीकत ऐकल्यापासून बाबांच्या मनाला अकारण अस्वस्थता उत्पन्न झाली होती. त्यांच्या मनाची चलबिचल होऊं लागली होती.

बाबा आणि पांडोबा संध्याकाळीं जें कांहीं बोलत होते आणि जातां येतां माझ्या कानावर जेवढें आलें होतें; त्यांत मी हें साधारण ऐकलें होतें—

"व्हय बाबासाब, माझ्या परसूची गत्ता अखीरीला अशी झाली बघा !—म्या नगु नगु म्हणून म्हनत व्हतों, पर हे त्यनं ऐकलंच नाहीं. एक दिस उठला—न्. ग्येला म्हमईला !"

"मग मुंबईहून परत कसा आला ?"

"कुठला आला ! म्यां जाऊन त्येला आनला नव्हं ?"

" तूं कां आणलास ? त्याच्या मागें कां लागलास ? त्याची एकदां झीट जिरली असती म्हणजे तो आपसुख परत आला असता ! " बाबा म्हणाले.

" त्ये बराबर ! म्या बी तोच डाव रचला व्हता ! पर नशीब न्यारच करून बसल नव्ह का ! त्येला मी काय करूं ! म्हमईला ग्येयला. गप्प बसलों. म्हटलं चार दिस जाईल न् मग ईल कटाळून !–पर ग्येला. लोखंडाच्या कारखान्यांत शिरला. तथचं वरनं लोखंडाचं डोईवर वझं घेऊन येतांना खालीं ज्यो पडला, हाबाकला; त्यो जल्मातनंच ऊठला ! हात मोडला, पाय तुटला, आन् डोक्स बी चेचून त्येचा चुरा झाला ! मग मला शेजारीबाबाचं कागूद आला कीं अस् नव्ह असं हाय; तवा जेवलां असला तर हात धुयाला हात या. अदुगर गाडींत पाय द्या !–कागूद वाचलान म्हमईला गेल्यों. बघीतलं तर ही दशा ! आतां बोलून फायदा का म्हटलं ! घेतलं पोराला. गाडींत घातलंन् घेऊन आलों घरला ! आतां माझ्या म्हातार-पनीं मला ज्यो पोरगा उपेगाला याचा; त्याचीच चाकरी म्यां मरसतवर कैराया होवी हें कपाळाला आलंया ! असं हाय माजं कपाळ !–आतां म्यां आपली शेतवाडी कशी करूं ? आन् सोल्डी तर आमचं म्होरं व्हनार कसं अन् मग आम्हीं करनार काय ? खानार काय पोटाला ? "

पांडोबा याप्रमाणें एकेक वाक्य सावकाश बोलत होते. नीट त्यांना बोलतां देखील येत नव्हतें. मध्येंच ते थांबत, धोतराचा पदर डोळ्याला लावून डोळे टिपीत नंतर पुढें सांगूं लागत. त्याचा परसू–एवढा मोठा झालेला. आतां शेतवाडी त्यानेंच अंगावर घेऊन चालवायाची; तर त्याच वेळीं दुसऱ्याच्या नादानें मुंबईला जायचा त्याला छंद लागला. शेवटीं मुंबईहून जायबंदी होऊन आला. कायमचा निरुपयोगी झाला. पांडोबांचें हृदय फुटत होतें ! आतां आपल्याला जगांत विचारणार कोण ? परसूला पुसणार कोण ? भाकरीचा तुकडा मिळायचा कसा ? शेती व्हायची कशी ? पोराच्या छांदिष्ट-पणानें आपल्याला दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहात राहाण्याची पाळी आली. अशा कारणानें पांडोबा हताश–दीन–निराश झाले होते !

बाबांचा जीव कळवळला. पांडोबांना त्यांनीं अनेक प्रकारांनीं धीर दिला. परसूला त्या खेड्याला न ठेवतां इकडे आणूं. दवाखान्यांत ठेवूं. दवापाणी करूं आणि त्याला पूर्वीसारखा खडखडीत बरा करूं. त्याला

काय लागेल तो खर्च आपण करूं. त्याबद्दल काळजी करूं नकोस. परसू हा माझ्या मुलाप्रमाणेंच मी समजतों. होऊं नये आणि त्याच्या हातून घसरलं आहे. पण त्याला इलाज नाहीं. मी तें सारें करतों. तूही शेतवाडीची दगदग करूं नकोस. आपला इथें घरीं खुशाल पडून राहा. जेवणखाण करून नुसता घरीं पडला राहिलास तरी तूं मला जड होणार नाहींस. परसू पुन्हां शेतीच्या कामाला लायक होईपर्यंत तुझ्याच सल्ल्यानें दुसरीं माणसें शेतींत घालून काम चालवूं पण तूं चिंता करूं नकोस. परसूला तावडतोब दवाखान्यांत आणण्याची व्यवस्था करूं." असं पांडोबांना बाबा वरचेवर सांगत होते; त्यांची समजूत घालीत होते.

परसूला दवाखान्यांत आणण्याच्या विरुद्ध पांडोबा होते. त्या अडाणी लोकांना दवाखान्याची विलक्षण भीति वाटते. त्यापेक्षां घरच्याघरींच काय होतील ते उपाय करावेत, पण दवाखान्यांतले ते अमानुष हाल नकोत, असें त्यांना वाटत असतें. व त्यांत पुष्कळसें तथ्यही असतें. म्हणूनच पांडोबांनीं आपण होऊन परसूला दवाखान्यांत नेलें नाहीं; किंवा बाबांच्या त्या सांगण्यालाही त्यांनीं कबुली दिली नाहीं. त्यांनीं परसूला त्याच्या आईच्या स्वाधीन केलें. फिरते वैदू येत होते, त्यांच्याकडून उपचार करण्याचा उपक्रम चालू केला होता. आणि नशिबाला हात लावला होता !

बाबांच्या सांगण्याप्रमाणें पांडोबा कांहीं दिवसांकरितां शेतवाडीवर मात्र गेले नाहींत. नव्हे, बाबांनी त्यांना जाऊंच दिलें नाहीं. त्यांच्या मनाची स्थिरस्थावर होईपर्यंत त्यांना ठेवूनच घेतलें. तेही मुकाट्यानें राहिले. पांडोबासारखा सद्वर्तनी, कष्टाळू, प्रेमळ, विश्वासूक प्राणी कोणाला जड होणार ? बाबांच्या इच्छेबाहेर तेही गेले नाहींत. पांडोबांची स्थिति परसूच्या-मुलाच्या बाबतींत कशा अनुकंपनीय आहे, आणि आपली स्थिति भय्याच्या–मुलाच्या बाबतींत कशी स्पृहणीय, समाधानकारक,आनंददायक आहे, अशी कल्पना अधूनमधून बाबांच्या मनांत येणें अपरिहार्य होतें. त्यांच्याच कशाला, आम्हां सर्वांच्या मनांत ते विचार किती वेळां तरी येत ! मला तर बाबूराव आणि त्याच्या घरचीं चित्रें डोळ्यापुढें उभीं राहात. पांडोबा–परसूचें विचित्र चित्र डोळ्यांपुढें येऊन मनाची कालवाकालव करून टाकी; आणि दुःखांत सुख म्हणा वाटेल तर आमच्या

घराची स्थिति आठवून मनाला त्यांतल्यात्यांत बरें वाटे! आनंद होई! मधुरसुखाची झुळूक शरीराला आणि मनाला स्पर्श करून जाई!

भय्यानें बाबांना किती तरी सुखी केलें होतें. अभिमानाला जागा करून दिली होती. बाबूरावाच्या घराचें जसें झालें आहे—पांडोबाच्या संसाराची जशी विपरीत अवस्था डोळ्याला दिसत आहे, तसा प्रकार—मनचिंती तें वैरी न चिंती!—इडापिडा टळो अमंगळ पळो!—आमच्यावर कस लाही अमंगळ प्रसंग न येवो!—

विचार करतांना असे वेडेवांकडे देखील विचार येत. मी त्या दुष्ट विचारांना थांबविण्याचा प्रयत्न करून त्यांना धुडकावून लावीत असें. बाबांचेंही कित्येकदां असेंच होत असे कीं, काय कोण जाणें! पण पांडोबा घरीं आल्यापासून त्याची, त्याच्या मुलाची हकीकत ऐकल्यापासून बाबा कधीं कधीं एकटेच असले म्हणजे अगदीं चिंतातुर दिसत. त्याच्या चिंतेचा विषय "पांडोबासारखी तर आपल्यावर कधींकाळीं पाळी येणार नाहीं ना?" असा नसेल कशावरून?

कांहीं शुभ व्हायचं असलं म्हणजे प्रथम शुभचिन्ह घडत असतात म्हणतात; तसेंच कांहीं अनिष्ट व्हायचं असलं म्हणजे अशुभचिन्हंही दांत विचकीत पुढें ठाकतात; त्यासारखंच झालं होतं कीं काय कुणास ठाऊक! पांडोबांना येऊन दोन कीं तीनच दिवस झाले होते. त्या एका रात्रीं बाराच्या पुढें—दारापुढें टांगा उभा राहिल्या सारखें वाटलें. दाराला धक्का दिला गेला. "दार उघडा" असा आवाजही ऐकल्यासारखे वाटले. बाबा पडल्या-पडल्या कांहीं तरी वाचीत होते; पांडोबा बाहेरच होते, पण त्यांच्यावरही झोपेचा अंमल चढत होता. मावशी घोरायलाही लागली होती. मी व आई अजून झोंपी गेलों नव्हतों. बोलतच होतों. इतक्यांत बाहेर भास झाला. मी कंदील घेऊन जायला निघालें; तों पांडोबा जागे होऊन दरवाजा उघडायला गेलेले मला दिसले, दरवाजा उघडला. आंत भय्या आला!—

"अगबाई! भय्या? अन् या अवेळीं? एकटाच!—इतक्या लवकर!" माझी गडबड उडाली. मी मागें वळून "आई, भय्या आला!" असें म्हणून पुढें आंगणांत भय्याकडे जाऊं लागलें.

" आँ ? भय्यासाब ! तुम्हीं अन् असं अववक्ताला कसंव ? " पांडोबा भय्याकडे पहात जरा आनंदयुक्त आश्चर्य दाखवीत उद्गारले !

" अरे ! भय्या ! अशा भलत्या गाडीनें कसा आलास ? वहिनीला आणिली नाहींस वाटतं ? तुला त्या माणसांनीं इतक्यांत सोडल कसं ? पुढं पत्रबित्र देखील पाठवायला सुचलं नाहीं कीं झालं नाहीं वाटतं ? स्टेशनवर कुणी आल नसतं का ? —" याप्रमाणें मी पुढें होऊन त्याला विचारीत सुटलें. बाहेर कांहीं गडबड चालली आहे हें ऐकून बाबा आपल्या खोलीचें दार उघडून बाहेर आले. त्यांचें लक्ष भय्याकडे गेलें. एकदम त्याला पाहून माझ्यासारखेच ते चपापल्या सारखे झाले.

" भय्या असा एकटाच कसा ? " हें त्यांच्याही मनांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. ते कांहीं तरी असे विचारणार होते—पण कां कोणजाणें ते विचारतां विचारतांच थांबले. भय्या आंत आला, तो तडक आपल्या खोलीकडे चालता झाला. तो कोणाशींच कांहीं बोलला नाहीं पांडोबाकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं. दरवाजा कुणीं उघडला हें त्यानें पाहिलें नाहीं. माझ्या अनेक प्रश्नाला त्यानें एकही उत्तर दिलें नाहीं. बाबा समोर दिसले, तरी त्यांच्याकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं. बाबांना त्यानें नमस्कार केला नाहीं ! तो खोलीकडे वळला. मी त्याच्या पाठोपाठ गेलें. माझ्या हातांत कंदील होता. भय्याला खोलीकडे जातांना दिव्याची देखील जरूरी भासली नाहीं. मीच आपली वेड्यासारखी त्याच्यामागें गेलें. त्यानें खोलीचें दार उघडलें. कसे बसे आंगांतले कपडे काढले; टोपी कुठें तरी फेंकली. आणि आपल्या कॉटवर कसेंतरी धाडकन त्यानें आंग टाकून दिलें. " हा ऽऽ हा ऽ ऽ ! हा ऽ ऽ ! असा दीर्घ उद्गार काढीत त्यानें आपलें मस्तक दोन्ही हातानीं पकडलें ! माझ्याशीं तो एकही शब्द बोलला नाहीं ! माझ्या तिथल्या अस्तित्वाची त्याला जाणीव होती कीं नाहीं हेंही कळलें नाहीं. मी झटकन कंदील जवळच्या तिकोनी टेबलावर ठेवला. धांवत भय्याजवळ गेलें आणि त्याच्या अंगाला हातलावून पाहिलें. मस्तकावरून हात फिरविला. आंग तापलें नव्हतं. पण कडक होतें. डोक्याच्या बाजूच्या शिरा मात्र ताडताड उडत होत्या ! तोंडाकडे पाहिलें. तोंड काळवंडलें होतें. डोळे निस्तेज झाले होते. भय्या भेसूर दिसूं लागला होता !—

" भय्या–भय्या—" मी धाबरून गेलें. " काय होतंय रे तुला ! बरें का वाटत नाहीं ? " भय्यानें कांहीं एक उत्तर दिलें नाहीं !–मी गडबडून गेलें. भय्याला असं काय तें झालें आहे ? भय्या बोलत कां नाहीं ? असा चमत्कारिक कां वागतो आहे ? मला कांहीं कळेना. तो बोलेना मला चैन पडेना !—

" भय्या—" मीं केवीलवाणी हांक मारली !—

" आई ग !—" हृदयाला पाझर फोडणारा एकच उद्गार भय्याच्या मुखांतून आला !

" भय्या ! काय होतंय तुला ? तूं असा कां करतो आहेस ? " मी तोंडानें कांहीं तरी विचारीत होतें. त्याच्या तोंडाकडे मी एकसारखी टक लावली. त्याच्या अंतःकरणाचा ठाव घेण्याची माझी आत्यंतिक इच्छा होती. मी दुबळा प्रयत्न करीत होतें. भय्याही त्या वेळीं माझ्याकडे पहात होता ! अगदीं पापणी लवविल्याशिवाय पाहात होता ! पण त्याला माझ्याकडे पाहावत आहे ही जाणीव नव्हती. त्याची दृष्टी शून्य होती ! कुठें तरी पाहात आहे; मी त्याच्याकडे पाहात आहें हें त्याला मुळींच कळत नव्हतें !

मला तिथून उठवेना. बसवेना ! असें होऊन गेलें ! बाबांना जाऊन घेऊन यावें. त्यांना हा प्रकार सांगावा. आईच्या नाहीं तरी मावशीच्या कानांवर घालावें; असें मला वाटूं लागलें. भय्याच्या प्रकृतींत कांहीं तरी जबरदस्त बिघाड झाला आहे. मनांत विलक्षण चलबिचल उडाली आहे, खास ! सासुरवाडीला जातानाचा भय्या हा नव्हे ! असें मला आढळून आलें !

सासुरवाडीला भय्याला करमलें नाहीं का ? तिथें फार दिवस राहणें आवडलें नाहीं, परवडलें नाहीं का ? सासुरवाडींत भय्याचा कसला भयंकर अपमान तर झाला नसेल ? सासरा बोलला असेल कीं सासूबाईनीं कांहीं कुचकेपणा केला असेल ? कां आपली शहाणी वहिनी कांहीं तरी कुरापत काढून भय्याशीं भयंकर भांडली असेल ? भय्यावर तुटून पडून त्याचे वाभाडे काढले असतील ? भय्या जातांना जसा आनंदानें फुलून गेला, तसा

येतांना अपमानानें जळून आला होता कीं काय ? पण कळायचें कसें तें ! भय्या कांहींच बोलत नव्हता; तर समजायचें कसें ?

पांडोबा सोप्यांत अजून जागेच बसले होते. झोंपमोड झाली होती. त्या झोंपेची आराधना चिलीम फुकीत त्यांची चालली होती. बाबांच्या खोलीचें दार उघडेंच होतें; बाबा खोलींतल्या खोलींत येरझारा घालीत होते. त्यांच्या पहिल्या विचारांत भय्याच्या अनपेक्षित येण्यानें विक्षेप आला होता. ते आतां कसले विचार करीत येरझारा घालीत होते, त्यांचें त्यांनाच माहीत !

मी कशीबशी तेथून उठलें. भय्या सकाळीं केव्हां निघाला असेल, केव्हां जेवला असेल, वाटेंत उन्हानें त्रास झाला असेल. तेव्हां अगोदर कांहीं तरी चटकन् करून खाऊं घालावें, म्हणजे तितकेंच त्याला बरें वाटेल; मग सावकाश त्याच्याकडून एक एक गोष्ट काढून घेऊं. आतांच आपल्याला आणि त्याला तरी रिकामा त्रास हवा कशाला ? असा विचार करून भय्याजवळून मी उठलें नी निघालें. मी दारापर्यंत गेलें असेन नसेन त्यावेळीं:—

" ताई—" अशी भय्यानें मला हांक मारली. मी मागें वळून पाहिलें. दोन पावलें मागें आलें. पुन्हां तो बोलला नाहीं कीं, त्यानें कसली खूणही केली नाहीं. तो माझ्याकडे वळून पाहात होता. तो मला आतां कांहीं तरी सांगणार आहे, अशी माझी कल्पना झाली; मी मागें वळलें. त्याच्या जवळ आलें.

" ताई, कुठें निघालीस तूं ?—कुणाला यावेळीं उठवूं नकोस. त्रास देऊं नकोस ! मला कांहीं एक होत नाहीं समजलीस ?—नाहीं तर सगळं घर जागं करशील आणि इथें गोळा करशील ! " भय्या एकदम बरेंच बोलून गेला. मी तिथून निघालें तशी त्याला कल्पना झाली कीं, मी बाबांना, मावशीला आणि आईलाच हें सांगायला आणि त्यांना बोलावायला निघालें आहे. म्हणून त्यानें मला मुद्दाम हांक मारून थांबविलें:—

" भय्या, मी कुणाला यावेळीं उठवीत नाहीं. मीच तुला कांहीं तरी खायला करतें ! केव्हांचा कुठें जेवला असशील. भूक नाहीं का लागली तुला ?—"

" नाहीं ! मला कांहीं खायचं नाहीं ! तूं कांहीं एक करूं नकोस ! मुकाट्यानें तूंही जाऊन नीज ! "

भय्यानें सांगितलें. मी तशीच जागच्याजागीं उभी राहिलें. तो कांहीं एक करूं नको म्हणतो; तर करायचें कसं ? त्यांतून केलं कांहीं मी तर त्यानें तें खाल्लें पाहिजे ना ?

भय्या बोलता झाला होता; म्हणून त्याच्याजवळ जाऊन बसलें आणि हलकेच त्याला विचारूं लागलें:—

" भय्या–"

त्यानें माझ्याकडे नुसतेंच पाहिलें.

" भय्या, तुझें कांहीं दुखतंखुपतंय का ?–"

" नाहीं ताई ! "

" मग तूं असा संत्रस्त कां झाला आहेस ?–"

उत्तर नाहीं !

" भय्या, सांग ना रे मला काय असेल तें ! मला नाहीं का सांगायचं ? सासुरवाडींत तुझा कुणी अपमान कां केला ?-" मीं विचारलें.

" माझा अपमान ?–आतां मान काय आणि अपमान काय ?–सगळं सारखंच आहे मला ! " भय्या कांहींसें आपल्याशींच उद्गारला. मी जास्तच बुचकळयांत पडलें.

" काय ? भय्या, तुझा तिथें अपमान झाला ? कुणीं केला ?--कसा झाला ?--"

" छट् ! " मध्येंच शुद्धीवर आल्यासारखं करून भय्यानें मला उत्तर दिलें: " काय म्हणत आहेस तूं ? माझा अपमान कोण करणार ? कारण काय ?--कांहीं नाहीं तें !- तू आपली स्वस्थ झोंप जा कशी ! "

मी तिथून उठलें नाहीं. किती वेळ तरी आम्हीं स्वस्थ होतों. खिडकींतून बाहेर शून्य मनानें भय्या पाहात होता. मी त्याच्याकडे तो पाहात होता तिकडे वेड्यासारखी पाहात होतें. मध्येंच आकाशांतून एक उल्कापात झाला. मला कमेसेंच झालें. भय्याकडे मी लगेंच पाहिलें. त्याच्या मनांत काय चाललें होतें, किंवा उल्कापात पाहून त्याच्यांत कांहीं फरक झाला झाला कीं नाहीं, याचें ज्ञान मला मुळींच झालें नाहीं !

"होय भय्या," मीं मध्येंच कांहीं तरी मनांत येऊन विचारलं, वहिनी कशी आली नाहीं तुझ्याबरोबर ?"

भय्यानें मीं काय विचारलें तें एकलें सुद्धां नाहीं. तो कुठें तरी पाहात होता. त्यानें माझ्या विचारण्याला उत्तर दिलें नाहीं. त्यानें आईची पूस-तपास केली नाहीं कीं, कांहीं नाहीं. मला मात्र पुष्कळ वेळानें अगदीं निक्षून सांगितलें, "ताई, आतां इथून जा न. आतां कां उगाच इथं जागत बसली आहेस ? तूं इथून गेलीस तर—" मीही मग तिथें थांबलें नाहीं. मला वाटलें, आतां भय्या झोपेल. त्याला चांगली सडकून आणि शांत झोंप आली म्हणजे उद्यां उठल्यावर त्याला आपोआपच बरें वाटेल, निदान आतांच्या इतका तरी त्याच्यावर परिणाम राहणार नाहीं ! मी दारापर्यंत गेलेली पाहिल्यावर भय्या म्हणाला "हें पहा, ताई, जा तूं, जाऊन झोंप जा. पण यांतलं कांहीं कुणाजवळ बोलू नकोस अं !"

"काय ?" मा म्हटलें त्यानें मला काय बजावलें हें समजलें नाहीं; म्हणून मी 'काय ?' असा स्वाभाविकच प्रश्न केला. "कुणाजवळ काय बोलायचं नाहीं ?"

पण नंतर "कांहीं नाहीं ! तें आपलें—मी आपलें--तूं आतां जा म्हणजे झालें !" एवढेंच बोलला आणि दुसऱ्या कुशीवर वळला. मी कंदील घेऊन बाहेर आलें. आपल्या झोंपायच्या जागेकडे गेलें.

दुसरे दिवशीं भय्या लवकर उठला नाहीं. त्याच्या बदललेल्या वृत्तींत फरक झाला नाहीं. त्याच्या वृत्तींत बदल पडला आहे हें घरांत समजल्या-शिवाय कसें राहणार ? भय्याकडे बाबांनीं पाहिलें; त्या वेळीं त्यांना तर चर्रर्र झालं ! वृत्ति बदललेली. वागण्यांत, बोलण्यांत, सगाटून फरक पडलेला ! बाबांना तें बरें वाटलें नाहीं. ते त्याला बोलावून कांहीं तरी विचारायचे, तर तो बाबांचे वारेच पडून घेईनासा झाला. बाबा माडीवर आले कीं हा खालीं. बाबा खालीं आले कीं हा आईच्या खोलींत. बाबा तिथें आले तर भय्या तिथून उठलाच. तसाच दुसरा एक फरक त्याच्यांत दिसून आला. त्यानें मावशीशीं बोलणें, तिच्याकडे पाहणें, वगैरे सर्व टाकलें. जसें बाबांना तो टाळू लागला; तसेंच मावशीविषयींही तसें करूं लागला. त्यानें बाहेर जाणें टाकलें. बाहेरचे स्नेहीसोबती यायला लागले तर त्यांची भेट घेई-

नाश झाला–इतकेंच काय पण खोलीचें दारही उघडीत नसे. विलायतेहून आल्या वेळचा त्याचा आनंद–उल्हास–पार कुठच्या कुठें नाहींसा झाला ! त्याचीं व्याख्यानें संपलीं. तो आनंदाचा-सुखाचा काळ संपला–अगदीं आठबारा दिवसांच्या अवधींत संपून गेला. भय्याचा चेहरा काळवंडला-तर साऱ्या घरादाराची ती अवस्था झाली. भय्या दुःखी दिसूं लागला, तर त्या दुःखाची कळा साऱ्या घरावर पसरली ! कळी कोमजली म्हणजे तिच्यामुळें निर्माण झालेली सभोंवतालची शोभा जशी नाहींशी होते तसेंच आमच्या घरीं झालें होतें. जो तो आणि जी ती आपापल्यापरी भय्याचें भेसूर तोंड हंसरें करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असे ! तो अलीकडे कुणाशींच बोलेनासा झाला होता. बोलायची लहरच आली तर एक माझ्याशीं किंवा आईशीं ! नाहीं तर कुणाशींच नाहीं. आणि तेंही त्याला वाटलें तर त्यानें बोलायचें, आम्हांला वाटलें तर नाहीं !

असा विलक्षण फरक भय्यांत पडला ! कां पडला आहे, हें कुणालाच कळलें नव्हतं; त्या फरकाचा परिणाम कशांत होणार, याबद्दलची कुणालाच कल्पना करतां येत नव्हती ! मी कित्येकदां खोलीच्या दाराच्या फटींतून भय्याच्या हालचाली काय चालल्या आहेत, हें पाही, तेव्हां ' केव्हां भय्या ढळ ढळ रडतो आहे, तर केव्हां हाताच्या मुटी वळून तो आपल्या मस्तकावर जोरजोरानें मारून घेत आहे, असें दिसे. कधीं कांहीं तरी भराभर लिहीत आहे ' असें दिसे.

भय्याचें चित्त चलित झालें होतें. आमचे जीव उडून गेले होते. बाबांच्या मनाची चलबिचल चांगलीच होऊन गेली होती. त्यांचा जीव खालीवर होत होता. बाबांचा मूर्तिमंत आनंद म्हणजे भय्या ! त्याची तऱ्हा ही झाल्यावर बाबांच्या जिवाचें काय होणार ? भय्याच्या काळवंडलेल्या तोंडावरची काळी छाया बाबांच्या तोंडावर आणि मनावर दिसूं लागली ! जिथें बाबांची ही अवस्था, तिथें, आई, मी, मावशी–आमचें काय झालें असेल तें कल्पनेनेंच जाणलें पाहिजे. नाहीं नाहीं तें मनांत यायला लागलें. भलभलत्या शंकाकुशंका मनाला टोंचायला–बोंचायला लागल्या ! आठपंधरा दिवसांपूर्वी आम्ही सारेजण सुखाच्या कड्यावर जाऊन चोहोंकडे पहात होतों. पण त्या कड्यावरून आमचा तोल आतां सुटला आहे, व आम्ही

कुठें तरी भलत्याच बाजूला घसरणीला लागलों आहोंत, अशी भीतिप्रद जाणीव भय्याच्या बदललेल्या वृत्तीमुळें एकसारखी धक्के देऊं लागली होती ! कुणालाच कळत नव्हतें कीं, उद्यांचा उगवणारा दिवस आम्हांला काय पाहावयाला लावणार आहे ! कोणतें दुःख भोगायला लावणार आहे !

---

## प्रकरण १७ वें

### खग्रास !

मला तर पक्कं वाटायला लागलं कीं भय्या आणि वहिनी यांच्यांत कशा-वरून तरी जंगी खटका उडाला असावा; त्यावरून भय्यानें आपल्या जिवाचा असा सत्यनाश चालविला आहे ! पण काय हें कसें कळणार ? माझ्या मनांत एकदां असं सुद्धां येऊन गेलं कीं परस्पर वहिनीला एक पत्र पाठवावं आणि तिच्याकडून समजावून घेण्याचा प्रयत्न करावा. भय्या वहिनीबद्दल नांव काढीत नव्हता, कीं कुणीं नांव काढलं तरी त्याला तें आवडत नव्हतं ! जसा इकडे भय्यांत फरक पडला, तसाच बाबांच्या मध्येंही फरक दिसू लागला. त्यांनीं एकदां अगदीं सहज म्हणूनच सांगून ठेवलं कीं "भय्याचा मेंदू थकल्यासारखा झाला आहे. त्याला आवड-णार नाहीं तसलं कांहीं बोलूं नका. किंवा तो उदास राहील तर त्याला एकट्याला फारसं सोडूंही नका. त्याला बरं वाटेल असं त्याच्याशीं बोलत जा. त्याचं ऐकत जा म्हणजे झालें !" असं जसं त्यांनीं मला सांगितलं होतं; तसंच पांडोबा शेतवाडीवर म्हणून जायला निघाले, त्या वेळीं बाबांनीं त्यांना मुद्दाम राहवून घेतलें. त्या दिवसांनंतर दोन कीं, तीनच दिवसांनीं असेल, संध्याकाळची वेळ असेल, बाबा आणि पांडोबा कांहीं तरी हलके हलके कुजबुजत असलेले मला दिसले होते. त्यांत भय्याचं वरचेवर नांव

येत होतं. पांडोबांच्या परसूचाही उल्लेख झाला होता. " भय्याबद्दल मला काळजी वाटूं लागली आहे. माझं हृदय हलून गेलं आहे. डोळयांत तेल घालून त्याला जपलं पाहिजे. त्याला किंचित् संशयसुद्धां न येऊं देतां त्याच्या जवळपास कुणी तरी आपल्यापैकीं असायला पाहिजे असं मला वाटतं. त्यांत अशा वेळीं तूं त्याच्या जवळ अवश्य असायला पाहिजे." अशा अर्थाचं कांहीं तरी बोलल्यासारखं मला वाटलं. त्या बोलण्याचा मला कांहीं अर्थ कळला नाहीं; तरी मनाला चुटपुट मात्र लागली. सारं बोलणं ऐकलंच नाहीं तर त्याचा अर्थ तरी कसा समजणार? बाबा यापैकीं कुणाजवळ कांहींच बोलत नव्हते. आईजवळ कांहीं बोलायची सोय नव्हती. त्यांतल्यात्यांत एवढें बरें होतें कीं जेव्हां भय्या आईजवळ येऊन बसे, त्यावेळीं त्याच्यांत पुष्कळ बाह्य फरक दिसून येई. आईशीं अत्यंत प्रेमानें, मोकळेपणानें बोले. हंसे. आईला बोलवी. त्यामुळें भय्यांत पडलेल्या फरकाची कल्पना आईला मुळींच नव्हती! सूनबाई मुलाबरोबर आली नाहीं, याबद्दल आईला फारसें चमत्कारिक वाटलें नाहीं. भय्यांत बदल झाला आहे हें मावशीच्या ध्यानांत आलें होतें; पण त्याबद्दल ती दुसऱ्या कोणाजवळ बोलली नाहीं; कीं भय्यालादेखील तिनें विचारलें नाहीं. कशी विचारणार? विचारलें असतें, पण एक दिवस त्यानें तिच्याकडे अशा कांहीं विलक्षण नजरेनें पाहिलें कीं, त्या त्याच्या पाहाण्यानेंच मावशीला "दे माय धरणी ठाय!" झालं! भय्यानें असं तिरस्कारानें, उपहासानें, तुच्छतनें कां पाहिलें; याबद्दल ती स्वतःशींच विचार करूं लागली. तिला जेव्हां एक दिवस अगदीं रहावेनाच तेव्हां ती मजजवळ बोलली, " काय ग **ताई**, भय्यानं हें असं काय मांडलं आहे? तो असा कां वागतो आहे? तो सासुरवाडीहून आल्यापासून हा असें करायला लागला! बोलायचं काय त्याला? मी एकदां विचारणार होतें; पण तो माझ्याशींही कसासाच वागतो आहे हें तुझ्याही लक्षांत आलंच असेल. कां ग ताई, परवां गांवाला जातांना मी त्याच्या बायकोच्या कागाळया त्याच्याजवळ केल्या, त्याच्या देखत त्याला बोललें; तें तर त्यानें माझें बोलणं लक्षांत ठेवलं नसेल? त्याचसंबंधानें त्याच्याजवळ एकाचें दोन करून ती बोलली नसेल? नी त्याचा परिणाम म्हणून तर तो आतांशा माझ्याशीं असा तुसडेपणानें वागत नसेल? तो असं वागू लागल्या-

पासून माझ्या मनाला नाहीं बाई बरं वाटलं ! एकदां तूं तरी त्याला विचारून पहा ग !" पण मी मावशीला तरी काय बोलणार ? बरं आहे म्हटलं नी तें तितकंच सोडून दिलं.

जो तो आपापल्या ठिकाणीं विचारांत गढलेला; अशी आमची सर्वांची अवस्था होऊन राहिली. भय्याच्या वर्तनांत दिवसादिवसाला कांहीं तरी नवाच फरक पडायला लागला ! एक दिवस माझ्याशीं, आईशीं, पांडोबाशींसुद्धां खूप बोलायचा, खूप हंसायचा ! तर दुसरे दिवशीं खोलीला आंतून कडी घालून बसावयाचा. कोणाशीं अवाक्षर बोलायचा नाहीं. जेवायलासुद्धां बाहेर यायचा नाहीं.

मी धाडस करून एक दिवस कुणाला कळूं न देतां वहिनीला एक पत्र टाकलें. उत्तराची वाट पाहूं लागलें. वहिनींनीं उत्तर धाडलें नाहीं. मी जास्तच गूढांत पडलें. आतां अगदीं निश्चितच झाल्यासारखें झालें होतें कीं बाबांना आणि मावशीला भय्या टाळतो आहे. बाबा दिसले किंवा त्यांच्या संबंधानें विषय निघाला कीं तो गांगरून जाई आणि मावशीबाईचा वारा अंगावरून गेला तरी त्याच्या तोंडावर तिरस्काराची लकेर खेळून जाई, हें अगदीं ठरल्यासारखें झालें होतें.

एकदां बाबांनीं मला एकटीलाच गांठून अगदीं मोजक्या शब्दांत सांगितलें, " ताई, सध्यांचं बिघडलेलं वातावरण तुझ्या ध्यानांत आलेंच आहे. भय्याला बरें वाटत नाहीं; कांहींतरी त्याच्या मेंदूंत विकृति झाली आहे. पण तो सांगत नाहीं. बोलत नाहीं. त्याच्याबरोबर तुला देऊन त्याला महाबळेश्वर, माथेरान, सिंहगड, किंवा बेळगांवसारख्या ठिकाणीं महिना दोन महिने मोकळेपणानें पाठविलें तर थोरपालट होऊन त्याला हुशारी वाटेल, त्याच्यांत फरक वाटेल का ? तूं त्याला विचारून पहा. त्याला बेत पसंत पडला तर तशी तयारी करा, माझी कांही त्याला हरकत नाहीं !" एवढेंच सांगून ते तसेच तिथून झटकले. माझ्या उत्तराची वाट पहावयालाही ते तेथें थांबले नाहींत.

बाबांचा विचार मलाही आवडला. मी तो भय्याच्या कानांवर घालण्यासाठीं संधि पाहूं लागले. त्याच्या खोलीचें दार उघडें पाहून मी हळूंच आंत डोकावलें. भय्यानें मला पाहिलें. त्याला काय वाटलें कुणास ठाऊक

त्यानें "ये ग ताई, अशी आंत ये. दारांतच का ?" असें आपण होऊन-नच म्हटलें. मला तेंच हवें होतें. मी आंत गेलें, भय्याच्या जवळच एक खुर्ची ओढून घेऊन बसलें. बोलायला सुरुवात कशी करावी या विचारांत मी आहें तों भय्याच बोलला:—

"ताई, आपण कांहीं दिवस महाबळेश्वरला नाहींतर माथेरानला जाऊं या का ? अशा कुठल्यातरी ठिकाणीं जाऊन आपल्याला रहावंसं वाटायला लागलं आहे. पण बरोबर तूं, आई, पांडोबा वगैरे मंडळी हवी आहेत. एरव्हीं जाण्यांत तितकी मौज नाहीं !"

मी त्याच्याकडे चकितपणें पहायला लागलें. मी जें विचारायला गेलें, तोच नेमका विषय भय्यानें कसा बोलायला काढला ? कां बाबांचें माझें बोलणें त्यानें ऐकलें होतें ? कांहींच कळेना ! मी त्याला उत्तर काय देऊं ? हीही पंचाईत मला पडली. मी बोलत नाहीं हें पाहून तोच पुन्हां म्हणाला, "मी समजलों तूं कां बोलत नाहींस तें ! आईला आजारी स्थितींत आपल्या बरोबर कशी न्यायची होय ना ? मला तीच अडचण आहे ! आपल्या सुखाकरितां आजारी आईला काय म्हणून त्रास द्यायचा ? नाहीं का ? पण मग जाऊन तरी काय करायचें ?–"

"पण–" कायसेसें मनांत येऊन चट्दिशी तो थांबल्यावर मी बोलून गेलें, "नये आईला नेऊं. तिला न्यायला हवं आहे असं कुठं आहे ? आपल्याला जायला कोणती हरकत आहे ? फार तर परस्पर वहिनीला बोला-वून घेऊं म्हणजे झालें !"

वहिनीचं नांव निघालं मात्र ! विजेचा करंट चालू झाल्यावर तारेच्या टोंकाला हात लागला असतां सर्वांगाला जसा झटका बसतो; तसा भय्याच्या सर्वांगाला झटका बसल्याप्रमाणें झालें. त्याचें आंग, शरीर, डोकें, मान, हीं हललीं ! मी तें पाहून भयभीत झालें. माझ्याकडे भय्यानें त्या वेळीं अशा कांहीं तीव्र नजरेनें पाहिलें कीं पुसूं नका ! त्या झटक्यासरशी तो मला कांहीं तरी बोलणार होता. त्याचे ओंठ हलले; पण शब्दच बाहेर आले नाहींत ! किती वेळ आम्ही त्याच अवस्थेत होतों. बाबांच्या सांगण्याप्रमाणें भय्या बाहेर कुठें जायला तयार होईल, आणि तयार झाला तरी बाहेर

त्याला बरें वाटेल असें कांहीं मला वाटेना ! मी बाबांना उलट सांगू तरी काय, असें मला होऊन गेलें !

भय्या अस्वस्थ झाला. क्षणादोंक्षणापूर्वींची त्याच्या मुखावरील क्षणिक चमकणारी प्रसन्नता कुठच्याकुठें लुप्त झाली. त्याची दृष्टि शून्य झाली ! तो कुठें तरीच पाहूं लागला. एक क्षण तर असा गेला कीं, त्या क्षणीं मला वाटलें, भय्याला माझ्या अस्तित्वाची जाणीव तरी आहे कीं नाहीं कोण जाणें ! भय्याच्या मनःस्थितीचें निदान आम्हां कुणाला होईना. त्यावर उपाययोजना काय करावी हें कुणाला सुचेना ! आम्हां सगळयांना भय पडलें होतें कां, न जाणों, असेंच भय्याचें चमत्कारिक वर्तन कांहीं काळ राहिलें तर त्याचें वेडांत देखील रूपांतर व्हायचं ! त्याच सुमारास भय्याच्या कांहीं महिने अगोदर विलायतेहून "आय्. सी. एस्." ची परीक्षा देऊन आलेला एक तरुण वेडा झाला, असं वर्तमानपत्रांतून कळलें होतें. त्या कारणानें तर आमचे जीव भय्याकरितां टांगल्यासारखे होऊं लागले होते. मी देवाला दर दिवशीं भय्याकरितां नवससायास तरी किती किती करीत होतें ! त्यांतून आतांशा तो थोडासा बेछूटही वागायला लागला होता. संध्याकाळीं कुठें फिरायला जाई. केव्हां मला बरोबर घेई तर केव्हां पांडोबा बरोबर असत. नव्या पुलावरून फिरायला जातां येतां मध्येंच कठड्यावरून खालीं प्रवाहाकडे पहात राही, आणि कांहीं तरी मध्येंच हुक्की येऊन तो बोलून जाई कीं, "पुलावरून वांकून पहात असतां झोंक जाऊन मनुष्य जर खालीं पडला तर वांचणें कठिणच नाहीं ?" असें म्हटलें म्हणजे माझ्या उरांत धस्स होई, मी भय्याला नकळत मागे खेची. तो मागें मजकडे पाहून नुसता हंसे आणि म्हणे, "हें काय ताई, माझा का तोल जात होता ? तूं तरी हीच आहेस !"

तसेंच रेल्वेलाईनकडे फिरायला गेलों म्हणजे आगगाडीखालीं पडून लोक जीव कसे देत असतील, याची आठवण त्याला हटकून व्हायची. तो त्या वेळीं येणाऱ्या किंवा जाणाऱ्या गाडीकडे लक्षपूर्वक पहात असायचा. मग त्याच्या त्या पहाण्याचा काय अर्थ असे त्याचा तोच जाणें ! कधीं तरी आईजवळ बसलेला असला, आणि ती कांहीं दुखतखुपत असल्यानें

कण्हत असली म्हणजे त्यानें आईच्या जवळ सहजपणें बोलून जायचें कीं, “ आई, तूं अशी कण्हूं लागलीस म्हणजे आम्हांला बरेंच वाटत नाहीं. तुझं कांहीं बरंवाईट झालं तर आम्हांला तें कसें सहन करवेल याबद्दल कल्पनाच करवत नाहीं. त्यापेक्षां श्रीधर कवींच्या “ माझा मृत्यु ” या त्यांच्या प्रसिद्ध कवितेंतल्या प्रमाणें आपलीच अवस्था व्हावी, असें मला मनापासून वाटतें. आपणच तुम्हां सर्वांच्या अगोदर सर्वांच्या डोळ्यासमोर मोलाचं आणि भाग्याचं मरण पत्करावं; असंच मनांत येतं ! ” आई त्याच्याकडे केवीलवाण्या नजरेनें पहात राही आणि क्षीण आवाजांत भय्याला म्हणे, “ भय्या, असं वेडंविद्रं बोलूं नये कधीं ! चारी वेळां कांहीं सारख्या नसतात ! इडापिडा टळो नी अमंगळ पळो ! पुन्हां असं अभद्र वाईटवकटं बोलत जाऊं नकोस बाळा ! जगांत जें जें सरळ व्हायचें असतें तें तें तसंच व्हावं लागतं. त्यांतच मौज असते ! समजलास ! पुन्हां असलं बोलत जाऊं नकोस हो ! माझ्या गळ्याची तुला शपथ आहे ! ” मग तो बोलता बंद राही !

पण केव्हां तरी मध्येंच त्याचें आपलें मृत्यूचें तत्त्वज्ञान उत्पन्न होई. समोरून धावती मोटार आली, विजेची ४६० होल्टेजची पेटी दिसली कीं, “ मृत्यु किती माणसाच्या जवळ वावरत असतो ! ” असें भय्या म्हणून जाई ! मी त्याच्या तोंडावर पटकन् हात ठेवी; “ पुरेत ते तुझे अमंगल विचार. मृत्यूशिवाय तुला दुसरं बोलायला कांहीं सुचत नाहीं काय ? ” असें म्हणत मी डोळे पुसूं लागे. तेव्हां भय्याही आपलें बोलणें बदली !

× × × ×

आपलें कांहीं वागण्यांत चुकत असावें अशी कल्पना येऊन म्हणा, किंवा आणखी कांहीं अन्य कारणानें म्हणा, गेल्या चारपांच दिवसांपासून भय्याच्या वर्तनांत बराच फरक दिसूं लागला होता.तो कुढ्यासारखा वागतांना दिसे; तो त्याचा कुढेपणा गेला. मावशीच्या वाऱ्याला उभा न राहणारा भय्या आतां तिच्याशीं हलकें हलकें बोलूं लागला. बाबांच्या खोलींत आपण होऊन मला घेऊन जाऊन इकडच्या तिकडच्या गोष्टीं बोलूं लागला. आपल्या भावी आयुष्यांतील विचारासंबंधानेंही त्याचें बोलणें होऊं लागलें. तो सर्वांशीं अगदीं पहिल्यासारखा वागूं लागला. मला बरें वाटलें. आईला

व मावशीला आनंद वाटूं लागला. पांडोबांनाही समाधान वाटल्याचें दिसूं लागलें. बाबांकडे पाहिलें तर त्यांच्या ठिकाणीं मात्र अनिश्चितपणा दिसून येत होता. त्याचें कारण कळत नव्हतें. विचारणें शक्य व इष्ट नव्हतें. मी त्या आनंदाच्या भरांत वहिनीला एक पत्र देखील पाठविलें कीं, "भय्या आतां पहिल्यासारखा चांगला वागूं लागला आहे. तुझं त्याचं पूर्वी भांडण झालं असलं तर अशा वेळीं तूं आल्यानें दुधांत साखर पडल्यासारखं होणार आहे. तेव्हां तूं लवकर ये!"

पण वहिनी कांहीं आली नाहीं. अजूनही वहिनीबद्दल बोललेलें भय्याला खपलं नव्हतं! विलायतेचीं पत्रें नियमितपणानें येत होतीं. त्यांत भय्या-बद्दल एकसारखी चौकशी असायची. भय्यालाच पहिल्यापहिल्यानें कांहीं पत्रें येत. भय्याच त्याची उत्तरें लिही, पण पुढें भय्याच्या प्रकृतीचें हें असें झाल्यापासून तो पत्रें किंवा उत्तरें लिहिनासा झाला होता. उत्तरें किंवा पत्रें लिहिण्याचें माझ्याकडे आलें होतें. भय्याच्या प्रकृतीची हकीकत मला निरुपायानें कळवावी लागली होती. त्याच्या प्रकृतींतलें चढउतार दूर देशच्या मंडळींना काळजी न लागेल अशा रीतीनें लिहिण्याची मी जितकी सावध-गिरी बाळगिली होती; तशीच सावधगिरी बाबूरावाच्या हकीकतीसंबंधानें मला सावधानता राखावी लागली होती. त्यांतून चार दोन वेळां तरी भय्यानें बाबूरावाचें नांव काढून चौकशी केलीच होती. आम्हांला त्या वेळीं बाबूरावाच्या तुरुंगवासाची बातमी भय्यापासून लपवायला कोण प्रयास पडले! खरें सांगितलें असतें तर भय्याच्या मनावर भलताच परिणाम नसतां कां झाला?

भय्याला बरें वाटूं लागलें आहे, तो आतां नीट वागूं लागला आहे, असें जेव्हां पांडोबांना वाटूं लागलें, तेव्हां त्यांनीं बाबांच्याजवळ घरीं जायला परवानगी मागितली. त्या बिचाऱ्याचाही जीव आपल्या आजारी परसूकडे लागून राहिलाच होता. पण बाबांनीं पांडोबांना परवानगी दिली नाहींच! त्यांनीं सांगितलें, "गाडी पाठवून परसूला व त्याच्या आईलाच इकडे आणवूं या. पण तुम्हांला मी येथून पाठवीत नाहीं. भय्याच्या बदललेल्या मनावर अजूनही माझा विश्वास नाहीं. मला तशी खात्री वाटूं लागली म्हणजे मग मी तुम्हांला सोडीन. तेथपर्यंत तुम्ही आमच्याजवळून हलूं

नये. " एवढें सांगून बाबा थांबले नाहींत, तर पांडोबांचें चित्त पुन्हां द्विधा होऊं नये, म्हणून लगेच आपले विचार त्यांनीं अंमलांतच आणले. परसूला व त्याच्या आईला आणण्याकरितां गाडी धाडून दिली.

बाबांना भय्याबद्दल अजून भरंवसा कां नव्हता कोण जाणें !

× × ×

तो बुधवारचा दिवस होता. काय असेल तें असो सकाळपासून भय्या विलक्षण आनंदी दिसत होता ! माझ्यानें रहावेना म्हणून त्याच्या त्या तसल्या आनंदाचें कारण देखील त्याला विचारलें. त्यानेंही अगदीं तितक्याच झोकांत सांगितलें, " माझ्या जगाच्या प्रवासाचा बेत मी मुक्रर केला आहे. त्या प्रवासाला शक्य तितक्या लवकर आरंभ करणार आहें. आजच माझ्या मुंबईच्या एका स्नेह्याचें पत्र आलें असून त्यानें लिहिलें आहे कीं, मुंबईस व्यापारी सृष्टींत आपला एक दक्षिणी मनुष्य शिरला आहे व त्यानें त्या सृष्टींत चांगलेंच यश संपादन केलें आहे. ते गृहस्थ म्हणजे भा. दि. गरवारे ' मोटरडीलर ' त्यांच्याकडून माझ्या मित्रानें एक सुन्दर मोटर घेतली असून तो लवकर माझ्याकडे मोटर घेऊन येणार आहे. त्याच्याबरोबर मींही त्याच्या मोटारींतून पर्यटनाला निघावें अशी त्याची इच्छा आहे !—"

" असं कां ? मग तुम्ही मोटारीनें कां जगाचा प्रवास करणार आहांत ?" मीं मोठ्या कुतुहलानें भय्याला विचारलें, " म्हणूनच वाटतं तुला इतका आनंद झाला आहे. भारी भय्या तूं धाडसी आहेस अं !–केव्हा प्रवासाला निघणार तूं ? "

त्यावर भय्या एकदम विकटपणानें हंसला. मी त्याच्या हंसण्याला भ्यालें.

" पाहूं या. प्रवासाचें कसें काय जमतें तें ! मी म्हणतों, प्रवासाला निघायचेंच तर दुसऱ्याच्या मोटारींतून कशाकरितां ? आपणाला काय !—"

" काय तूं घेणार ? " मी आनंदानें मध्येंच विचारलें. "भय्या, तूं जर मोटर घेतलीस, तर आपण येणार तुझ्याबरोबर प्रवासाला हं ! "

भय्यानें माझ्याकडे एकदां क्षणमात्र नुसतें लक्षपूर्वक पाहिलें. मला त्याच्या त्या विचित्र पाहण्याचा अर्थच कळला नाहीं. मीं त्याला विचारलें, पण भय्या, हें तूं बाबांना सांगितलेंस का ? ते काय म्हणाले ? "

" मी तें आज विचारणार आहें संध्याकाळीं; आपण सगळे एकत्र जमलों म्हणजे विचारीन." भय्यानें अगदीं सावधगिरीनें म्हटलें.

" वा: ! " मीं म्हटलें, " आज संध्याकाळीं कसें जमणार ? आज आपल्याला एकत्र जमायला तरी होईल का ? संध्याकाळीं बाबांचें आपल्या वाड्यापलीकडच्या पटांगणांत व्याख्यान आहे; तिकडे ते गुंतणार ! मी जाणार आहें, त्या हिच्याकडे बारशाकरितां ! मावशी पण त्याच वेळीं कुठेंशा जाणार आहेत ! मग संध्याकाळीं जमणार कसे आपण आणि विचारणार कसा ! "

" असं का ? " भय्यानें पृच्छा केली. त्याच्या डोक्याचें काय चक्र फिरलें कुणास ठाऊक त्याचा लय दुसरीकडेच लागला. " आज नाहीं तर उद्यां. त्याची काय इतकी घाई. " असें म्हणून मीं त्याला सोडलें आणि घरांत गेलें.

संध्याकाळीं बाबा व्याख्यानाच्या तयारीनें बाहेर पडले. मी आणि मावशी एकदमच आईला विचारून घराच्या बाहेर पडलों. आईला साधारण बरें वाटूं लागलें होतें. पण मधूनच कधीं तरी तिला अस्वस्थता वाटे. तसेंच आजही कांहींसें तिला झालें होतें. म्हणून तिला बाहेर जातांना मुद्दाम विचारावें लागलें. तिनें परवानगी दिली तेव्हां आम्हीं गेलों.

दुपारीं सारा दिवस भय्या आपल्या खोलींतच होता. काय करीत होता कोण जाणें ! त्याच्या जवळपास आम्ही नव्हतों, तरी पांडोबा होतेच. म्हणून आम्हांला तितकें कांहीं वाटलें नाहीं.

करकरीत तिन्हीसाजा झाल्या. भय्या खोलींतून घाईघाईनें बाहेर आला त्यानें इकडे तिकडे साशंक नजरेनें पाहिलें. पांडोबा पलीकडे होते. भय्याला पाहातांच ते जवळ गेले. त्यांनीं त्याला विचारलें, " काय साब ? बाहेर जायचंय आपल्याला ? मी संगतीं येऊं काय ? "

" नको ! "

" मग तुमच्याबरोबर कोण हाय ? सिनूव्ही का ? "

" होय ! "

" मंग, तुम्हान्सी काई हुव ? " पांडोबांनीं भय्याला विचारलें.

" बाबा कुठें आहेत ? "

" त्येंची सब्बा हाय ना पल्याड ! तकड मगाच गेल्याती ! "

" ताई कुठं आहे ? "

" त्या अन् मावशीबाई इकल्यांत बाहीर गेल्या नव्ह का ! तुमच्याच म्होर ! "

" तुम्हीं कुठं बाहेर जाणार आहांत ? "

" म्यां ? इस्पितळांत परसू पडलाय नव्ह ? त्याकडे जायचं व्हतं—पर आतां उद्यां जाईन. आज घरांत बी कुनी नाई "

" बरं मग असं कराल कां माझ्याकरितां ?

" काय करूं ? "

" आतां टपालची वेळ होऊन गेली आहे. सिटीपोस्टांत सुद्धां पत्रं टाकून भागायचं नाहीं. माझी हीं पत्रं अत्यंत महत्त्वाचीं आहेत. तीं आजच्या आज गेलींच पाहिजेत. त्याकरितां तुम्हांला स्टेशनवर जावं लागेल. माझ्याकरितां तुम्ही आतांच्या आतां स्टेशनवर हेलपाटा घ्याल ? मेल सुटायच्या आंत गेलं पाहिजे तिथें. मी पत्रांना लेट फी लावूनच देतों. " असें म्हणून भय्यानें झटपट पत्रांना तिकिटें लावलीं. पांडोबांच्या जवळ दिलीं. आणि त्यांना स्टेशनकडे दवडलें. पांडोबांना विचार करायला किंवा रेंगाळायला भय्यानें फुरसदच दिली नाहीं. एकदम व शक्य तितक्या लवकर स्टेशनचा रस्ता सुधारण्याची जवळ जवळ पांडोबांना भय्यानें आज्ञाच फर्माविली. पांडोबा पत्रें घेऊन तीं टाकण्यासाठीं स्टेशनवर जाण्याकरितां निघाले.

पांडोबा घराच्या बाहेर पडल्यानंतर सबंध घरांत राहिलं कोण ? आजाऱ्याच्या खोलींत आई, आणि बाहेर एकटा भय्या ! असं निर्मनुष्य घर—असा भयाण एकांत भय्याला लाभला ! तो असल्याच प्रसंगाची जणु कांहीं वाटच पाहात होता कीं काय ? कां असा एकांत लाभावा म्हणून खटपटच करीत होता ?—कोण जाणें !

पांडोबा बाहेर गेल्यापासून आम्हीं बाहेर गेलों होतों, त्या परत येईपर्यंत मध्यंतरी असा भय्याला एकांताचा काळ किती वेळ मिळाला होता ? आणि त्या तेवढ्या वेळांत भय्यानें काय केलें ?—

× × × ×

मी नी मावशी जशा एकदम बाहेर पडलों तशा एकदमच घरीं आलों. आंगण्यांत आलों तों एकदम भयाण वाटलें. घरांत कुणाचीच हालचाल वाटली नाहीं. दिवे लागण टळून गेली होती तरी दिवे मुळींच लागले नव्हते! आम्हीं झटपट आंत गेलों. पांडोबा दिसले नाहींत. कुणाचें अस्तित्व भासलें नाहीं. मी तडक आईच्या खोलीकडे वळलें, मावशी दिवे लावण्याच्या उद्योगाला लागल्या. आईच्या खोलींतला दिवा मीच लावला! आई जागींच होती. वाड्यापलीकडील पटांगणांतच बाबांचें व्याख्यान चालू होतें. हजारों लोकांचा समुदाय जमलेला होता. गोंगाट ऐकायला येत होता. मधून मधून टाळ्यांचा प्रचंट कडकडाट कानांवर पडत होता. बाबांच्या व्याख्यानाचा-बाबांचा प्रचंड गौरव—हास्याच्या-टाळ्याच्या रूपानें ऐकायला येत होता. आईला त्यांतल्यात्यांत बरें वाटत होतें. ती मला "ताई, स्वारीच्याच व्याख्यानाला या टाळ्या मिळताहेत नाहीं ग?––" असें म्हणत आहे, मी 'होकार' भरीत आहे तोंच बाहेरच्या टाळ्यांच्या कडकडाटाबरोबरच फाड् फाड् फाड् फाड् फाड् असे लागोपाठ कुठून तरी बंदूकीच्या आवाजाप्रमाणें आवाज कानांवर आदळले. आम्हीं दोघीही "हें काय? हे कसले आवाज? व्याख्यानांत कांहीं गोंधळ झाला काय?" या अर्थानें नुसत्याच एकमेकींकडे पहावयाला लागलों. छातींत उगीचच धड-धड व्हायला लागलें. तितकाच तो विषय सोडून बरें वाटण्यासारखें मी दुसरेंच आईकडे बोलणें काढलें. त्या बोलण्यांत आम्हीं दोघी रमतों आहोंत इतक्यांत बाबा बाहेरून व्याख्यान संपवून आले. त्यांच्या पाठो-पाठ थोड्या वेळानें पांडोबा आले. कपडे उतरण्यापूर्वीच बाबांनीं प्रथम भय्याबद्दल चौकशी केली. "भय्या कुठें आहे? कुठें गेला? केव्हां गेला? बरोबर कोण होतें?"

बाबांच्या प्रश्नाला समाधानकारक उत्तर कोणाकडूनच मिळालें नाहीं. भय्या घरांत नव्हता. बाहेर गेल्याचें कोणाला माहीत नव्हतें. पांडोबांनीं सांगितलें, "त्यांनीं दिलेलीं पत्रें टाकायला मी स्टेशनवर गेलों होतों, तों आतांच येत आहे. ते आपल्या एका दोस्ताबरोबर जाणार होते!" पण हें ऐकून बाबांना बरें वाटलें नाहीं. भय्या घरीं नाहीं, बाहेर गेल्याचें कोणाला माहीत नाहीं; तो एकटाच कुठें गेला; हें बाबांना समजल्यावर त्यांच्या

चेहऱ्यांत एकदम फरक पडला. त्यांची धांदल उडाली. पांडोबांना त्यांनीं भय्याच्या दोस्ताकडे धांवत जाण्यास फर्मावलें. ते अगोदर भय्याच्या खोली-कडे लगबगीनें गेले. भय्याच्या खोलीचें दार उघडेंच होतें. आंत कुणीच नव्हतें. पांडोबा बाहेर जाणार, त्याच वेळीं भय्यानें नवा जोडलेला स्नेही-ज्यांच्याकडे भय्या जाणार-तोच तिथें आला. त्याला विचारलें, तर त्यानेंच सांगितलें भय्या मजकडे आलाच नाहीं. म्हणून त्याच्याकरितां मीच इथें आलों!"

झालें! बाबांच्या काळजानें ठाव सोडला. "भय्या कुठें नाहींसा झाला असला पाहिजे!" या कल्पनेनें आमचे हातपाय गळले. तोंडचें पाणी पळालें. लायब्ररींत, नित्याच्या फिरायच्या बाजूला जाऊन यायला पांडोबांना सांगितलें, त्याशिवाय सुचेल त्या बाजूला आपणच जायचें, असें बाबांनीं ठरविलें. बाबांची आंतून बाहेर आणि बाहेरून आंत-इकडून तिकडे--अशी एकच तारंबळ उडाली. त्यांचे हातपाय लटलट कांपत होते. शब्द जड येऊं लागले होते. बाबांना भयंकर संशय-पिशाच्यानें पच्छाडलें होतें. मलाही कांहीं तरी विलक्षण घटना घडली आहे, असें एकाएकी वाटूं लागलें होतें. मी चपळाई करून अगोदर आईजवळ जाऊन बसायला मावशीला सांगितलें आणि बाबांच्याबरोबर राहावयाचें ठरविलें. बाबा हातांत कंदील घेऊन कांहीं तरी मनांत येऊन जिन्यावरून माडीवर निघाले, मीही त्यांच्या पाठोपाठ चाललें, कसें कीं कोण जाणें, माडीवर चढतां चढतां बाबांचें लक्ष सरळ तिसऱ्या मज-ल्याच्या दाराकडे कंदीलाच्या प्रकाशांत गेलें. कधींही विशेष कारणा-शिवाय तिसऱ्या मजल्याचें न उघडलें जाणारें दार बाबांना उघडें दिसलें. त्या अडगळीची जागा कोण उगीच उघडणार! बाबा दुसऱ्या माडींत शिरण्याऐवजीं वरचें दार उघडें पाहून तसेच पुढें चढले. कसेबसे ते तेथवर गेले. दारांत पाऊल टाकतात तो त्यांना पुढें काय भयंकर प्रकार दिसला?-बाबांनीं एकदम मोठ्यानें किंचाळी फोडली. त्यांच्या हातांतला कंदील हातांतून निसलटला. बाबा कोलमडले! मी मागें होतें म्हणून बरें झालें. तितक्यांत बाबांना मी कसेबसे सांवरून धरलें. कंदील वांकडा होऊन भडकण्याच्या किंवा एकदम जाण्याच्या बेतांत होता; तो तशा

घाईत मीं नीट केला. त्याच धांदलींत माझेंही खोलींत लक्ष गेलें! माझे डोळे मटकन् मिटले! माझी बोबडी वळली!

बाबांची किंचाळी ऐकून दारांतून बाहेर पडणारे पांडोबा तसेंच धांवत वर आले होते! आणखी जवळपासची मंडळी भराभर गोळा झाली होती!

हाय! हाय! त्या तिसऱ्या मजल्यावरच्या त्या अडगळीच्या जागेंत काय भयंकर प्रकार घडला होता? भय्याचे केस विसकटलेले, एका हातांत पिस्तूल तसेंच अजून होते. अंगांतला शर्ट तसाच अस्ताव्यस्त! छातींतून रक्त वाहात होते. डाव्या हातानें छाती दाबून धरण्याचा प्रयत्न केल्यामुळें सर्व हातही रक्तबंबाळ झाला होता. अंगावर, धोतरावर, आजूबाजूला रक्तानें नुसतें शिंपणें झालें होतें, भय्याच्या रक्ताकडे हाताकडे आणि हातांतील पिस्तुलाकडे भीतीनें, निराशेनें, वगैरे अनेक मनोवृत्तींनीं प्रक्षुब्धपणें पाहाणारे त्याचे वटारलेले डोळे अजून-प्राणोत्क्रमण झालें होतें तरी-तसेच वटारलेले होते! बाबांनीं भय्याच्यां शवावर तसेंच धाडकन् आंग टाकून दिलें. एकच टाहो फोडला! माझी गत काय झाली असेल हें सांगतां येत नाहीं!-हां हां म्हणतां खालीं आईला कळलें. वाड्यांत कळलें. वाड्याबाहेर कळलें! चोहींकडे एकच आकांत झाला!

× × ×

भय्यानें अशी आत्महत्या केली! बाबांच्या सुखाला, संसाराला, कायमचें खग्रास ग्रहण लागलें! बाबांच्या अंतःकरणावर वज्राघात झाला! आईच्या अंतःकरणावर कठोर कुऱ्हाड पडली! बाबांच्या घराण्याचा कुलदीपक स्नेहशून्य झाला! ती मर्तो तिन्हीसांज होती! घुबडें शेजारच्या चिंचेवरून घूत्कार करीत होतीं! कुत्रीं रडत होतीं! 'भय्या गेला! भय्या गेला! भय्या गेला!" जिकडून तिकडून एकच आवाज उमटत होता!

× × ×

भय्या! भय्या आईला रडत ठेवलंस, बाबांना धाय मोकलायला लावलीस, बहिणीला कायमची दुःखी केलीस! भय्या, काय केलेंस हें? कां केलेंस हें?—

पण याचें उत्तर द्यायला भय्या आहे कुठें आतां आमच्यांत ?—आतां कुणाला विचारायचें भय्यानें असं कां केलें म्हणून ? कोण या प्रश्नाचें उत्तर देणार ? भय्याच्या आत्महत्येला जबाबदार कोण ? कुणाला जबाबदार धरायचें ? काळाला, दैवाला, कीं देवाला ? कुणी तरी हें सांगेल का ?

---

## उपसंहार

भय्यानें आत्महत्येपूर्वी कांहीं पत्रें लिहून ठेवलीं-टाकलीं. एक विलायतेला, एक आपल्या बायकोला, एक बाबांना, आणि एक सरकारला ! विलायतेला काय टाकलें तें फार पुढें कळलें. घरीं आपल्या आत्महत्येमुळें सरकारी त्रास होऊं नये, नसतीं संकटें उद्भूत होऊं नयेत म्हणून. बायकोला काय टाकलें हें तसें कळलें नाहीं. पण घरीं राहिलेल्या पत्रावरून त्या पत्राचा अंदाज येण्यासारखा होता ! पण आतां काय करावयाचें ?—

× × × ×

बाबांना लिहून ठेवलेलें पत्र किती हृदयद्रावक आहे ! तें डोळ्यापुढें धरवत नाहीं. वाचवत नाहीं !

× × × ×

"भय्या विलायतेहून येण्यापूर्वीच वहिनीला दिवस गेले होते; पाप करणारा करून गेला होता. गांगरलेल्या वहिनीनें ऐन वेळीं खऱ्या पाप्याचें चांडाळाचें नांव न घेतां भय्याच्या कानांत खुद्द 'बाबां'च्या नांवाचें जालीम विष ओतलें होतें. तें खरें वाटावें म्हणून 'बाबा' आणि 'मावशी' यांचा घाणेरडा काल्पनिक संबंधही जोडून ती मोकळी झाली होती !

प्रति परमेश्वर असा पिता—असें पाप आचरील, हें भय्याला पटणें अशक्य होतें. पत्नीनें तर अचूक वार केला होता ! "आपलें पापकृत्य मामंजी मुलाला सांगतील. आपल्यावर चालविण्याचें तीक्ष्ण हत्यार त्यांच्याजवळ आहे." हें माहीत असल्यामुळें वहिनीनें तेंच हत्यार आत्मसंरक्षणाकरितां

अप्रबुद्धपणानें बाबांच्यावर उलटविलें होतें ! पण त्याचा किती परिणाम विपरीतच झाला !

भय्याचा चारीकडून कोंडमारा झाला होता. त्याला आपल्या कल्पनेप्रमाणें जगांत उजळ तोंडानें वावरावयाला जागा नव्हती ! बायकोचा पाय घसरला तर तिच्याकडे 'क्षमा' दृष्टीनें पाहाण्याइतकी शक्ति बायकोनें भलताच आघात करून व सत्य लपवून, अगोदरच नष्ट केली होती ! मृत्यूहून अपेश खोटें, असेंच त्याला वाटलें, म्हणूनच त्यानें आत्महत्या केली !

× × × ×

भय्यानें आपण आत्महत्या करायला कां प्रवृत्त झालों आहोंत, हें आपल्या पत्रांत लिहून ठवलें आहे; त्याचीं तीं मतें पुष्कळांना पटणार नाहींत. त्यानें असें केलें नसतें तर बरें झालें असतें. तसा वागला असता तर चाललें असतें; वगैरे पुष्कळ लोक म्हणतात, व म्हणतीलही; पण त्याचा उपयोग काय आतां ? व्हायचें तें केव्हांच होऊन गेलें आहे !

× × × ×

संसारांत जिकडे पहावें तिकडे हेंच मला दिसत आहे. हातातोंडाला आलेलीं फळें अशीं हातावेगळीं झालीं तर वडील कष्टी होणार नाहींत तर काय? पांडोबांचा मुलगा परसू मुंबईच्या कारखान्यांत पडून जन्माचा जायबंदी झाला आहे. म्हणून पांडोबा, दुष्कृत्यें करून बाबूराव तुरुंगांतली हवा खात आहेत म्हणून त्याचे वडील बापूसाहेब, आणि जन्मापासून अखेरपर्यंत भय्याकरितां बाबांनीं तन–मन–धन वेंचून त्याला सर्व श्रेष्ठ असा नागरिक बनविण्याचा चंग बांधून ह्या स्थितीला आणिलें; पण त्यानेंही अशा विलक्षण परिस्थितींत, ऐन वेळीं आत्महत्या करून घेतली म्हणून बाबा–आपापल्या जागीं हळहळत आहेत–तळमळत आहेत–दुःखी आहत, कष्टी आहत !–यांची समजूत कोणी, कशी करावयाची, याच्यावर जशा आपत्ती आल्या, त्या दुसऱ्या कोणावर न येण्याकरितां त्यांच्या त्यांच्या बाबतींत झालेल्या चुका दुरुस्त करण्याचें कुणी, केव्हां, आणि कसें मनावर घ्यावयाचें ? मी

बाबांचें सांत्वन करण्याचा सदैव प्रयत्न करीत असतें. पण 'भय्याला परत आणून बाबांना सुखी करण्याचें जसें देवानें माझ्या हातीं दिलें नाहीं; तसेंच बाबांचें सांत्वन होईल असं सामर्थ्यही माझ्यांत त्यानें ठेवलें नाहीं; त्याला मी तरी काय करूं !

बाबा मला तसें दाखवीत नाहीं. माझ्या बोलांनीं बाबांना संतोष वाटतो असें दाखवितात, पण तें मला पटत नाहीं ! त्यांच्याच सेवेचा एक प्रकार म्हणून त्यांच्या आणि भय्याच्या आयुष्यांतील माहितीची स्थूलमानानें ही हकीकत डायरीसारखी लिहिली आहे. ही माझी सेवा आपल्याला आवडेल असें बाबा म्हणाले—म्हणतात, म्हणूनच ही डायरी भरीत आणली आहे. माझी ही सेवा बाबांना जरा तरी कशी रिझवील देव जाणें !

भय्याच्या संबंधानें आणखी कांहीं तरी लिहावेंसें वाटतंय पण त्याच्या आठवणीनें हृदय भरून आलें आहे. डोळ्यांत अश्रूंनीं गरदी केली आहे. लेखणी लिहावयाला नाखुष झाली आहे, म्हणून, नाइलाजानें आतां इथेंच थांबतें !—

**यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मयाकृतम् ।**
**त्वयाकृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन ॥**



# भावंडांच्या भेटी



**काञ्चनगङ्गा** ( कवि श्री. **गिरीश** सदस्य रवि-किरणमण्डळ, पुणें नं. २; किंमत १॥ रुपया ) रविकिरणमंडळाचें हें १६ वें पुस्तक असून, त्याचे रचनाकार संग्रहकार, सुप्रसिद्ध कवि गिरीश असून प्रकाशकही तेच आहेत. या संग्रहाचा प्रारभ मे १९२०मधील ' विश्वकमल ' या विश्वप्रभूच्या नमनापासून करून संग्रहाची अखेर त्याच विश्वचालकाच्या चरणीं मार्च १९३० च्या ' अर्घ्यदान ' या कवितेंत करण्यांत आली आहे. कवितांची संख्या शंभर असून त्यांत प्रायः नव्याजुन्या वृत्तांचा यथावत् उपयोग उपयुक्तपणें केला आहे. भगवान शंकरांच्या मस्तकांतून उसळून महासागराच्या भेटीला गेलेली गंगा अखिल आर्यावर्ताला जशी चिरंतन शोभादायक, आत्मोद्धारक, संजीवक आणि सौभाग्यदायी झाली आहे, तशीच श्री. गिरीश यांच्या मस्तकांत उद्भत झालेली आणि त्यांच्या लेखणींतून अवतीर्ण झालेली प्रस्तुत काव्यमय काञ्चनगङ्गाही सांप्रतच्या महाराष्ट्रास शोभादायक झाली आहे. सौभाग्यदायीही ठरली आहे. भावी पिढीला उद्धारक आणि संजीवक होईल असा भरंवसा बाळगावयालाही आज श्री. गिरीशांच्या काञ्चनगङ्गेनें जागा करून दिली आहे; हे नूतन महाराष्ट्रीय कवि ' **गोपीनाथ** आणि ' **पाटील** ' यांच्याकडे पाहिलें म्हणजे कळून आल्याशिवाय राहणार नाहीं. अशा या निर्मळ, पावन, विशुद्ध अशा काञ्चनगङ्गेचें कौतुक आम्हीं आदरभावानें केल्याखेरीज कसें राहूं ?

**भावमन्थन** ( कवि श्री. **यशवंत**; सदस्य रविकिरणमण्डळ, पुणें नं. २; किं. ८ आणे ) कवि यशवन्त सांप्रत काव्यप्रांगणांत केवढ्या यशाचे धनि होऊन बसले आहेत, हें त्यांच्या गेल्या सालीं प्रसिद्ध झालेल्या " यशोधन " नें उत्तम प्रकारें सिद्ध करून दिलेलें आहे. त्यांनींच " **भावमन्थन** " रसिकांच्या हातीं नुकतेंच निराविलें आहे. यांतील भावमन्थनाचीं १४ सुनीतें जशीं काव्यरसानें थबथबलेलीं आहेत; त्याचप्रमाणें पुढील स्फुट कविताही प्राय: यशवन्ताच्या शुभयशांत भर टाकणारीच आहे. असें साभिमानानें सांगतां येईल. स्फुट कवितांत विशेषतः ' रे पतंग ' ' कुर-

कुर ' ' कल्पलतेस ' ' महाराष्ट्रगीत ' या तर नितांत रमणीयशा आहेत हें निःसंशय ! सारांशानेंच सांगावयाचें झालें तर यशवन्तांच्या कवितांबद्दल असें म्हणतां येईल कीं, ज्याप्रमाणें एकाद्या नवख्या माणसानें सुगंधी कृष्णंभट्टीची चिमुट नाकाजवळ नेली म्हणजे ती सुगंध तर देतेच; पण त्याबरोबर झणझणीत शिंक आणून मेंदूला एक प्रकारची नवी तरतरी आणते, तोच प्रकार यशवन्तांची कविता अनुभूति देत असते. ह्याच पुस्तकाच्या बाह्यांगांत काय पण अलिकडील रविकिरणमण्डळाच्या पुस्तकांत– ' सुधारक ' ' यशोधन ' ' काञ्चनगङ्गा ' ' उमरखय्याम '–इत्यादींत इंग्लीश पुस्तकांच्या तोंडांत मारण्याइतकी प्रगती झाली नसली तरी त्यांच्याबरोबरीनें खास तयारी केली आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं !

**दुर्वांकुरः**—( कवि श्री. गोपीनाथ. प्रकाशक व मुद्रक श्री. गोपाळ बळवंत जोशी, आनंद छापखाना, सदाशिवपेठ, पुणें; किंमत ८ आणे. ) नूतनोदित महाराष्ट्रीय कवि श्री. **गोपीनाथ** यांनीं आपला चिमुकला काव्यसंग्रह ' दुर्वांकुर ' या नांवानें काढिला असून त्यास साजेशी प्रोत्साहक प्रस्तावना सुप्रसिद्ध प्रबंधकार आणि टीकालेखक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं लिहिली आहे. या छोटेखानी संग्रहांतील कविता थोड्या सूक्ष्मपणानें पाहतां कवीजवळ नूतन काव्यनिर्मितीची बहुविध सामग्री योग्य प्रकारें जमत असल्याचें नजरेस येतें. कल्पना आणि तिची आविष्कृति, भाषा आणि तिच्यावरचा अधिकार, वृत्तांचें विविधत्व, आणि तीं पेलण्यांत पटाईतपणा, वगैरे कौतुकास्पद तयारी कवि मजकुरांजवळ आढळून येते. कविमजकुरांनीं संग्रहांत कविता रचूनच श्री. गिरीश यांचें प्रत्यक्ष गुरुत्व कबूल केलें असून निवेदनांत प्रो. माधवज्यूलियन यांचाही गौरवपूर्वक उल्लेख केला आहे; हें त्यांस भूषणास्पद आहे. परंतु जरी त्यांनीं तो उल्लेख केला नसता तरी या कवीची " पुण्यभूमीस " आणि श्री. गिरीश यांची " पुण्यपुरीस ", गोपिनाथांची " दोन स्मारकें " आणि गिरीश यांची " विश्रामबागेजवळ " या कवितांच्या कल्पनांतील साम्य विरोध पाहिला आणि भाषेंतील कांहीं कांहीं ठिकाणचा ठसकेदारपणा ध्यानांत घेतला म्हणजे गिरीश व माधवज्यूलियन या श्रेष्ठ कविद्वयांची छाप गोपी-

नाथांच्या कवितेवर आहे हें निदर्शनाला आल्याखेरीज राहात नाहीं; इतकेंच नव्हे, त्या कविद्वयांच्या कल्पनांचा पांगुळगाडा कवि गोपीनाथ अजून वापरीत आहेत; अजून त्यांना स्वतंत्रपणें धावण्याचा धीर करवत नाहीं असें वाटतें. पण आता त्यांनीं वास्तविक तसें करण्याचें प्रयोजन राहिलें आहे असें वाटत नाहीं. इतकेंच काय, 'पण मानलेल्या मातेस,' 'आमची इंदू' 'रानपांखरा' 'पराभूत सृष्टिसौंदर्य' आणि 'भावतरंग' इत्यादि अनेक सुन्दर कविता वाचून असें प्रत्ययाला येतें कीं कवीची अंतर्मुखवृत्ति झाली असून ती अंतर्मुखता स्वतंत्रपणें काव्यप्रांगणांत धीरानें विलास विहार करण्यास बलशाली झाली आहे. आम्हीं या नूतनोदित कवीचें मनःपूर्वक कौतुक करून त्यांना चिरंतन यश चिंतितों.

---

भेटी पाठविणारांची 'माला' ऋणाईत आहे.